


# ड्युप्लीचें चरित्र.

लेखक

कृ. ब. गोडबोले.

इ/११३

DECCAN VERNACULAR TRANSLATION SOCIETY POONA 1894
डेक्कन व्हर्नॅक्युलर ट्रान्स्लेशन सोसाइटी, पुणें. १८९४.

श्रीगजानन.

# ड्युप्लीचें चरित्र.

हा ग्रंथ

इंग्रजी ग्रंथांच्या आधारानें

**कृष्णाजी बल्लाळ गोडबोले**

संस्कृत गद्यरामायण, अनाथ पांडुरंग, विद्यमान एतद्देशीय राज्यें, संस्थानें, जाहागिरी, यांचा इतिहास, राबिन हुड, व मौन्ट-स्टयूअर्ट एल्फिन्स्टन साहेबाचें चरित्र, ह्या पुस्तकांचे कर्ते-

यांनीं केला.

मुद्रक

रा. रा. शंकर नरहर जोशी, म्यानेजर—'चित्रशाळा'

स्टीम प्रेस, ८१८ सदाशिव पेठ पुणें शहर.

प्रकाशक

**कृष्णाजी बल्लाळ गोडबोले** शनवारपेठ, तांब्यांचा वाडा घर नंबर २३०.

---

सन १९१५

**किंमत एक रुपया.** ( ट. ख. शिवाय. )

# प्रस्तावना.

हिंदुस्थानदेश म्हणजे सुवर्णभूमि असा युरोपखंडांत फार दिवस लौकिक असल्यानें तिकडील लोकांस इकडे येऊन सुवर्ण संपादन करावें अशी इच्छा सहजच होत असे. परंतु इकडे येण्यास त्याकाळीं सरळ, सुलभ, निर्भय, असा मार्ग उपलब्ध नसल्यानें त्यांचा हेतु पूर्ण होत नसे. कितीएक वर्षें अनेक तर्क करून, खटपट करून, मोठे कष्ट सोसून, त्यांतील धाडशी पुरुषांनीं अनेक संकटांतून पार पडून अखेर जलमार्गानें मलबारकिनारा गांठला. मग ते जेव्हां इकडील एक एक उत्कृष्ट जिन्नस घेऊन जाऊन तिकडील लोकांस दाखवूं लागले तेव्हां त्यांनां जो हर्ष झाला तो पोटांत मावेना. इकडील संपत्तीचें ते जें मनसोक्त* वर्णन करीत तें ऐकून तर आपण त्या कनकमय भूमीवर केव्हां जाऊन पडूं असें होई.

याप्रमाणें युरोपांतून पोर्च्युगीस, डच्च, इंग्लिश, वगैरे लोक इकडे येऊन व्यापार करून पैसा मिळवूं लागले; तेव्हां त्यांचे शेजारी जे फ्रेंच लोक त्यांनां ही तशी इच्छा झाली आणि ते ही आले. इतरांप्रमाणें त्यांनींही आपणास राहण्यास कायमचें ठिकाण मिळवून व्यापार चालविला. ते इंग्रजांमागून पुष्कळ दिवसांनीं, सुमारें पन्नास वर्षांनीं त्यांच्याच सारखी कंपनी काढून आले आणि त्यांच्याच सारखे तीन चार ठिकाणीं वखारी घालून बसले. परंतु दक्षिण हिंदुस्थानांत ते त्यांच्या अगदीं शेजारीं असून त्यांचें पोंदेश्री ठाणें इंग्रजांच्या मद्रासेपेक्षां फार सोईचें होतें व तें थोडक्याच काळांत टुमदार शहर बनलें. सुरत, मद्रास, मुंबई व कलकत्ता हीं इंग्रजांचीं तीन दिशांस चार ठाणीं असून व्यापार ही बराच होता. फ्रेंचांचें पोंदेश्री हें एकच मुख्य ठाणें असून तें लौकरच नांवालौकिकास आलें. परंतु तें नुसत्या व्यापारानें नव्हे.

---

* The shaking of the proverbial Pagoda tree म्हणजे होनांचें झाड हालवावयाचें अशी तिकडे म्हण पडली होती; यावरून तिकडे कशा प्रकारच्या गप्पा चालत असतील, आरेबियन नाइट्स पुस्तकांत वर्णिल्या प्रकारची संपत्ति हिंदुस्थानांत खरोखरच आहे अशी कित्येकांची तरी समजूत झाली असेल कीं नाहीं याची कल्पना होते.

Few of them came to India with any other motive than that of shaking the pagoda tree as quickly and as effectively as possible. ———Times of India Christmas No 1915.

हिंदुस्थानांत आलेले युरोपियन लोक जरी पराक्रमी होते तरी ते आपला व्यापार सोडून इतर धंद्यांत पडत नव्हते. परंतु आपसांतील द्वेष आणि मत्सर यांमुळें ते एकमेकांस पाण्यांत पहात असल्यानें त्यांच्या आपआपसांत झटापटी होत होत्या. तरी फ्रेंच ठाण्यांतील मुख्य मनुष्य हुशार असल्यानें ते स्वसंरक्षण करून होते आणि त्यांचें शौर्य आसपासच्या एतद्देशीय लोकांच्या निदर्शनास आलें व त्याचा त्यांस उपयोगही झाला; तेव्हांपासून त्यांच्याविषयीं त्यांच्या मनांत निराळीच भावना उत्पन्न झाली. पुढें फ्रेंचांस कांहीं मुलुख मिळून त्यांत ते आपला अधिकार चालवूं लागले. असे दिवस जातां जातां पोंदेश्री येथें एका असामान्य पुरुषाची नेमणूक होऊन तो कारभार पाहूं लागला; तेव्हांपासून अल्प काळांतच ज्या गोष्टी घडल्या त्यांच्या योगानें फ्रेंचांचें दैव खुललें.

त्या पुरुषाची बुद्धि कांहीं विलक्षण होती. त्याच्या वेळेपर्यंत युरोपांतले जे लोक हिंदुस्थानांत आले त्यांत तसा बुद्धिमान आणि चाणाक्ष एकही निघाला नाहीं असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. बंदुकीच्या दारूची कल्पना निघाल्यापासून युरोपांत शस्त्रास्त्रविद्येंत आणि युद्धकलेंत दिवसेंदिवस ज्या सुधारणा होत होत्या त्या हिंदुस्थानानें ऐकिल्या देखील नव्हत्या. हिंदुस्थानच्या लोकांच्या अंगांत बल, शौर्य, वीर्य, धैर्य, इत्यादि गुण कांहीं कमी नाहींत, ते पराक्रमी आहेत, त्यांस जर युरोपियन तऱ्हेनें युद्ध करावयास शिकविलें तर ते आपल्या फारच उपयोगीं पडतील असें आपल्या कुशाग्रबुद्धीनें फक्त त्या एका पुरुषानें जाणलें. मग तो त्या उद्योगास लागला आणि अल्प काळांत त्याला पाहिजे तितके हिंदी शिपाई मिळूं लागले. पुढें आपल्या सभोंवारच्या प्रदेशांत असलेल्या लहानथोर राजेरजवाड्यांतून जो कोणी आपलें साहाय्य मागेल त्यास तें देऊन त्याजकडून त्याबदला द्रव्य आणि मुलुख घ्यावयाचा असा क्रम सुरू करून दक्षिण हिंदुस्थानांत फ्रेंच राज्य स्थापण्याचा त्यानें विचार केला आणि त्याचा पाया घातला. त्या पायावर राज्यरूप इमारत अल्प काळांत उभी रहात होती, परंतु त्याच्या वरिष्ठांनीं, देशबांधवांनीं, त्याला जसें साहाय्य करावयास पाहिजे होतें तसें केलें नाहीं त्यामुळें अखेर त्यांचेंच नुकसान होऊन त्यांनां हळहळत बसावें लागलें.

अशा ह्या असामान्य पुरुषाचें नांव **डुप्ली**. त्याचें चरित्र फारच विचित्र, मनोहर आणि बोधप्रद आहे. त्याची कारकीर्द थोडीच झाली; परंतु तितक्या

अवकाशांत त्यानें ज्या गोष्टी केल्या त्या पाहून मन थक्क होऊन जातें. त्याचा हेतु सर्व प्रकारें सिद्धीस गेला नाहीं तरी त्याचें नांव इतिहासांत अजरामर होऊन राहिलें आहे. शिकंदर, सीझर, शिवाजी, नेपोलियन, अशा विभूति वारंवार उत्पन्न होत नसतात आणि त्या सर्वांचे गुण, पराक्रम, हेतु, हे सारखे नसतात. त्या सर्वांचीं चरित्रें विलक्षणच असतात. तीं पाहून त्यांतून कोणाला श्रेष्ठ म्हणावें, सर्व एकाच वर्गांतले असें म्हटलें तरी त्यांत अग्रस्थान कोणाला द्यावें, त्याच्या खालीं कोणाला बसवावें हें मोठ्या विचाराचें आणि कठीण काम असतें व त्यांत मोठमोठ्या विद्वानांची ही एकवाक्यता होणें बहुधा अशक्यच असतें. सर्व ज्ञात जग जिंकलें, आतां आणखी जिंकायाला कांहीं उरलें नाहीं म्हणून रडणारा शिकंदर अद्वितीय पराक्रमी पुरुष म्हणून कोणी त्याची स्तुति करील तर महाप्रयासानें मिळविलेलें राज्य गुरुचरणारविन्दीं अर्पण करून हात जोडून पुढें उभा राहणारा शिवाजी महराज श्रेष्ठ असें कोणी म्हणेल. तसेंच सारें युरोपखंड हालवून सोडणारा महासेनानी, गेल्या शतकांतला महायोद्धा नेपोलियन श्रेष्ठ असें कोणी म्हणेल तर त्यावर " तें खरें हो, परंतु त्याला सार्वभौमपद स्वतः उपभोगून तें आपल्या वंशाकडे चालावें अशी पराकाष्ठेची राज्यतृष्णा होती आणि त्यामुळेंच सारें बिघडलें. " असें दुसरा म्हणेल. त्याचाच देशबंधु ड्युप्ली; त्याच्याकडे पहा. त्याला आपल्या जन्मदात्या फ्रान्स देशाला हिंदुस्थानांत मोठें थोरलें राज्य संपादन करून द्यावें एवढा एक ध्यास लागलेला होता आणि तो हेतु सिद्धीस नेण्याकरितां त्यानें न भूतो न भविष्यति असे अतर्क्य प्रयत्न, श्रम आणि साहसें केलीं. तो स्वार्थ साधण्याला सिद्ध झाला नाहीं, राज्याभिलाष बुद्धीनें तो प्रेरित झाला खरा, परंतु कोणाकरितां ? तर स्वदेशाकरितां हें अगदीं निर्विवाद आहे व ह्यासाठींच त्याची आपणांस धन्यता वाटते.

हिंदुस्थानदेश केवढा अफाट, परंतु तो सारा अल्प काळांत पादाक्रांत करून इंग्रज लोक सार्वभौमत्व पावले. राजाधिराज पंचम जॉर्ज महाराज यांस दिल्लीच्या सिंहासनावर राज्याभिषेक होऊन अखिल सामंतचक्रानें नम्राशिर होऊन त्यांस वंदन केलें त्या दिवशीं इंग्रजांचे सर्व हेतु परिपूर्ण होऊन ते कृतकृत्य झाले आणि आनंदसमुद्रांत पोहूं लागले. आपले पुत्रपौत्रादि वंशज या राज्याचा चिरकाल उपभोग घेत सुखसागरांत निमग्न असोत या शिवाय दुसरी कांहीं इच्छा आतां

ते करीत नसतील. परंतु केव्हां तरी एक विचार त्यांच्या मनांत येत असेल. तो एवढाच कीं, आपल्यास हें राज्य प्राप्त झालें कसें ? प्लासीची लढाई मारून क्लाईव्हसाहेबानें हिंदुस्थानांत इंग्लिशांच्या राज्याचा पाया घातला. बंगाल आणि बहार प्रांत घेतल्यावर आतां आपल्याला एवढेंच राज्य पुरे, याच्यापुढें जाऊं नका असें आपल्या देशबांधवांस त्यानें बजावलें आणि तेही तेवढ्यांत संतुष्ट झाले असतील. परंतु त्याला तेवढें तरी राज्य स्थापण्याची इच्छा होण्यास आणि ती पूर्ण होण्यास गुरुमंत्र कोणाचा ? त्याला कोणती गुरुकिल्ली सांपडली, हें पाहूं गेलें तर तो मद्रासेस असतांना त्याला जो **ड्युप्ले**शीं प्रसंग पडला आणि त्या थोर पुरुषाचें बुद्धिवैभव पहावयास मिळालें तें, असें उघड दिसतें. बंगाल्यांत जाऊन त्यानें मोठी कीर्ति मिळविली, परंतु तत्पूर्वी मद्रासेस असतांना जे एक एक प्रसंग आले त्यांत तो उदयास आला होता. असो. इंग्रजांनीं हिंदुस्थानचें राज्य संपादन केलें तें **ड्युप्ली**नें दाखविलेल्या मार्गानें जाऊन असें इंग्लिश ग्रंथकारही म्हणतात. तर तो **ड्युप्ली** मार्गदर्शक गुरु कसा झाला आणि इंग्रज लोक राज्य कसें संपादूं लागले तें समजण्यास त्याचें चरित्र पाहिलें पाहिजे.

हिंदुस्थानांत फ्रेंचांचा नांवलौकिक मोठा झाला, परंतु तो करणारा **ड्युप्ली**. त्याची योग्यता त्याच्या वरिष्ठांनीं ओळखिली नाहीं. त्याला त्यांनीं स्थानभ्रष्ट केलें त्या दिवशींच फ्रेंचांचें नशीव फुटलें आणि इंग्रजांचें पूर्ण उदयाला आलें. त्याच्या देशबांधवांनीं, त्याची कांहीं दाद घेतली नाहीं त्यांत त्यांचाच दुर्लौकिक झाला. हिंदुस्थानांत नबाबी थाटानें राहिलेल्या ह्या थोर मनुष्याला स्वदेशीं गेल्यावर अत्यंत आपत्काळ आला आणि त्यांत त्याचा शेवट कसा झाला तें पाहिलें म्हणजे दैवाची गति कशी विचित्र असते तें उत्कृष्ट दिसून येतें. उद्योग प्रबळ कीं दैव प्रबळ हा वाद कांहीं नवीन नाहीं. आपआपल्या मताच्या स्थापनार्थ उभय पक्षांकडून सबळ पुरावे येतात. परंतु **ड्युप्ली**ची कारकीर्द, तो गेल्यावर फ्रेंचांनीं पुनः त्याच्या हेतूप्रमाणें वागण्यास केलेले प्रयत्न आणि त्यांस आलेलें यशापयश, हीं पाहिलीं म्हणजे दैववाद कांहीं पंगू नाहीं एवढी तरी खात्री होतेच.

थोर पुरुष कोणत्याही स्थळीं, कोणत्याही काळीं होवोत, ते ईश्वराच्या विभूति होत. **ड्युप्ली**ची गणना या वर्गाच्या पुरुषांत करण्यास कोणी हरकत घेईल असें वाटत नाहीं. त्याच्या उज्वल चरित्राची आमच्या महाराष्ट्रीय बंधूंस माहिती असणें अवश्य आहे. परंतु ती होण्यास तें महाराष्ट्र भाषेंत लिहिलेलें

असलें म्हणजे जसें स्त्री-पुरुषादि सर्वांस सहज समजेल तसें परभाषेंतलें कळणार नाहीं असें वाटून आम्हीं हा यत्न केला आहे. तर ही अल्प सेवा आमच्या महाराष्ट्रबंधूंनीं मान्य करून घ्यावी अशी त्यांस विनंती आहे.

आम्हीं हें चरित्र इंग्रजी ग्रंथांवरून लिहिलें आहे. त्यांत जीं फ्रेंच पुरुषांचीं व स्थळांचीं नावें लिहिलेलीं आहेत व कोठें कोठें जे फ्रेंच शब्द आहेत त्यांचे उच्चार खरे कसे करावयाचे तें फ्रेंचभाषाभिज्ञ रा० रा० विद्याधर वामन भिडे. बी० ए० यांनीं कृपा करून आम्हांस सांगितलें; कांहीं ऐतिहासिक माहिती हवी लागली ती प्रोफेसर हरीभाऊ लिमये यांनीं दिली. प्रोफेसर शिवरामपंत परांजपे यांनींही त्यांस विचारली ती माहिती दिली; तशीच आणखी कांहीं गृहस्थांनीं मदत केली याबद्दल आम्ही त्या सर्वांचे फार आभारी आहों.

पुस्तक लिहून तयार झाल्यावर तें डेक्कन व्हरन्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटी-कडे पाठविलें. तिनें नेमलेल्या कमिटीनें तें तपासून ज्या सूचना केल्या त्यांप्रमाणें दुरुस्त करून पुनः तिजकडेच पहाण्याकरितां पाठविलें आणि मंजूर होऊन आल्या-वर छापविण्याच्या विचारास लागलों. परंतु अनेक अडचणींमुळें कामास सुरुवात व्हावी तितकी लौकर झाली नाहीं. मुख्य नड पैशाची पडली. सोसायटीनें पुस्तक पसंत म्हणून चांगलें बक्षीस देण्याचें ठरविलें आणि अमुक मुदतींत छापून दाख-वावें म्हणजे रक्कम मिळेल असें कळविलें. परंतु महाराष्ट्राच्या सद्यःस्थितींत, ह्या दिवसांत असलें पुस्तक छापविण्याचें काम किती जड आहे तें तो धंदा करणारांस अनुभवानें जसें कळलेलें आहे तसें इतरांस कळणार नाहीं. असो. सोसायटीनें दिलेली मुदत संपली तेव्हां पुनः ती बरीच वाढवून मागावी लागली; ती तिनें कृपा करून दिली तरी मुख्य नड ती कायमच होती. परंतु एका श्रीमान् गृह-स्थांनीं पुस्तक पाहून स्वयंस्फूर्तीनेंच ती तत्काल दूर केली. तेव्हां " सहज मिले सो दूध बराबर " ह्या कविवचनाचें स्मरण होऊन प्रमुदित अंतःकरणानें त्यांचे उपकार मानून छापविण्याचें काम सुरू केलें. तें यथावकाशानें पुरें होऊन हातीं धरलेलें काम दीर्घ कालानें कां होईना पण ईश्वरकृपेनें सिद्धीस गेलें आणि पुस्तक प्रसिद्ध करण्याचा योग आला याचा आनंद वाटतो.

कुरुंदवाड.
ता० ११ माहे डिसेंबर सन १९१५. } कृ० ह० गोडबोले.

श्रीगजानन.

# ड्युप्ली-चरित्र.

## भाग १ ला.

### प्रास्ताविक ( Introductory )

सन १७७४ इसवीमध्यें *आबे गीयाँ ( Abbe Guyon ) यानें असें लिहिलें कीं, पोर्तुगीज, इंग्लिश आणि डच्च या लोकांनीं ईस्ट इंडिज ( हिंदुस्थानादिक पूर्वेकडील ) देशांतून आणलेल्या अपार संपत्तीनें फ्रेंच लोकांस असें विदित केलें कीं, माझें माहेरघर फार दूर, अज्ञात देशांत आहे; तेथें व्यापार केला असतां मोठा नफा होत असतो; तुमच्या तिघा शेजाऱ्यांनीं तेथें येऊन उदीम धंदा करून आपलीं घरें कनकमय केलीं, त्याप्रमाणें तुम्हीही येऊन गबर होण्याला कांहीं हरकत नाहीं. तो आबे म्हणतो ह्याप्रमाणें फ्रेंच लोकांनां आपल्या मुलखीं येऊन सधन होण्याला लक्ष्मीनें तें आमंत्रणच दिलें. तें पुष्कळ काळपर्यंत अगदीं त्यांच्या कानांत घुमत, डोळ्यांपुढें होतें; परंतु कित्येक वर्षेपर्यंत त्यांच्या हातून त्याचा व्हावा तसा नीटसा स्वीकार झाला नाहीं. फ्रान्सचा राजा पहिला **फ्रान्सिस** यानें इ० स० १५३७ आणि १५४३ या वर्षीं व तिसरा **हेनरी** यानें १५७८ या वर्षीं आपल्या प्रजाजनांनां दूरदूरच्या सफरी करण्याविषयीं उत्तेजन दिलें परंतु तें सर्व निष्फळ झालें. कारण तें कोरडें, नुसतें तोंडचें होतें. फ्रान्सापूर्वीं इंग्लंड वगैरे तीन देशचे लोक पूर्वेकडे व्यापार करण्यास गेले, त्यांनां

---

* फ्रान्सदेशांत, विशेषतः राज्यक्रांति होण्याच्यापूर्वीं, जो कोणी पुरुष धर्मपरायण असून आपलें आयुष्य धर्मचिंतनांत घालवी, किंवा पाठशाळेंत राहून धर्मशास्त्राच्या अभ्यासांत निमग्न असे, त्यास आबे Abbe म्हणत.

त्यांच्या प्रभूंकडून द्रव्यसाहाय्य होण्याचीं जशीं वचनें मिळालीं होतीं तशीं फ्रान्सच्या राजांकडून आपल्या लोकांना न मिळाल्यामुळें त्यांच्या हातून व्यापाराच्या चढाओढींत शिरवलें नाहीं. इ० स० १६११ मध्यें एक ( कंपनी ) व्यापारी मंडळी निघाली. त्या एकटीनेंच बारा वर्षेंपर्यंत पूर्वेकडील देशांशीं व्यापार करावा असा तेराव्या **लुईनें** तिला कौल देखील दिला, तरी चार वर्षेंपर्यंत तिच्याही हातून कांहीं झालें नाहीं. अखेर सन १६१५ मध्यें **मेस्य म्वीसाँ** M. M. Muisson आणि **कानी** Canis या नांवांच्या **रूआँ** Rouen येथील दोघा व्यापाऱ्यांनीं त्या मंडळीला भर दिली तेव्हां कोठें तिनें व्यापाराला सुरवात केली आणि दोन गलबतें हिंदीमहासागरांत पाठविलीं.

ह्या कंपनीनें तयार करून पाठविलेलीं तीं दोन गलबतें **मादागास्कर** बेटाला जाऊन लागलीं इतकेंच झालें. तीं कांहीं पुढें हिंदुस्थानापर्यंत गेलीं नाहींत. परंतु स्वदेशीं परत आल्यावर मादागास्कर येथील संपत्तीचें ते लोक जें वर्णन करूं लागले तें ऐकून लोकांनां थोडासा हुरूप आला; आणि आपण धाडस करून तिकडे जावें असें वाटूं लागलें. त्यांच्यापेक्षां राजदरबाराला अधिक हुरूप आला. त्यावेळीं त्यांचा पुढारी **रिश्लय** Richclien हा प्रख्यात पुरुष होता. त्या थोर मुत्सद्यानें तारीख २४ जून सन १६४२ रोजीं दुसऱ्या एका नव्या कंपनीला मादागास्कर आणि त्याच्याजवळचीं बेटें यांत वसाहाती स्थापण्याचा व फ्रान्सच्या राजाच्या नांवानें तीं आपल्या कबजांत घेण्याचा हक्क एकटीलाच दिला. पुढें त्याच वर्षीं डिसेंबर महिन्यांत **रिश्लय** मेला आणि त्याच्यामागून मे महिन्यांत तेरावा **लुई** राजाही मेला. परंतु त्यांच्या हातून वसाहातींच्या कल्पनेचें जें बीजारोपण झालें तें चांगलें रुजून त्यानें पाळें धरलीं; आणि त्या राजाच्या मागून राज्य चालविण्याकरितां Council of Regency म्हणजे पालनकर्ते अधिकारीमंडळ म्हणून जी मंडळी अधिकारारूढ झाली तिनें तारीख २० सप्टेंबर १६४३ इसवी रोजीं त्या नव्या कंपनीला मिळालेले हक्क कायम करून दिले.

याप्रमाणें त्या कंपनीचें काम चालू झालें परंतु तें बेताबाताचेंच होतें. तिनें मादागास्कर बेटांत वसाहत केली आणि ती होती तेथपर्यंत दरसाल निदान एक गलबत मालानें चांगलें गच्च भरून ती तिकडे पाठवीत असे. कांहीं काळपर्यंत

कंपनीच्या मालकांना आपला व्यापार चांगला चालेल अशी आशा वाटत होती. तिकडून एक गलबत भरून आलें त्यांत पिंवळा चंदन, कातडीं, डिंक आणि अगरू वगैरे जिन्नस आले आणि दुसऱ्यांत २५ टन Rock crystal म्हणजे तऱ्हेतऱ्हेच्या रंगांचे, दगडाचे खडे आले. ते पाहून मंडळी खूष झाली आणि तिला उमेद आली, परंतु ती फार वेळ टिकली नाहीं; कारण व्यापार करतां सोळा बारा होतात त्याप्रमाणें झालें. कांहीं गलबतें फुटलीं आणि वसाहतवाल्या लोकांनां त्या बेटाची हवा मानेना, त्यामुळें नफ्यापेक्षां नुकसान अधिक झालें; म्हणून कंपनीला मिळालेल्या कौलाची वीस वर्षांची मुदत जेव्हां भरली तेव्हां तिनें आपला मुकाट्यानें गाशा गुंडाळला, पुनः दुसरा कौल मागितला नाहीं.

याप्रमाणें त्या कंपनीचा अवतार संपला म्हणून व्यापार कांहीं बंद पडला नाहीं. तिच्या जागीं एक प्रख्यात सरदार ( Nobleman ) तत्काळ उभा राहिला. त्यानें समरांगणीं पराक्रम करून ड्यूक आणि मार्शल ऑफ् फ्रान्स अशा मोठ्या मोठ्या पदव्या मिळविल्या होत्या. त्याचें नांव **ड्यूक द ला मेलराय** ( Duke de la Meilleruye ). कंपनीनें सोडलेलें काम हातीं घेऊन त्यानें तें आपल्या स्वभावाप्रमाणें मोठ्या हिमतीनें चालविलें. परंतु त्यांत त्याला कांहीं यश आलें नाहीं. त्या कामांत दहा वर्षे घालवून तो अगदीं बुडाला आणि अखेर सन १६६४ च्या फेब्रुआरी महिन्यांत विचारा मरून गेला.

हा काळ फ्रान्स देशाला मोठ्या आणीबाणीच्या प्रसंगाचा होता. परंतु त्याच्या सुदैवानें अशा वेळीं त्याची सेवा उत्तम प्रकारें करण्याला एक मुत्सद्दी मिळाला होता. त्याचें नांव **कॉलबेर** Colbert. चौदाव्या **लुई राजाचा** प्रधान **माझारीन** म्हणून होता त्यानें त्याची योग्यता जाणून आपल्या अंतकाळीं राजाजवळ त्याची शिफारस करून आपल्या पश्चात् प्रधानपद त्याला द्यावें असें सांगितलें होतें. **कॉल बेर** बुद्धिमान् होता. त्यानें तेव्हांच असें ताडलें कीं वसाहती स्थापण्यापासून नफा आहे इतकेंच नव्हे तर त्या स्थापण्याची अगदीं जरूर आहे. इंग्लंड, हॉलंड व पोर्तुगाल ह्या देशांनां चांगल्याप्रकारें वसाहती स्थापतां आल्या असें त्याला दिसून आलें. त्याचें कारण काय असावें हें तो फार लक्ष लावून पाहूं लागला आणि आपल्या मनाशीं असें म्हणूं लागला कीं, त्यांनां चांगल्या वसाहती करतां याव्या आणि फ्रान्साला येऊं नयेत असें कां व्हावें?

विचार करतां करतां त्याला असें दिसून आलें कीं, वसाहतींची भरभराट होण्यास त्यांची व्यवस्था चांगली ठेवतां यावयास पाहिजे. ती आपल्यास ठेवतां येईल अशी त्याची खात्री होती म्हणून त्यानें त्या उद्योगास लागण्याचा निश्चय केला. सन १६६४ मध्यें **ड्युक द ला मेलराय** वारला आणि कांहीं आडकाठी उरली नाहीं तेव्हां त्याच वर्षीं त्यानें दुसरी एक कंपनी उभी केली. तिचें भांडवल दीड कोट फ्रांक,* होतें. पन्नास वर्षेंपर्यंत तिनें एकटीनेंच व्यापार करावा असा तिला कौल मिळाला. एथपर्यंत **कॉल बेर** आणि त्याच्या पूर्वींचे प्रधान यांच्या करण्यांत कांहीं अंतर नव्हतें. त्याचें कृत्य त्यांच्यापेक्षां पुष्कळ पटीनें मोठें होतें इतकेंच. परंतु त्याच्या बुद्धीला असें वाटलें कीं, मागच्यापेक्षां कांहीं तरी निराळें केलें पाहिजे. पूर्वींच्या कंपन्यांचें काम नीट चाललें नाहीं, याचें कारण फ्रान्साच्या प्रतिस्पर्धी देशांनीं आपल्या कंपन्यांस जसें पाठबळ दिलें तसें फ्रान्सनें दिलें नाहीं हें होय, असें त्यास दिसून आलें. आतां तसें होऊं नये, कंपनीला कांहीं तोटा आला म्हणून तिच्या मालकांची उमेद खचूं नये, याकरितां त्यानें आगाऊच बंदोबस्त करून टाकला. तो असा कीं, त्यानें कंपनीला आरंभींच तीस लक्ष फ्रांक दिले आणि पहिल्या दहा वर्षांत तिला जर कांहीं तोटा येईल तर तो सारा सरकारानें सोसावा असेंही ठरविलें. तो एवढेंच करून थांबला नाहीं. आपण हातीं धरलेल्या ह्या कामांत चांगलें यश यावें म्हणून, त्यांत देशांतील बडे लोकांनीं (Nobility) पडावें अशीही त्यानें तजवीज केली. त्याच्या सांगण्यावरून चौदाव्या **लुई** राजानें जाहिरनामा काढून असें प्रसिद्ध केलें कीं, इंडीज (Indies) देशाशीं चालणाऱ्या व्यापारांत पडलें असतां त्यांत थोर लोकांना कांहीं कमीपणा येतो असें त्यांनीं समजूं नये. **कॉलबेर** एवढ्यावरही थांबला नाहीं. कंपनीला जरूर तितका पैसा लौकर मिळावा म्हणून तिच्या रचनेच्या ठरावांत त्यानें एक कलम असें घातलें कीं, तें पाहून परदेशच्या लोकांच्या तोंडाला पाणी सुटावें आणि त्यांनीं भराभर पैसा आणून ओतावा. तें कलम असें होतें कीं, जे कोणी परदेशचे लोक या कंपनीचे भागीदार होतील त्यांना ते ह्या देशचे आहेत असें समजलें जाईल व त्याबद्दल कायद्याच्या कांहीं अडचणी न घालतां सनदापत्रें करून दिलीं जातील (Letters of naturalisation, free

* एक फ्रांक म्हणजे १० पेन्स.

of any formality. ) त्यांत अट इतकीच ठेविलेली होती कीं, प्रत्येकाची रक्कम १०००० फ्रांक असली पाहिजे. त्यानें आणखी एक कलम असें घातलें कीं, कंपनीचे व्यवस्थापक ( Directors ) नेमावयाचे ते फक्त व्यापारी लोकांपैकींच नेमावे; त्यांत परदेशचे व्यापारीही असावे, परंतु त्यांनीं कंपनींत पुष्कळ पैसा घातलेला असावा आणि त्यांनीं आपल्या मुलाबाळांसह फ्रान्स देशांत रहावें. ह्या कंपनीसंबंधानें एकंदर ४७ कायदे झाले, आणि त्यांवरून तिला जे हक्क मिळाले त्यांत मादागास्कर बेटावर व तिचे नोकर जे दुसरे प्रदेश जिंकून घेतील किंवा व्यापतील त्यांवर तिचा पूर्ण अधिकार चालेल असें आश्वासन दिलेलें असून त्या मुलखांवर कोणी परदेशचा शत्रु उठेल तर फ्रान्स देशांतील जरूर तितकें सैन्य पाठवून त्यांचें संरक्षण केलें जाईल असेंही वचन दिलेलें होतें. हा कायदा सन १६६४ च्या आगस्ट महिन्यांत ठरून सप्टंबरमध्यें पार्लमेंटांत त्याची नोंदणी झाली. परंतु ती होण्यापूर्वींच राजानें आपल्या अधिकारांत सरकारी खजिन्याकडे असा हुकूम पाठविला कीं, कंपनीच्या तिजोरींत तीन लक्ष फ्रांक रकमेचा भरणा करावा.

ह्याप्रमाणें त्या प्रधानानें शहाणपणानें ठराव केल्यानें त्याला यशःप्राप्ति झाली. हवा तितका पैसा भराभर येऊन पडला आणि पुढच्या वर्षीं म्हणजे सन १६६५ मध्यें ह्या नव्या कंपनीचीं चार गलबतें **ब्रेस्ट** बंदरांतून निघून मादागास्कर बेटाकडे चालतीं झालीं. त्यांची लढाऊ गलबतांप्रमाणेंही थोडीबहुत सिद्धता असून त्यांवर एकंदर ५२० मनुष्यें होतीं. हिंदुस्थानाला जाण्याच्या मार्गावर मध्येंच उतरण्याला आपल्याला एक घर असावें म्हणून मादागास्कर बेटांत वसाहत करावी असा त्या कंपनीचा हेतु होता. तो सिद्धीस जावा म्हणून धाडशी लोकांनां तिकडे जाण्याला उद्युक्त करण्याकरितां तिनें नानातऱ्हेच्या लालुची दाखविल्या. फ्रान्स देशांतल्या सर्व लहान थोर मुख्य मुख्य शहरांतून जिकडे तिकडे भिंतींवर जाहिराती लावल्या; त्यांत असें लिहिलें होतें कीं, त्या वसाहतींत जे कोणी जाऊन रहातील ते, त्यांचीं बायका मुलें, व चाकरमाणसें, यांच्या हातून जितकी जमीन नांगरवेल तितकी नांगरल्यास त्यांनां तिची मालकी द्यावयाची असा आम्हीं ठराव केला आहे. मादागास्कर हें नांव पालटून **ईल दोफीन** ( Ile Dauphine ) असें त्या बेटाचें नवें नांव ठेवून त्या जाहिरातींत त्याचें मनोहर वर्णन केलें

होतें. तें असें—तेथची हवा ' फार समशीतोष्ण ' आहे. वर्षांतून आठ महिने तर वसंतऋतूसारखी असते. चार महिने उन्हाळा असतो परंतु तो फ्रान्सांतल्या उन्हाळ्यापेक्षां कडक नसतो. तेथचे लोक शंभर शंभर वर्षांच्या वयाचे होतात आणि कोणी कोणी १२० वर्षेंपर्यंतही वांचतात. तेथें फळफळावळ चांगली आणि पुष्कळ होते. तेथें गाई, बैल, बकरीं, डुकरें, आणि गुरें-ढोरें यांची समृद्धि आहे. तेथच्या खाणींत सोनें, रुपें, आणि शिसें सांपडतें; तेथें लाख, कापूस, साखर, तंबाकू, काळें मिरीं, पांढरें मिरीं, अबनूस, सर्व प्रकारच्या रंगाचीं लांकडें, आणि दुसरे अनेक प्रकारचे व्यापाराचे जिन्नस होतात; आणि ते परोपरीचे पदार्थ मिळवण्याला वसाहत करणारांनीं स्वतः खपलें पाहिजे असें नाहीं. त्यांनीं तेथें राहणारे जे निग्रो लोक आहेत त्यांनां कामाला लावलें म्हणजे झालें; जें हवें तें मिळतें. ते निग्रो लोक कांहीं आडदांड नाहींत; ते गरीब, हुकमांत राहणारे आणि नम्र आहेत. आपण ज्या बेटाचा नुसता एक लहानसा कोंपरा मात्र थोडासा पाहिला होता त्याचें असें मनसोक्त वर्णन कोणत्याही लोकांपुढें दुसऱ्या कोणीं कधीं केलें नसेल.

**ईल दोफीन** असें जरी त्या बेटाला नवें नामाभिधान प्राप्त झालें होतें तरी **मादागास्कर** हें त्याचें पहिलें नांवच कायम राखणें सोईचें आहे म्हणून आम्ही त्याला तसेंच म्हणूं. असो. त्या बेटाचें असें सुंदर, मनोहर, वर्णन केलेलें जाहिरातींतले जाहिरातींतच राहिलें. तेथच्या वसाहतीची भरभराट झाली नाहीं. त्या कंपनीच्या पदरीं नोकरी धरून जे लोक धाडसानें वसाहत करण्याला गेले त्यांनां तेथचा प्रकार अगदीं निराळा दिसून आला. तेथें राहणारे निग्रो लोक काम करण्याला त्यांच्याजवळ चाकरीस रहातना. उलट ते त्यांच्याशीं शत्रुत्वानें वागूं लागले. तेथची हवा फ्रान्सच्या हवेपेक्षां फार उष्ण असून कांहीं ऋतूंत तर खरोखर प्राणघातक होती. जमीन साधारण, उत्तम पिकाऊ नव्हे. उंची उंची पुष्कळ जिनसांचीं नांवें जाहिरातींत लिहिलेलीं होतीं परंतु त्यांपैकीं बरेच तेथच्या जमिनींत होत नसून त्यांची उत्पत्ति त्या जाहिराती लिहिणारांच्या अचाट कल्पनेंत मात्र होत होती. पुष्कळ वर्षें तेथच्या निग्रो लोकांशीं झगडून आणि हवेपासून शरीरावर होणारे परिणाम सोसून त्या वसाहतवाल्यांपैकीं जे शिल्लक उरले त्यांनीं आपली चीजवस्त गोळा करून गाशा गुंडाळला आणि तेथून जवळच असलेल्या

**आईल ऑफ् फ्रान्स** ( फ्रान्सचें बेट ) आणि **बूरबाँ** ह्या बेटांचा रस्ता धरला. हीं बेटें प्रथम पोर्चुगीस लोकांनीं शोधून काढलीं आणि कांहीं दिवसांनीं सोडून दिलीं. नंतर तीं डच लोकांच्या कबजांत गेलीं. पुढें त्यांनींही सोडून दिलीं. तेव्हां सन १६४९ मध्यें फ्रान्सदेशानें आपल्या ताब्यांत घेतलीं. परंतु सन १६७२ पर्यंत त्यांचाही तावा नांवालाच होता. कोणा युरोपियन लोकांची तेथें वस्ती नव्हती. त्यावर्षीं वर सांगितल्याप्रमाणें मादागास्कर बेटांतून त्रासून कंटाळून निघालेले लोक तेथें जाऊन राहिले. त्यांची संख्या थोडी होती. परंतु त्यांची ती वसाहत दिवसेंदिवस सुधारत जातां जातां अखेर बलाढ्य होऊन बसली.

**फ्रेंच** कंपनीनें मादागास्करमध्यें वसाहत करण्याची खटपट केलेली व्यर्थ गेली म्हणून तिचे सर्व उपाय थकले असें कांहीं झालें नाहीं. **कॉलबेरनें** असें ताडलें कीं, आपला हेतु सिद्धीस जाण्यास मुख्य गोष्ट तें काम करण्याला चांगला हुशार मनुष्य पाहिजे. आजपर्यंत ज्यांना मुख्य अधिकार देऊन वसाहतीच्या कामगिरीवर पाठविलें ते केवळ यंत्रासारखे, सांगकाम्ये होते. तशांच्या हातून कांहीं होणार नाहीं. जो आपला आपण विचार करून त्याप्रमाणें आपल्या अंगावर घेऊन एकादें काम करील, ज्याला आपल्या बुद्धिचातुर्यानें एकादी गोष्ट करावीसें वाटेल आणि धाडसानें कांहीं बेत करून तो पार पाडण्याची अंगांत धमक असेल व जो धिमा, मेहनती, आणि निश्चयी, असा मनुष्य मिळेल तर काम होईल. असा मनुष्य पहातां पहातां सन १६६६ मध्यें तो आपल्याला मिळाला असें त्याला वाटलें. त्याचें नांव **फ्रान्सिस क्यारॉन**. तो फ्रेंच खरा परंतु त्याचा जन्म हालंड देशांत होऊन तो तिकडेच लहानाचा थोर झाला. पुढें ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरीस राहून तो मोठ्या पदवीस चढला. तो केवळ आपल्या बुद्धिबलानें वाढून योग्यतेस आला. परंतु पुढें **वटेव्हियामध्यें** सर्वांत थोरली, मोठ्या महत्वाची जी जागा ती त्याला मिळाली नाहीं. ती तुला देत नाहीं असें जेव्हां त्या कंपनीनें त्याला सांगितलें तेव्हां त्यानें राजीनामा दिला आणि तिची नोकरी सोडली. मग तो **कॉलबेर** जवळ जाऊन तुम्ही ठेवीत असाल तर चाकरीस रहातों म्हणाला. तें ऐकून **कॉलबेरला** आनंद झाला. त्यानें त्याची विनंती तत्काळ मान्य करून त्याला फ्रेंचांच्या हिंदुस्थानांतल्या व्यापाराचा डायरेक्टर जनरल नेमिलें, आणि सन १६६७ च्या अखेरीस नव्या स्वारीची तयारी करून देऊन त्याची हिंदुस्थानाकडे रवानगी केली.

**क्यारॉन** प्रथम मादागास्कर बेटांत उतरला. तेथची स्थिति पहातांना त्याच्या नजरेस असें आलें कीं, वसाहतवाल्यांची अगदीं दुर्दशा झालेली आहे; त्यांची स्थिति निकृष्ट असून प्रथम ज्या उद्देशानें तेथें ठाणें घातलें तो साधणें अशक्य आहे. मग तो तेथें आपला वेळ फुकट घालवीत बसला नाहीं. तेथून एकदम निघून त्यानें हिंदुस्थानची वाट धरली. तारीख २४ डिसेंबर रोजीं तो **कोचीन** बंदरांत येऊन लागला, तेथून पुढें **सुरतेस** गेला, आणि तेथें त्यानें हिंदुस्थानांतली फ्रेंचांची पहिली वखार घातली. तेथें आसपासच्या राजेरजवाड्यांबरोबर बोलण्याचालण्याला सोईचें पडावें म्हणून क्यारॉननें आपल्याबरोबर एक पर्शियन ( इराणी ) मनुष्य आणला होता. त्याचें नांव **मेरकरा**. त्याला त्यानें लागलेंच **गोवळकों**ड्याच्या नबाबाच्या दरबारीं पाठवून दिलें आणि इतर परदेशी लोकांना व्यापार करण्याला ज्या सवलती व हक्क मिळाले होते ते सर्व आपल्याला मिळावे आणि **मच्छलीपट्टण** येथें ठाणें देण्याला परवानगी मिळावी अशी हुजुरास विनंती करण्यास सांगितलें. त्याची तिकडे रवानगी करून **क्यारॉन** सुरतेंत स्वस्थ बसला नाहीं. तेथें व्यापार करूं लागून त्यानें पुष्कळ किमतीचा माल मादागास्कर बेटांत रवाना केला. याप्रमाणें चांगला व्यापार सुरू झाल्याची बातमी फ्रान्स देशांत जाऊन धडकली तेव्हां तेथच्या लोकांना संतोष होऊन उत्तेजन आलें, अत्युत्साह झाला. **लुई** राजानें संतुष्ट होऊन **क्यारॉन**ला **सेंट मिकेल** St. Michael चा चांद दिला.

इकडे **मेरकरा** गोवळकोंड्यास गेला होता त्यानें दरबारांत प्रवेश करून नबाबापासून **क्यारॉन**ला पाहिजे होतें तें तें संपादन केलें. त्याची विनंती कांहीं एकदम मान्य झाली नाहीं. अशा कामीं नेहमीं ज्या अडचणी येतात त्या आल्याच. परंतु इकडच्या लोकांच्या चालीरीति, स्वभाव वगैरेची त्याला चांगली माहिती असल्यानें त्यांतून तो पार पडला आणि **गोवळकों**ड्याच्या राज्यांत फ्रेंच कंपनीनें खुशाल व्यापार करावा, तिच्या आयात किंवा निर्गत मालावर जकात घेऊं नये असा फरमान तारीख ५ डिसेंबर सन १६६९ रोजीं नबाबाकडून त्यानें संपादन केला. त्याचप्रमाणें **मच्छलीपट्टण** येथें वखार घालण्यासही परवानगी घेऊन तो तिकडे चालता झाला.

**क्यारॉन**च्या आंगांत पुष्कळ चांगले गुण होते हें खरें परंतु एक वाईट गुण होता, तो घातक होता.—हा गुण फ्रान्स देशच्या लोकांच्या आंगांत अगदीं

खिळलेला असावा असें दिसतें. कारण त्यांनीं जितक्या लढाया केल्या तितक्या सगळ्यांत हाच बाधला. एवढा एक नसता तर त्यांनीं त्या लढाया जिंकल्या असत्या. तो गुण कोणता म्हणाल तर परोत्कर्षासहिष्णुता—मत्सर. ( Jealousy ) **मेरकरा**नें गोवळकोंड्यास जाऊन **क्यारॉन**च्या मनाप्रमाणें कामगिरी बजाविली याजबद्दल त्याला हर्ष वाटावा तो न वाटतां उलट त्याच्या मनांत त्याच्याविषयीं मत्सर उत्पन्न झाला. तो वाढतां वाढतां उघड उघड द्वेषभाव दिसूं लागला. **मेरकरा**नें आपल्याकडून झाली तेवढी खटपट करून पाहिलें, परंतु **क्यारॉन**च्या मनांत प्रज्वलित झालेला द्वेषाग्नि शांत होत नाहीं असें दिसलें तेव्हां त्यानें तो नाद सोडला आणि आपल्या पक्षाचे जे चार लोक होते ते बरोबर घेऊन एका फ्रेंच गलबतांत बसून तें **जाव्हा** बेटाकडे हांकारलें. त्यानें जातेवेळीं एवढें केलें कीं, **क्यारॉन**बरोबर जेवढा पत्रव्यवहार झाला होता तेवढा **कॉलबेर**कडे पाठवून दिला. त्यानें ते कागदपत्र कांहीं दिवसांनीं पाहून **क्यारॉन**नें त्याजवर जे काय आरोप केले होते ते निराधार म्हणून त्याला निर्दोषी ठरविलें.

सर्व प्रकारची जुळवाजुळव करून कोणत्याही कामाची व्यवस्था नीट लावावयाची हा गुण **क्यारॉन**च्या अंगीं विशेष होता. त्यावेळीं **सीलोन** ( Ceylon ) बेटाचा कांहीं भाग डच्च लोकांच्या ताब्यांत होता. तेथें त्यांच्या कांहीं वसाहती होत्या. त्यांवर त्याची नजर गेली आणि त्यानें **कॉलबेर**ला असें लिहून पाठविलें कीं, मला जर **सीलोन** बेटावर स्वारी करून तें घेऊं द्याल तर त्यापासून फ्रान्सला मोठा फायदा होईल. तो असा कीं, तें आपल्याला एक आधाराला स्थळ होईल आणि तेथून हिंदुस्थानावर हल्ला करण्यास जातां येईल. त्यानें आणखी असेंही लिहिलें कीं मीं आपल्या तर्फेचे कांहीं मनुष्य त्या बेटांत **क्यांडी**च्या राजाकडे पाठविले होते, त्यांनीं त्याची भेट घेऊन त्याचा अंतस्थ हेतु समजून घेतला आहे. त्याला माझा बेत पसंत आहे.

**कॉलबेर**लाही **क्यारॉन**चा बेत पसंत पडला. त्यानें **ला आय** ( Lahaye ) याच्या हाताखालीं कांहीं गलबतांचा एक काफला ( Squadron ) देऊन त्याला **क्यारॉन**च्या मदतीकरितां रवाना केलें. हा नवीन पाठविलेला मनुष्य चांगलासा हुशार नव्हता, सामान्य तऱ्हेचा होता, ही दुर्दैवाची गोष्ट होती. असो. तो जाऊन पोहोंचल्यावर त्या उभयतांनीं मिळून सन १६७२ च्या

हिंवाळ्यांत प्रथम **पॉइंट डि ग्याले** ( Point de Galle ) हें ठाणें घेण्याचा बेत केला. परंतु तेथें **डचांचें** सैन्य बरेंच होतें. त्यानें त्याला धुडकावून लावलें. ते तेथून निघून **त्रिंकोमालीवर** चालून गेले, आणि ती घेऊन तेथचा बंदोबस्त करून बसतात न बसतात इतक्यांत **डच्च** लोकांचें एक मोठें आरमार आपल्यावर येत असल्याचें त्यांच्या दृष्टीस पडलें, तेव्हां **ला आय** घाबरून गेला. आपली आतां धडगत नाहीं असें वाटून सुदैवानें हातीं आलेलें तें ठाणें सोडून देऊन तो आपलें आरमार हाकारून उत्तरेकडे निघाला. **डच्च** आरमार येऊन त्रिंकोमाली परत घेण्यांत गुंतलें आहे तों त्यानें **सें तॉमे** बंदरांत नांगर टाकून त्यांचें तें ठाणें बळकावलें. **सें तॉमे** हें लहानसें ठिकाण **मद्रास**पासून जवळच आहे. पहिल्यानें तें पोर्तुगीज लोकांनीं घेतलें होतें, परंतु या वेळीं डच्च लोकांच्या ताब्यांत होतें. **ला आय**नें हल्ला करून तें सहज घेतलें. त्याचे त्या हल्ल्यांत सारे पांच शिपाई मेले.

फ्रान्समध्यें जितकीं प्रधानमंडळें ( Governments ) झालीं तितक्यांच्या दुर्दैवानें नेहमीं असें घडत आलें कीं, कोणत्याही गोष्टीच्या बरेवाईटपणाचा विचार करावयाचा तो तीं तिची अखेर कशी झाली एवढें पाहून करीत आलीं. ती गोष्ट करणारा आपला मुक्त्यार ( Agent ) कोणत्या हेतूनें ती करीत होता, त्याला साधनें, सामुग्री कशी काय होती, तिचा त्यानें कशा प्रकारें उपयोग करून घेतला वगैरे गोष्टींची त्यांनीं कधीं चौकशी केली नाहीं, त्या नीटपणें मनांतही आणल्या नाहींत. तीं फक्त परिणाम काय झाला येवढें पहात आणि दुर्दैवानें तो विपरीत झाला असला म्हणजे तें अपेश त्या मुक्त्याराच्या माथीं मारीत. **क्यारॉन**च्या प्रकरणांत असेंच झालें. **सीलोन**वर स्वारी केली असतां मोठा फायदा होईल असें त्याला वाटलें होतें परंतु तो डाव फसला. **डच्च** आरमारानें त्याच्या पाठोपाठ येऊन **त्रिंकोमाली** परत घेऊन तेथच्या बंदोबस्तास जे फ्रेंच शिपाई होते त्या सर्वांस धरून कैद केलें. एकंदरींत पहातां पुष्कळ पैसा खर्च होऊन, मनुष्यें कामास येऊन, फळ काय आलें, तर एक **मच्छलीपट्टण** येथें ठाणें पडलें, वखार झाली, पण तें सारें **मरकारा**च्या कर्तबगारीनें- दुसरें **सें तॉमे** हें ठिकाण हातीं आलें. पण तें कोणाला ठाऊक नव्हतें; त्याचें नांवही कोणी ऐकलेलें नव्हतें. असें झालें तेव्हां कंपनीच्या प्रमुख मंडळींनीं

( Directors ) प्रधानाकडे जाऊन **क्यारॉनला** परत बोलावण्याचा आग्रह धरला. त्यानें त्याला कामावरून काढला आहे असें साफ लिहिलें नाहीं, परंतु मनांत दुसरे कांहीं बेत योजून ते त्याला न कळवितां, गोड शब्दांनीं लिहून फ्रान्सला निघून ये, असा हुकूम पाठविला. हुकुमाप्रमाणें तो यावयास निघून **जिब्राल्टर**च्या सामुद्रधुनींतून आंत शिरून थोडासा पुढेंही गेला तों त्याला एक फिरस्तें गलबत भेटलें आणि अशी बातमी कळली कीं, आपलें नशीब फुटलें, प्राणावर बेतणार. तें ऐकल्याबरोबर त्यानें सुकाणूं फिरविलें आणि **लिस्बन**ची वाट धरली. परंतु तो **टेगस** नदींत शिरत असतां तें गलबत एका खडकावर आपटून फुटलें आणि तत्काळ बुडालें. याप्रमाणें दुर्दैवानें आलेल्या त्या भयंकर प्रसंगांतून **क्यारॉन**च्या पुत्रांपैकीं एक असामी काय तो जगला.

**क्यारॉन** हिंदुस्थान सोडून निघून गेला तेव्हां फ्रेंच कंपनीच्या इकडच्या कामाची सारी जबाबदारी **एम. एम. ला आय** आणि **बॉरन** ( Baron ) या दोन असामींवर पडली. त्या उभयतां गृहस्थांनां आपली स्थिति खरोखर फार भयंकर आहे असें वाटलें. **डच** लोकांचें आरमार मोठें, त्यांची शक्ति जबर, त्यांनीं **त्रिंकोमाली** क्षणांत परत घेतली; आतां ते **सें तॉमे** घेतल्याशिवाय रहात नाहींत अशी त्यांना मोठी धास्ती पडून ते अगदीं घाबरून गेले. जेथें बसलें असतां दुसऱ्या कोणत्याही युरोपियन राष्ट्राचा उपसर्ग लागण्याची भीति नाहीं असें निर्वेध स्थान आपल्याला रहाण्याला कसें मिळतें ह्या काळजींत ते पडले. मग त्यांनां उपाय सुचला. **एम्. फ्रान्सिस मार्टिन** म्हणून त्यांच्या हाताखालचा एक अम्मलदार होता त्यावर **क्यारॉन**चा मोठा भरंवसा असे. तो मोठा बुद्धिमान्, हुशार असल्यानें तेही त्याला मानीत असत. त्याला त्यांनीं असें सांगितलें कीं, तूं कोणातरी राजाकडे जाऊन, कसें तरी करून आपल्याला रहाण्याला थोडीशी जमीन मिळाली तर पहा. तेथें घरें बांधून तजविजीनें तटबंदी केली म्हणजे तें दक्षिणहिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावरील फ्रेंचांच्या मुलखाचें मुख्य ठाणें करतां येईल.

**मार्टिन** तें काम पत्करून लागलाच निघाला. तो विजापूरच्या बादशहाचा कर्नाटकचा सुभेदार **शेरखान लोदी** म्हणून होता त्याजकडे गेला. त्याच्याशीं संधान लागून बोलणें होऊन अखेर **अर्काट** प्रांताच्या दक्षिण भागांत ( जि-

ल्ह्यांत ) समुद्रकिनाऱ्यावर जागा खरेदी करण्यास त्यास परवानगी मिळाली. त्यानें लागलाच ११३ चौरस मैल प्रदेश खरेदी केला. **पुडुचेरी, विलनूर,** आणि **बाहूर** या नांवांचे प्रांत याच प्रदेशांत आले. **पुडुचेरी** हें लहानसें खेडें असून दक्षिणेकडचें इंग्लिशांचें मुख्य ठाणें जें **मद्रास** त्यापासून ८६ मैलांवर त्याच्या दक्षिण नैर्ऋत्य दिशेस ( south-south-west ) होतें. ह्या खेड्याची तेथून ऊर्जितावस्था आली. हाल्लीं **पांदीशरी, पाँदीश्री,** ह्या नांवानें सर्वत्र प्रसिद्ध असलेलें शहर तें हेंच. त्याच्यावरून त्या साऱ्या प्रदेशाला तेंच नांव पडलें. खरेदी विक्रीबद्दल कागदपत्र पुरे होऊन ते सुभेदारानें मंजूर केले तेव्हां **मार्टिनचें** काम शेवटास गेलें. मग तो फत्ते झाल्याचें वर्तमान आपल्या वरिष्ठांस कळविण्याकरितां **सें टॉमे** येथें परत आला. तो येऊन पहातो तर त्या ठाण्याला समुद्राच्या बाजूनें **डच** आरमारानें वेढा दिला आहे आणि जमिनी-वर गोवळकोंड्याच्या बादशहाच्या फौजेचा वेढा पडला आहे. ठाण्यांत ६०० शिपाई होते, त्यांनीं कांहीं काळपर्यंत मोठ्या हिमतीनें लढून आपलें रक्षण केलें. परंतु पुढें अन्नसामुग्री संपली तेव्हां त्यांच्यावरील अम्मलदारांना तोडजोडीस येऊन तें शत्रूच्या स्वाधीन करणें भाग पडलें. शत्रूशीं त्यांचे जे करार झाले ते अगदीं त्यांच्या मनाप्रमाणें झाले. लढाईला निघाल्याप्रमाणें प्रतिष्ठेनें तें ठाणें सोडून पाहिजे तिकडे जाण्यास शत्रूंनीं त्यांना परवानगी दिली. मग त्यांनीं तें ठाणें लागलेंच सोडलें. त्यांच्यापैकीं बहुतेक लोक **ला आय** आणि **ब्यॉरन** यांच्या हाताखालीं राहून त्यांच्या बरोबर सुरतेस गेले. साठ असामी तिकडे गेले नाहींत. ते त्या पाणीदार **मार्टिनच्या** हाताखालीं राहून त्यानें मिळविलेल्या **कोलेरून** नदीपलीकडील नवीन मुलखाचा कबजा घेण्यास निघाले. ते सन १६७४ च्या एप्रिल महिन्यांत तेथें जाऊन पोहोंचले.

जेथें ठाणें देऊन पुढें थोड्याच दिवसांनीं फ्रेंच लोक प्रबळ झाले आणि साऱ्या दक्षिणहिंदुस्थानांत आपलें प्रमुखत्व गाजवून इंग्रज लोकांना तेथून घालवून देऊं पहात होते, त्या फ्रेंच वसाहतीची स्थापना याप्रमाणें **फ्रान्सिस मार्टिन** यानें केली. तो विलक्षण बुद्धिमान् मनुष्य होता. हाताखालच्या लोकांवर हुकुमत कशी चालवावी, त्यांना उत्तेजन कसें द्यावें, स्फुरण कसें आणावें आणि अधिकार कसा चालवावा, हें त्याला कळत होतें. प्रथमतः तो मोठ्या अडचणींत होता.

तो आणि त्याच्या बरोबरचे ते ६० असामी मिळून एक लहानशी टोळी असून ते परदेशी लोक नव्या मुलखांत येऊन पडले होते. त्यांचें बरेंवाईट होणें बहुतेक अंशीं तेथच्या रहिवासी लोकांच्या हातीं होतें. **डच** लोकांचें आरमार समुद्र-किनारा धरून फिरत होतें तें त्यांना युरोपाकडची कांहीं वार्ता देखील समजूं देत नसे. **पांदीशरी** ( पाँदीश्री ) या नांवानें प्रसिद्ध असें दक्षिण हिंदुस्थानांतील फ्रेंच वसाहतीचें मोठें सुंदर, टुमदार मुख्य शहर आहे. त्याचें पहिलें नांव **पुदुचेरी** असें असून तें एक अगदीं लहानसें खेडें होतें; तें **मार्टिननें** आपलें रहाण्याचें मुख्य ठिकाण केलें. त्यांत युरोपियन लोकांना रहाण्यासारखी सोय म्हटली तर कांहींच नव्हती. परंतु दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें तर तें स्थळ अगदीं मनासारखें, असावें तसें होतें. त्याला वाऱ्यापावसाची भीति नव्हती. त्याला तटबंदी करूं म्हटलें तर सहज करतां येण्यासारखी होती. तेथची हवा अतिशय आरोग्यकारक, शरीराला चांगली मानवणारी होती, आणि तेथून आंतल्या मुलखाशीं व्यापारधंदा करण्याला मोठी सोय होती. मार्टिननें प्रथम आपल्या लोकांना रहाण्याला घरें बांधण्याला परवानगी मिळवण्याचें काम हातीं घेतलें. सुदैवानें त्या वेळीं त्याच्या हातांत त्या कामाला पुरेसा पैसा होता. एतद्देशीय लोकांशीं तो अशा नेकीनें वागत होता कीं त्या योगानें त्यांचा त्याच्यावर विश्वास बसून ते त्याला मोठा मान देऊं लागले. डच लोकांच्या आरमारानें जी अगदीं नाकेबंदी केली होती ती हळू हळू सईल पडत गेली आणि पुढें ती साफ उठली. मग युरोपांतून त्या बंदरांत गलबतें येऊं लागलीं. आंतल्या मुलखाशीं कापडाचा व्यापार सुरू झाला. दक्षिणेंतील राजेरजवाड्यांच्या आपसांत एकमेकांशीं लढाया चालतच होत्या, परंतु त्यांपासून ह्या फ्रेंच वसाहतीला कांहीं उपसर्ग लागत नव्हता. तिची भरभराट फार जलद होत गेली. पुढें हळु हळु तिच्या संरक्षणाकरितां इकडचे शिपाई चाकरीस ठेवण्याची **मार्टिननें** परवानगी मिळविली. याप्रमाणें काल-क्रमण करतां करतां दोन वर्षें लोटलीं तों **मार्टिनला** आतां मी दरसाल निदान दहा लाख फ्रांक किमतीचा माल तुम्हाला पाठवीन असें फ्रेंच कंपनीला कळविण्याची ऐपत आली.

याच्या पुढच्याच वर्षीं एक कठीण प्रसंग आला. **शिवाजी** महाराजांनीं कर्नाटकावर स्वारी केली, तेव्हां ते मद्रासेजवळून गेले. **जिंजीचा** किल्ला, जो

मोठा मजबूद म्हणून प्रसिद्ध तो त्यांनीं घेतला. **शेरखान लोदीशीं** समरांगणीं लढून त्याचा पराभव केला आणि फ्रेंच लोक त्याचे स्नेही म्हणून त्यांचा समूळ नाश करण्याची भीति घातली. परंतु **मार्टिन** प्रसंग ओळखून त्याप्रमाणें वागणारा होता. त्यानें आपल्या मंडळीची जी काय मौल्यवान चीजवस्त होती ती **मद्रासेस** पाठवून दिली आणि मग आपला एक स्नेही सरदार शिवाजीकडे पाठवून त्याच्या मार्फत असें बोलणें लावलें कीं मी मराठ्यांचा ताबेदार आहें असें संतोषानें कबूल करतों आणि व्यापार करण्याची परवानगी मागतों. त्याजबद्दल काय मागाल तें देतों. **शिवाजीनें** तो शरण आला म्हणून त्याला अंकित करून सोडलें, कांहीं उपद्रव दिला नाहीं. पुढें थोडक्याच काळांत शिवाजीची स्वारी निघून गेली तेव्हां त्या संकटाचें सहजच निवारण झालें.

पुढें त्या नूतन वसाहतीची वर्षानुवर्ष कशी भरभराट होत गेली तें येथें सांगत बसण्याचें प्रयोजन नाहीं. एवढें सांगितलें म्हणजे पुरे आहे कीं **पारीस** येथून कंपनीकडून जरी कांहीं मदत होत नव्हती तरी **मार्टिन** यानें आपल्या हिमतीवर तेथचा अधिकार शहाणपणानें चालवून तिला चांगल्या नांवारूपास आणलें. **पुदुचेरी** (पाँदीश्री) हें जें मूळचें एवढेंसें खेडें होतें त्याची हळु हळू सुधारणा करीत करीत, त्यांत चांगल्या पेठा करून, त्यानें त्याचें सुंदर शहर बनविलें. हें करण्याला त्याला फ्रान्सांतून कांहीं लोकांची भरती मिळाली असेल म्हणावें तर तें मात्र झालें नाहीं. उलट त्याच्या बरोबर प्रथम जे साठ असामी तेथें आले होते त्यांतला एक एक मरत जाऊन कमी होत होत अखेर सन १६८९ मध्यें सारे ३६ शिल्लक राहिले. या वेळीं **तंजावर**च्या राजानें कृपा करून शहराभोंवती चांगली तटबंदी करण्यास परवानगी दिली. त्या योगानें त्यास निराळेंच रूप आलें; असें एका (capuchin monk) **क्यापुचिन** जोग्यानें लिहून ठेविलें आहे. आतां ही वसाहत चांगलीच भरभराटीस येणार असें त्या किनाऱ्याला जाणारे येणारे दर्यावर्दी लोक म्हणूं लागले. तसें होण्याला एकाच गोष्टीची न्यूनता होती. ती कोणती तर फ्रान्सचे लोक तिच्याकडे लक्ष देत नव्हते.

याप्रमाणें **पाँदीशरी**ची जी कीर्ति बाहेर पसरत चालली तीच अखेर तिच्यावर संकट येण्यास कारण झाली. आपल्याशीं स्पर्धा करणारे जे परदेशचे व्यापारी आहेत त्यांचें अगदीं समूळ उच्चाटण करून टाकावें असा सन १६९३

मध्यें अगदीं निश्चय करून डच्च लोकांनीं एक भलें मोठें आरमार तयार करून हिंदुस्थानाकडे रवाना केलें, त्यामध्यें पहिल्या प्रतीचीं लढाऊ गलबतें ( ships of the line ) १९ असून त्यावर पायदळचे लोक १५०० होते. शिवाय खलाशी लोक होते ते निराळेच. तें आरमार युरोपांतून जें निघालें तें त्याच वर्षीं आगस्ट महिन्याच्या अखेरीस **पाँदीशरी**पुढें येऊन धडकलें. एवढा जबर हल्ला सहन करण्याची शक्ति **मार्टीन**च्या अंगीं नव्हती. त्याचें निवारण करण्याला अन्य साधनेंही कांहीं चांगलीशीं नव्हतीं. त्याच्याजवळ युरोपियन लोक सारे ३६ होते. कवाईत शिकवून तयार केलेले इकडचे शिपाई तीनचारशें होते, आणि सहा तोफा होत्या. परंतु तेवढ्याच बळावर निकरानें लढून आपलें रक्षण करण्याचा त्यानें निश्चय केला. परंतु शत्रु अति बलाढ्य पडला. त्याच्यापुढें निभाव कसा लागणार ! तरी बारा दिवसपर्यंत त्यानें टिकाव धरला आणि तेराव्या दिवशीं म्हणजे तारीख ६ सप्टंबर रोजीं नाइलाज होऊन दोन दिवस लढाई तहकूब ठेवा असें त्यानें बोलणें लावलें. तें मान्य होऊन लढाई थांबली. दोन दिवस गेले, आणखी दोन गेले, आणि शेवटीं त्यानें किल्ला शत्रूच्या स्वाधीन करण्याचें कबूल केलें. त्या वेळीं असें ठरलें कीं **मार्टीन** आणि त्याच्याबरोबर असलेले त्याचे देशबंधु जे फ्रेंच लोक त्यांस त्या वर्षीं किंवा पुढच्या वर्षाच्या आरंभीं फ्रान्स देशास गलबतांतून पोहोंचवून द्यावें. तेथपर्यंत त्यांनीं तें ठाणें सोडून बाहेर जाऊन रहावें. त्या कराराप्रमाणें ते बाहेर पडले. त्यांना शत्रूंनीं सर्व लष्करी सन्मानानें जाऊं दिलें. एतद्देशीय शिपाई होते त्यांना फक्त कमी केलें.

याप्रमाणें **पाँदीशरी**च्या त्या लहानशा वसाहतीला शत्रूंनीं जो तडाका दिला तो फार जबर, तिची कंबर मोडणाराच होता. आतां ती पुनः डोकें वर करील असें मनांत देखील आणायाला नको होतें. परंतु अखेर पहातां तो तडाका तिला हितावहच झाला. ‘ कीं तोडिला तरु फुटे अधिका भरानें ’ या कविवचनाप्रमाणें पुढें घडून आलें. **मार्टीन** आणि त्याच्याबरोबरची मंडळी यांची कराराप्रमाणें फ्रान्सास रवानगी झाली. तेथें पोहोंचल्यावर राजानें आणि कंपनीच्या डायरेक्टरांनीं **मार्टीन**चें स्वागत फार आदरानें, अत्यंत मनःपूर्वक केलें. डायरेक्टरांनीं आपल्या गुमस्त्याची योग्यता खरी त्या वेळीं पहिल्यानेंच ओळखिली असें दिसतें. पुढें चार वर्षांनीं म्हणजे तारीख २१ सप्टंबर सन १६९७

रोजीं यूरोपमध्यें **रिसविक**चा तह झाला. त्यांत **पाँदेशरी** फ्रेंचांना परत देण्याचें ठरलें, तेव्हां पुनः मार्टिनची तेथचा गव्हर्नर म्हणून नेमणूक करून त्यांनीं त्याला तिकडे पाठविलें. या वेळीं त्यांनीं त्याच्याबरोबर २०० कवाइती शिपाई ( regular troops ) कित्येक एंजिनीअर, युद्धोपयोगी असें पुष्कळ सामान, कितीएक जड लढाऊ तोफा आणि त्या वसाहतीच्या उपयोगीं पडणारें पुष्कळ इतर सामान भरपूर देऊन पाठविलें.

**मार्टिन** आतां फक्त **पाँदीशरी**चा गव्हर्नर होऊन राहिला नाहीं. सन १७०१ च्या फेब्रुआरी महिन्यांत राजानें त्याला सनद ( Letters patent ) देऊन हिंदुस्थानांतील फ्रेंचांच्या ताब्यांतील सर्व मुलखाचा गव्हर्नर जनरल नेमिलें. त्या वेळीं फ्रेंचांचीं ठाणीं इतकीं होतीं—१ **मच्छली**पट्टण येथें **मेरकरा**नें मिळविलेला एक जमिनीचा लहानसा तुकडा. सुमारे सहा एकर. त्याला फ्रेंच पाटा म्हणत. २ **सुरतेस** वखार घातलेली होती ती जागा सुमारें आठ एकर. ही मोडकळीस आली होती आणि १७१४ मध्यें त्यांनीं सोडून दिली. ३ कलकत्त्यापासून खालीं २२ मैलांवर **हुगळी** नदीच्या उजव्या बाजूस **चंद्रनगर**. प्रथम थोड्याशा फ्रेंच लोकांनीं सन १६७६ मध्यें हें ठाणें घेतलें. पुढें सन १६८८ मध्यें **औरंगजेब**बादशहानें तें त्यांना बहाल केलें. ४ **कलिकत, बलसोर, डाका, पाटना, काशीमबझार** आणि **जोगडिया** ह्या सहा ठिकाणचे जमिनीचे लहान लहान तुकडे. हे सारे मिळून सुमारें ४६ एकर होते.

हिंदुस्थानांतल्या वसाहतींची चांगली भरभराट होण्याला व त्यांपासून फायदा होण्याला कंपनीच्या डायरेक्टरांनीं **मार्टिनला** जितकें पाठबळ आणि मदत द्यावयास पाहिजे होती तितकीं त्यांना देतां आली नाहीं. कारण दुर्दैवेंकरून मादागास्करच्या वसाहतीच्या कामीं त्यांना जबर ठोकर लागली असल्यानें त्यांच्याजवळ पैसा नव्हता. परंतु **मार्टिन** कांहीं त्यामुळें हातपाय गाळून बसला नाहीं. तो अनिवार्य संकटांतूनही पार पडत होता. **पाँदीशरी** शहर आणि ज्याच्यावरून तेंच नांव त्या वसाहतीला पडलें ती वसाहत त्यानें इतक्या ऊर्जितावस्थेस आणि भरभराटीस आणून सोडलीं कीं, तारीख ३० डिसेंबर सन १७०६ रोजीं तो मेला तेव्हां त्याच्या आसपास ४०००० एतद्देशीय लोकांची वस्ती

झालेली होती. फ्रान्सदेशाशीं व्यापार चालविल्यानें दोन पैसे मिळत होते म्हणून हे इतके लोक येथें येऊन राहिले होते. इतकेंच नव्हे, आसपासच्या मुलखांतील राजेरजवाड्यांत फ्रेंचांचें वजन फार मोठें पडत होतें. फ्रेंचांशीं मिळून रहाण्यांत तुमचा नफा आहे असें सांगून व त्यांच्या थोरपणाची वाखाणणी करून, त्यांनां फुगवून राजेरजवाड्यांचीं मनें आपल्याकडे आकर्षून घेऊन त्यांची मर्जी संपादन करून असावयाचें, हा तर **मार्टिन**चा बाणा होता. तो आपल्या सर्व व्यवहारांत ही गोष्ट मुख्य समजत असे. त्यामुळें त्याची भरभराट झालेली पाहून त्याच्याविषयीं कोणाला हेवा उत्पन्न झाला नाहीं किंवा त्याची भीतिही वाटली नाहीं. उलट त्याचा सर्वांनां संतोषच होत होता आणि ते खुष असत. फ्रेंच लोकांच्या मध्यस्थीनें आणि त्यांनां भिडेस घालून तेथचे पुष्कळ लोक आपले तंटे तोडून घेत. **मार्टिन**ला लोक किती मानीत होते हें तो मेला तेव्हां उत्कृष्ट तऱ्हेनें दिसून आलें.

फ्रेंच कंपनीला सन १६६४ मध्यें चौदाव्या **लुईनें** सनद करून दिली होती, तींत पन्नास वर्षांची जी मुदत होती ती **मार्टिन** मेल्यावर आठ वर्षांनीं संपली. त्यापूर्वीं बरेच दिवस ती कंपनी मृत्युपंथाला लागली होती. ती मुदत संपण्यापूर्वीं दोन वर्षें तर तिची इतकी हलाकी झाली होती कीं, जवळ पैसा नाहींसा झाल्यामुळें तिला पूर्वेकडील देशाशीं व्यापार करण्याचा आपला हक्क दरसाल कांहीं रक्कम घेण्याच्या करारानें **सेंट मलो** येथील व्यापाऱ्यांस देऊन टाकणें भाग पडलें. इतकी विपन्नावस्था आली तेव्हां तिचे जे सहज परिणाम व्हावयाचे ते हिंदुस्थानांतही घडून आले. सुरतेस जें कर्ज काढलेलें होतें त्याची फेड होण्याची राहिली. मार्टिन मेल्यावर **मेस्य द्युली व्हे** आणि **हेबर्ट** नांवाचे जे दोन असामी **पाँदीशरी** येथें त्याच्या जागेवर येऊन तेथचें काम करीत होते ते जरी त्यानें घालून दिलेल्या कित्त्यानें चालत होते तरी इकडचा माल तिकडे पाठविण्याचें काम पहिल्याप्रमाणें चालेनासें झालें, त्यामुळें ते अगदीं ओढघस्तीस आले. चालढकल करीत कष्टानें कशीं तरी दहा वर्षें काढल्यावर देखील आतां पुढें तरी बरे दिवस येतील म्हणण्याची कांहीं आशा दिसेना. ती दहा वर्षांची मुदत भरण्याच्या जरा आधीं कंपनीला आणखी दहा वर्षांची मुदत मिळवून देण्यापुरतें तिच्या मित्रमंडळीचें वजन होतें आणि त्यांच्या वशील्यानें तेवढें

झालें हें खरें आहे. त्यांच्या खटपटीनें मुदत मिळाली तरी तिची अवस्था अर्धांग-वायूनें ग्रस्त झालेल्या मनुष्याप्रमाणेंच झाली. सन १७१५ मध्यें सनदेची मुदत वाढली, परंतु त्याच वर्षाच्या सप्टेंबर महिन्यांत चौदावा **लुईराजा** वारला आणि **ऑर्लियन्स**चा ड्यूक राजाचा मुक्त्यार म्हणून तत्स्थानापन्न झाला. तो राजपदाचा मोठा थोरला अधिकार त्याच्या हातीं गेल्यापासून एका महिन्याच्या आंत एक तरुण स्कॉच मनुष्य **पारीस** शहरांत चमकूं लागला. त्यानें आपल्या अलोट बुद्धिप्रभावानें कांहीं वर्षेंपर्यंत तेथच्या सर्व प्रतींच्या लोकांचीं मनें आकर्षून टाकलीं होतीं. त्यानें ज्या युक्त्या काढल्या त्यांच्यायोगानें एकंदर व्यापाराला नवा जोम येईल असें दिसूं लागलें. त्याचें नांव **लॉ** ( Law ).

त्या वेळीं फ्रान्साची हिंदुस्थानांत जीं मागें सांगितलेलीं लहान लहान ठाणीं होतीं त्यांशिवाय यूरोपाबाहेर त्या देशाचा मुलुख होता. सन १५२५ मध्यें त्यानें कानडा प्रांत मिळविलेला होता आणि सन १६८२ मध्यें **लुईसिआना देश** * शोधून काढून तो घेतला होता. सन १७१७ च्या आगस्ट महिन्यांत **लॉनें** एक कंपनी काढून लोकांपुढें आणली. तिचें नांव पश्चिमची कंपनी ( Company of the West ) असें ठेविलें होतें. तिचें भांडवल दहा कोट फ्रांक होतें. **कानडा** आणि **लुईसिआना** ह्या देशांशीं २४ वर्षेंपर्यंत तिनें एकटीनें व्यापार करावा, दुसऱ्या कोणीं करूं नये असा तिला मक्ता मिळाला होता. सुमारें दोन वर्षेंपर्यंत ही कंपनी लोंबत ठेऊन **लॅ।** फ्रान्स देशाच्या जवळच दुसऱ्या कांहीं खटपटी करण्यांत गुंतला होता. त्या उलाढाली सफळ न झाल्यानें मोठें नुकसान होऊन लोक त्याच्या नांवानें रडत बसले. तथापि सन १७१९ च्या मे महिन्यांत त्यानें पश्चिमच्या कंपनीचें काम पुनः हातीं घेतलें, आणि त्या राज्यकर्त्या मुक्त्यार ड्युकाचें मन वळवून त्याच्याकडून एक हुकूम सोडविला. त्या हुकमानें हिंदुस्थानांतल्या आणि चिनांतल्या मरणोन्मुख झालेल्या कंपन्यांचे सर्व हक्क रद्द करून तेच हक्क, त्यांच्या ताब्यांत असलेले सर्व मुलुख आणि त्यांनीं लोकांचें काय देणें होतें तें—सारांश त्या कंपन्यांनीं आजपर्यंत मिळविलेल्यांतलें जें काय उरलें होतें तें आणि त्यांनीं देणें होतें तें सर्व—त्या

* Lousiana हा प्रदेश ( हाल्लीं संस्थान ) उत्तर अमेरिकेंत युनायटेड-स्टेट्स मध्यें मिसिसिप्पी नदीच्या मुखाजवळ आहे.

पश्चिमच्या कंपनीला दिलें. त्या हुकमाच्या अकराव्या कलमांत असें होतें कीं त्या कंपनीचें नांव आजपासून ( Company of the Indies ) हिंदुस्थानची कंपनी असें ठेवावें.

प्रथम प्रथम कांहीं थोडे दिवस असें दिसत होतें कीं, ही नवी कंपनी चांगलीच भरभराटीस येईल. तिच्या भागांची किंमत भराभर इतकी चढली कीं, त्यांवर शेंकडा २०० प्रमाणें आकार जास्त येऊं लागला. तिनें सरकारापासून ४०२०००० फ्रांकांनां तंबाकूची खोती खरेदी केली. हा मक्ता तिला इतका फायदेशीर झाला कीं, त्यापासून तिला दरसाल आठ लक्ष फ्रांक उत्पन्न होऊं लागलें. म्हणजे सन १७२५ मध्यें कंपनीचें जें एकंदर भांडवल ठरलें होतें तेवढ्यावर शेंकडा ८ प्रमाणें व्याजाच्या रकमे इतकें झालें. परंतु दुर्दैवानें थोड्याच काळांत तिच्यावर कठीण प्रसंग आला. सन १७२० च्या उन्हाळ्यांत तिचा जीव घाबरला. तिच्या भागांची किंमत अतोनात उतरली. जी पहावी त्या गोष्टीवरून असें चिन्ह दिसूं लागलें कीं, ही आतां बुडते. अशा ऐन कठीण प्रसंगीं त्या हिंदुस्थानच्या कंपनीचे डायरेक्टर सरकारी ब्यांकेच्या ( Royal Bank ) किमतींत उतरलेल्या साऱ्या नोटा खरेदी करण्याला पुढें सरसावले. आपल्या कंपनीला जे हक्क मिळालेले आहेत ते जर कायमचे ठरतील तर आपण दरमहा पांच कोट फ्रांकप्रमाणें बारा महिने देतों ते घेऊन नोटा बुडवाव्या असें ते म्हणूं लागले. सरकारानें त्यांचें बोलणें मान्य केलें आणि हिंदुस्थानच्या कंपनीस दिलेले हक्क तिजकडे सतत चालतील, ते कायमचे दिले आहेत असा ठराव प्रसिद्ध केला. तेव्हांपासून त्या कंपनीनें आपलें नांव हिंदुस्थानची कायमची ( Perpetual ) कंपनी असें ठेविलें.

परंतु याप्रमाणें त्या कंपनीच्या स्थितींत फेरफार झाला तो तिला सर्व हक्क कायमचे मिळाले एवढ्यावर संपला नाहीं. त्याच वर्षीं आक्टोबर महिन्यांत सरकार पुनः नक्तीची देवघेव करूं लागलें. तेव्हां त्यानें त्या कंपनीचा आणि सरकारी पेढीचा ( Royal Bank ) संबंध तोडून टाकला. मग ती व्यापारी मंडळी म्हणून आपली व्यवस्था हवी तशी लावण्यास मोकळी झाली. सरकाराशीं संबंध राहिला नाहीं. पुढें थोड्याच काळांत **लॉ** काम सोडून बाजूस झाला तेव्हां त्या कंपनीचें कामकाज कसें चाललें आहे याची चौकशी सरकारानें एक बोर्ड ( मंडळी ) नेमून केली. त्या बोर्डानें तपासणी करून देण्याघेण्याची वजावाट

करून आणि फेरफार करून अखेर सन १७२३ मध्यें असें ठरविलें कीं, आतां हिचें भांडवल ११२०००००० फ्रांक, भाग ५६००० आणि ही खासगी व्यापारी मंडळी आहे. पुढें दोन वर्षें गेल्यावर त्यांपैकीं ५००० भाग आणि एक कोट फ्रांक भांडवल कमी झालें. नाणें पाडणें, सरकारचा सारा वसूल करणें इत्यादि जे मोठमोठे हक्क **लॉनें** तिला मिळवून दिले होते ते सारे गेले. फक्त एक तंबाकूचा मक्ता तिच्याकडे राहिला, आणि ती सतत चालावी अशी परवानगी मिळाली होती ती कायम राहिली. इतर बाबतींत पाहिलें तर सन १६६४ मध्यें **कॉलबेरनें** प्रथम कंपनी स्थापली तेव्हांची तिची जी स्थिति होती तीच आतां पुनः आली.

इकडे हिंदुस्थानांत **पाँदीशरीस** कंपनीचे गुमस्ते होते पण त्या वसाहतीला **मार्टिननें** ज्या योग्यतेस आणून ठेविलें होतें ती कायम राखण्याला त्या गुमस्त्यांच्या जवळ पाहिजे तशीं साधनें नव्हतीं. तरी ते आपली पराकाष्ठा करीत होते. सन १७१८ मध्यें **हेबर्टच्या** जागीं **मस्य दला प्रॉव्हॉस्त्येर** ( M de la Provostiere ) आला होता तो सन १७२१ मध्यें मेला, तेव्हां तो अधिकार **मस्य लेन्वार** ( M. Lenoir ) चालवूं लागला. तो मनुष्य हुशार, बुद्धिमान आणि हिम्मतदार असल्यानें काम मागच्यापेक्षां चांगलें चालूं लागलें. **लॉनें** स्थापना केलेल्या कंपनीनें काम सुरू करतांच तीन गलबतें चांगल्या पुष्कळ किमतीच्या मालानें भरून हिंदुस्थानाकडे रवाना केलीं होतीं तीं **लेन्वार** अधिकार चालवूं लागतो आहे इतक्यांत म्हणजे अगदीं आणीबाणीच्या वेळेला येऊन पोहोंचलीं. कारण यावेळीं **पाँदीशरीच्या** वसाहतीची पत अगदीं नाहींशी झाल्यासारखी होती. सुरतेस आणि मागें सांगितलेल्या इतर लहान लहान ठाण्यांत वखारी होत्या तेथें कर्ज काढलेलें होतें त्याची फेड न झाल्यानें तें देणारे सावकार कंपनीच्या नांवानें फार ओरडूं लागले होते. आतां गलबतें आलीं आहेत यांतील माल विकून जो नफा येईल त्यांतून कर्ज फेडून टाकून आपल्या कंपनीची पत पूर्ववत् राखतां येईल असें **लेन्वार** यास वाटलें आणि त्याप्रमाणें त्यानें केलें. पत राखण्याचा तो उपाय मोठा होता आणि वेळेवर झाला हें खरें, परंतु त्याचा परिणाम फार काल टिकणारा नव्हता. **पारीसमध्यें** कंपनीजवळ पैसा नाहींसा झाला. आणि त्यामुळें तिची जी अपेष्टा झाली ती इकडे हिंदुस्थानांतल्या वसा-

हतीलाही जाणवली. कारण पुढच्या तीन वर्षांत युरोपांतून एकही जहाज इकडे माल घेऊन आलें नाहीं. सन १७२३ मध्यें वसाहत अगदीं निकृष्ठावस्थेस येऊन पोहोंचली. तिजवरील मुनिमांजवळ पैसा नाहीं, माल नाहीं आणि दुसरीं कांहीं साधनेंही नाहींत अशी दशा झाली होती. **लेन्वार** मुख्य अधिकार पाहूं लागला तेव्हां तुजकडे दरसाल जहाजें भरून माल पाठवीत जाऊं असें त्याला वचन मिळालें होतें, त्या जोरावर त्यानें इकडच्या व्यापाऱ्यांकडून माल घेऊन त्याच्या बदला त्यांना युरोपांतला माल आणून देण्याचा करार केला होता. त्याप्रमाणें माल येईना. **मार्टिन**नें एतद्देशीय लोकांत आपल्या लोकांविषयीं विश्वास उत्पन्न केला होता आणि तो त्याच्या मागून कामावर आलेल्यांनीं कायम राखला होता म्हणून बरें, नाहीं तर खरोखर त्यांची कांहीं धडगत नव्हती. दिसत असलेली स्थिति मनांत आणून यांत कांहीं **लेन्वार**ची चूक नाहीं असें इकडच्या व्यापाऱ्यांनीं म्हटलें आणि त्याला जरा बरे दिवस येईपर्यंत दम धर-ण्याचें कबूल केलें.

सन १७२३ मध्यें कंपनीच्या रचनेंत जो फेरबदल झाला त्यानें तिला नवा जीव आला. त्या वर्षाच्या अखेरीस दोन जहाजें आलीं आणि तेथून १७२६ पर्यंत दरसाल तीन किंवा चार जहाजें येत होतीं. तेथून पुढें तर त्याहूनही अधिक चलती झाली. त्याचा परिणाम त्या वसाहतीला फार हितावह असा झाला. तो कसा याचें अनुमान पुढील गोष्टीवरून थोडेंबहुत करतां येईल.— सन १७२९ च्या सप्टेंबर महिन्यांत आणि सन १७३० च्या जानेवारी महि-न्यांत **लेन्वारला** ५५००००० फ्रांक किंमतीचा माल फ्रान्स देशाला पाठ-वितां आला. त्या नवीन झालेल्या लहानशा वसाहतीनें त्या काळांत इतका माल पाठविणें म्हणजे फार मोठा व्यापार झाला. पुनः व्यापार चांगला चालूं लागून भरभराट होऊं लागली तसतशी शहराला शोभा येऊं लागली. शानदार, सुंदर घरें उठूं लागलीं. एक पाठशाळेकरितां इमारत झाली. बागबगीचे होऊं लागले. पुढें परदेशच्या वकिलांस रहाण्याची सोय व्हावी म्हणून एक टोलेजंग इमारत-ही झाली. याप्रमाणें शहराची सुंदर रचना होण्याकरितां कितीएक घरें पाडून टाकण्यांत येत होतीं, परंतु त्यांत इकडच्या लोकांचीं मनें दुखावतील असें कांहीं एक होत नव्हतें. हिंदूलोकांचीं देवालयें, मंदिरें वगैरेंना अगदीं धक्का लागत नव्हता.

**लेन्वारची** कारकीर्द संपेपर्यंत **पाँदीशरीची** भरभराट तशीच अव्याहत चालली होती. परंतु सन १७३५ मध्यें तो हुशार कामगार जाऊन त्याच्या जागीं दुसरा गव्हरनर आला तो त्याच्यापेक्षां कोणत्याही प्रकारें बहुधा कमी नव्हता; इतकेंच नव्हे, थोडक्याच काळांत साऱ्या कर्नाटकभर जी यादवी माजणार होती तिचा नीट समाचार घेण्याला **लेन्वारपेक्षां** तोच अधिक लायक होता. त्याचें नांव ( M. Dumas ) **मस्य ड्युमा. कॉलबेरनें** जी कंपनी स्थापन केली होती तिची परिसमाप्ति होण्यापूर्वी थोडाच काळ सन १७१३ मध्यें **मस्य ड्युमा** तिच्या नोकरीस राहिला, तेव्हां त्याचें वय १७ वर्षांचें होतें. नोकरी धरून तो लागलाच **पाँदीशरीस** निघून आला. तो विलक्षण बुद्धिमान आहे असें तेथें दिसून आलें. सुमार आठ वर्षें तेथें काम केल्यावर **ईल ऑफ् फ्रान्स** आणि **बुरबाँ** या बेटांचा कारभार करण्याकरितां त्याची तिकडे बदली झाली. सन १७३५ पर्यंत तो त्या कामावर होता. तेथून त्याची नेमणूक **लेन्वारच्या** जागीं **पाँदीशरी** येथें झाली. तो मनुष्य शहाणा आणि शांतताप्रिय होता, परंतु दृढनिश्चयी, फ्रान्सदेशाची प्रतिष्ठा आणि हित यांना फार जपणारा होता. अमुक एक गोष्ट केली असतां तीपासून फायदा होईल असें सारासार विचार पहातां दिसलें तरच तो ती अंगावर घेई.

**ड्युमा** हिंदुस्थानांत येऊन फार महिने लोटले नाहींत तों कांहीं गोष्टी घडून आल्या; तेव्हां ह्या प्रसंगीं आपण कसें वागावें हें ठरविण्याला चांगलाच कर्तृत्ववान् मनुष्य पाहिजे होता. **शिवाजीची** कर्नाटकावर स्वारी झाली तेव्हां कर्नाटकाच्या नवाबानें **पाँदीशरी** येथील फ्रेंच लोकांचा आश्रय केला हें मागें सांगितलेंच आहे. **ड्युमा** तेथचा गव्हरनर झाला तेव्हां कर्नाटकच्या गादीवर नबाब **दोस्त अल्ली** होता. त्यानें त्या नव्या गव्हरनराशीं आपला दाट स्नेह जमावा अशी विशेष आतुरता दाखविली. **ड्युमा** काम करूं लागून फार महिने झाले नाहींत तों त्याला असें दिसून आलें कीं, नबाबसाहेबांच्या स्नेहाचा उपयोग करून घेतला तर आपल्यास कंपनीला कांहीं तरी निरंतरचा लाभ संपादन करून ठेवतां येईल. मग त्याच्या थोडासा उपयोगीं पडून त्या उपकाराची फेड म्हणून दिल्लीदरबारांतून आपल्याला नाणें पाडण्याची परवानगी आणून द्यावी असें त्यानें बोलणें लाविलें. नबाबानें तें मान्य केलें. फ्रेंचांना टांकसाळ घालण्याची

परवानगी मिळाल्यानें द्रव्यद्वारा फायदा होऊं लागला आणि त्यांची प्रतिष्ठा वाढली. पुढें दोन वर्षांनीं म्हणजे सन १७३८ मध्यें **द्युमा**च्या तोंडाला पाणी सुटण्यासारखी त्याच्याकडे एक मागणी आली. **तंजावर**च्या गादीवर आपला हक्क सांगणारा * **सवाई शहाजी राजे** म्हणविणारा एक असामी त्याची विनवणी करून म्हणूं लागला कीं, जर मला चांगली मदत देऊन माझें राज्य परत मिळ्वून द्याल तर मी तुम्हांला अमुक अमुक मुलुख देईन. ही त्याची विनंती खरोखरच मोठ्या आशेस गुंतविणारी होती. कारण तो जो मुलुख देऊं करीत होता तो मिळाला असतां फ्रेंच लोकांना **तंजावर**च्या राज्यांत समुद्रकिनाऱ्यावर चांगला आश्रय मिळणार होता. परंतु ह्या लोभास गुंतून त्याच्या मदतीस उभें रहावें तर एतद्देशीय राजेरजवाड्यांच्या तंट्याबखेड्यांत आपण पडावयाचें नाहीं हा जो आपला आजपर्यंत चालत आलेला दृढनिश्चय, पक्का नियम, तो मोडावा लागणार होता. तेव्हां कसें करावें हा विचार पडला. अखेर दोन्ही गोष्टींचा विचार करून पाहतां **द्युमास** असें वाटलें कीं, या कामांत जोखीम मोठें खरें परंतु त्या मानानें लाभही थोर होणार आहे; त्यापेक्षां हें करावें. याप्रमाणें त्याच्या मनाचा निश्चय झाल्यावर त्यानें त्याला पैसा, दारूगोळा व युद्धोपयोगी आणखी जें काय सामानसुमान हवें होतें तें पुरविलें आणि त्याच्या बदला **कारिकल** शहर, त्याच्या जवळचा **करकनगढी** नामक किल्ला आणि त्याच्याखालचे दहा गांव घेतले. तारीख १४ फेब्रुआरी सन १७३९ रोजीं त्याचा कबजा झाला.

फ्रेंच लोकांना एवढा मुलुख मिळाल्यानें तंजावरच्या राज्यांत त्यांचे पाय चांगले टेंकले. त्यांना लौकरच **डच्च** लोकांना निस्तेज करून त्यांचें वजन कमी करतां आलें. त्यांची वखार जवळच, तेथून थोडे मैलांवर खालीं समुद्रकिनाऱ्यावरच **नागापट्टनम्** येथें होती. फ्रेंचांना एवढा मुलुख मिळाल्यानें **पाँदीशरी** ठाण्याचें सामर्थ्य वाढलें आणि तो त्यांनीं ज्या प्रकारानें मिळविला त्याच्यायोगानें त्यांचें वजन वाढलें. परंतु पुढच्या वर्षीं असें दिसूं लागलें कीं, या वसाहतीचें दैव फिरून तिजवर मोठें संकट येणार. दक्षिणेंत मुसलमानांचें प्राबल्य

---

* पुढें तंजावराचा उल्लेख आणखी येणार आहे. करितां तंजावर राजघराण्याची वंशावळ पुढच्या पृष्ठावर दिली आहे ती पहावी.

# तंजावरच्या राजघराण्याची वंशावळ.




---

फार झालें आहे तें कमी करावें म्हणून मराठ्यांनीं सन १७३९ मध्यें कर्नाटकावर स्वारी केली आणि तेथचा सुभेदार **दोस्तअल्ली** यास तारीख १९ मे सन १७४० रोजीं **दमालचेरी** घाटांत अकस्मात् गांठून पराभव करून त्याच्या सैन्याचा अगदीं फडशा पाडला. खुद्द **दोस्तअल्ली**, त्याचा दुसरा मुलगा आणि

त्याचे बहुतेक मोठमोठे सरदार रणभूमीवर मरून पडले. त्या नवाबावर म्हणजे कर्नाटकावरच याप्रमाणें गुदरलेला तो कठिण प्रसंग अनेक प्रकारांनीं मोठा भयंकर होता हें तर खरेंच, परंतु तो फ्रेंचांच्या फार उपयोगीं पडला. **पाँदीशरीं**तील त्या परकी लोकांना कर्नाटकांतील राजेरजवाडे, जमीनदार वगैरे मोठमोठे लोक किती मानीत होते, त्यांवर त्यांचा किती विश्वास आणि केवढा भरंवसा बसला होता तें त्या प्रसंगीं चांगलें दिसून आलें. ते मराठ्यांच्या विजयाची बातमी कानीं पडतांच सारे घाबरून गेले. व आतां त्यांच्यापुढें आपला निभाव कसा लागणार अशी त्यांना मोठी काळजी पडली. कोठें, कोणाच्या आश्रयाला जावें हें कळेना. कारण अमक्याकडे गेलें असतां खात्रीनें आपलें संरक्षण होईल असें म्हणण्यासारखें त्या साऱ्या किनाऱ्यावर किंवा अंत:प्रदेशांत एखादें निर्भय स्थान, किंवा कोणी बलाढ्य पराक्रमी पुरुष दिसेना. आतां करावें तरी काय म्हणून सर्वांनीं एकत्र जमून खलबत केलें आणि त्यांत त्या प्रसंगीं **पाँदीशरीस** फ्रेंचांकडे जावें असा सर्वानुमतें विचार निघाला असें कांहीं घडलें नाहीं. परंतु प्रत्येकाच्या मनाला आपली तशी स्फूर्ति झाली ऐवढें मात्र खरें. **पाँदीशरीस** आपल्याला खचित आश्रय मिळेल अशी मनांत गांठ बांधून जो तो तिकडे धांवला. नवाबाच्या सैन्याचा पराभव झाल्याची बातमी बाहेर पसरली तेंव्हांपासून कितीएक दिवसपर्यंत आसपासच्या मुलखांतले लोक आपलीं मुलेंमाणसें आणि चीजवस्त घेऊन **पाँदीशरी**कडे धांव घेत होते. **दमालचेरी**ची लढाई झाल्यावर पांच दिवसांनीं **दोस्तअल्ली**नवाबाची बायको आपलीं मुलें, चाकरमाणसें, जडजवाहीर वगैरे चीजवस्त घेऊन बंदोबस्ताकरितां लवाजमा बरोबर घेऊन **पाँदीशरीस** गेली. **मस्य ड्युमा** यानें त्यांचा यथायोग्य आदरसत्कार करून त्यांना ठेऊन घेतलें. तो दूरदर्शी असल्यानें त्या कृत्यानें मराठ्यांचा आपल्यावर रोष होईल आणि त्यांच्या फौजा आतां आपल्यावर चालून येतील ही अटकळ त्यानें केली. परंतु त्यानें असेंही मनांत आणलें कीं, धीटपणा दाखविण्यांतच शहाणपण आहे असें पुष्कळ वेळ घडत असतें. ती लढाई होण्यापूर्वीं कांहीं दिवस आणि झाल्यावर पुढें पुष्कळ दिवसपर्यंत बाहेरील दाणा **पाँदीशरी**शहरांत एकसारखा येऊन भरत होता. पुढें मोठें संकट दिसत असतां **ड्युमा**नें समजून उमजून लोकांना आश्रय देण्याचें

पत्करलें तें मोठें साहसच होतें; परंतु त्या संकटांतून नीट निभावून पार पडलें तर आपल्याला अतिशय मोठा लाभ होईल आणि आपला लौकिक वाढेल हें त्याला उघड दिसत होतें. **दोस्तअल्ली**च्या बायकामुलांनां त्यानें आश्रय दिला त्याप्रमाणें **चंदासाहेबा**ची बायको आणि मुलगी आश्रयाकरितां धांवत आल्या तेव्हां त्यांनांही त्यानें आदरसत्कार करून ठेऊन घेतलें. दोघा नवाबांच्या कुटुंबांवर अतिशय कठीण प्रसंग गुदरला असतां तशा वेळीं त्यांनीं आपल्या आश्रयास यावें हें फ्रान्स देशाचें मोठें सुदैव असें त्याला वाटलें. कारण मराठे निघून गेले म्हणजे साऱ्या कर्नाटक प्रांतांत त्या नवाबांचाच अम्मल पुनः पूर्ववत बसेल यांत कांहीं शंका नव्हती.

**ड्युमानें** आपल्यावर संकट येईल असा जो तर्क केला होता तो अगदीं बरोबर होता. कर्नाटकच्या नवाबाच्या आप्तइष्ट वगैरे माणसांनां त्यानें आश्रय दिला म्हणून मराठ्यांच्या सरदाराला रोष आलाच होता आणि त्यानें त्यांनां आपल्या स्वाधीन करण्याविषयीं मागणें केलें असतां **ड्युमानें** नकाराचा जवाब दिल्यानें अधिकच संतापून आतां वसईची * जशी दशा झाली तशी **पाँदीशरी**ची करून सोडतों असें म्हणून ती धमकी अमलांत आणण्यास त्यानें लागलेच १६००० स्वार पाठविले. त्या फौजेनें **पाँदीशरी**च्या दक्षिणेस ३२ मैलांवर **पोर्टोनोव्हो** आणि त्याच्या अलीकडे १६ मैलांवर **गुडलूर** म्हणून इंग्रजांचीं दोन ठाणीं होतीं तीं घेऊन लुटून फस्त केलीं. तेथून पुढें येऊन त्या फौजेनें **पाँदीशरी**पासून पांच मैलांवर तळ दिला. तेथून त्या सरदारानें **ड्युमा**कडे वकील पाठवून त्याला असें सांगितलें कीं **पाँदीशरी** मुकाट्यानीं आमच्या स्वाधीन कर, नाहीं तर **त्रिचनापल्ली** घेऊन तिची नुकतीच जी अवस्था केली आहे तीच हिचीही करूं. परंतु **ड्युमा** कांहीं त्या निरोपानें घाबरला नाहीं. त्यानें त्या वकिलाला आपली लढाईची तयारी आहे असें सांगितलें आणि त्यापासून कांहीं एक छपवून ठेविलें नाहीं. त्यानें त्याला शहरांतला धान्याचा सांठा, इतर जिनसांची बेगमी, आपला किल्ला, तटबंदी, तोफा, कवाइती गोरेलोक, तसेच कवाइती काळे शिपाई वगैरे सर्व दाखविलें आणि मग म्हटलें एवढ्या तयारीनें

* वसईचा किल्ला पोर्चुगीस लोकांपासून मराठ्यांनीं नुकताच काबीज केला होता.

आहों तसे आम्ही अगदीं शेवटपर्यंत लढूं; किल्ला देणार नाहीं. त्याचें बोलणें ऐकून आलेला वकील निघाला तेव्हां आपली इच्छा मराठ्यांशीं स्नेहानें रहाण्याची आहे असें सांगून त्यानें त्यांच्या सरदाराला फरमास म्हणून Nantes Cordials * नामक एक प्रकारच्या मधुर मद्याच्या दहा कुप्या दिल्या. त्या मद्यानें आपला प्रभाव गाजवला असावा असें दिसतें. कारण त्या वकिलानें परत जाऊन सरदाराला त्या बाटल्या दिल्या तेव्हां त्यांतील मद्याच्या प्राशनानें त्याची बायको तल्लीन होऊन वेडावून गेली आणि असल्या आणखी पाहिजेत म्हणून हट्ट धरून बसली. **पाँदीशरी**च्या किल्ल्यावर हल्ला करून तो घेणें कर्म कठीण आहे असें त्या सरदाराला वाटून त्यानें तो नाद सोडून तोडजोडीच्या बोलण्यानेंच काय होतें तें पहाण्याचें ठरविलें. अखेर **डुमानें** त्याला आणखी ३० बाटल्या नजर केल्या. तेवढ्यावर संतुष्ट होऊन पहिलें सारें बोलणें सोडून देऊन तो पश्चिम हिंदुस्थानाकडे निघून गेला. †

मध्यंतरीं **पाँदीशरींत** आणखी लोक येऊन भरले. त्यांत **दोस्तअल्लीचा** मुलगा **सफदरअल्ली** हा आला. आतां कर्नाटकचा नबाब हाच झाला. **मेस्य ड्युमा**नें आपल्या लोकांशीं कशा प्रकारचें वर्तन ठेविलें आहे हें पाहून त्याला फार आनंद झाला, आणि मराठे कर्नाटकांतून निघून गेल्यावर त्यानें फ्रेंचांनां दरसाल १०००० रुपये वसुलाचा आणखी मुलुख बक्षीस दिला. **ड्युमा** या प्रसंगीं आपल्या चांगला उपयोगीं पडला म्हणून मोगल बादशहाच्या दक्षिणेंतल्या सुभेदारानें § त्याचे आभार मानून त्याला एक पत्र आणि पोषाक पाठवून दिला. **सफदरअल्ली**नें दहा हजारांचा मुलुख दिल्याचें वर सांगितलेंच आहे.

---

* **नान्स** येथील. मद्याचा प्रभाव केवढा हा !

† सन १७४० मध्यें मराठ्यांची जी कर्नाटकावर मोहीम झाली तींत मुख्य सरदार **फत्तेसिंग भोसले, रघूजी भोसले** आणि **श्रीपतराव प्रतिनिधि** हे होते. मद्याच्या गोष्टी रघूजी भोसले व त्याची बायको यांच्या विषईं असून त्या मॉलेसनच्या फ्रेंचांच्या इतिहासांत आहेत; परंतु त्याला आधार मराठी कागदपत्रांत असलेला कोठें पहाण्यांत आला नाहीं. तो जर कोठें कोणाच्या दृष्टीस पडेल तर कळविण्याची कृपा व्हावी.

§ या वेळीं दक्षिणेचा सुभेदार **निजामउल्-मुल्क** हा होता.

त्याशिवाय त्यानें त्याला आपल्या बापाच्या अंगांतलें, वर सोन्याचें काम केलेलें, बहुमोल, रत्नखचित चिलखत, तीन हत्ती, कित्येक घोडे, पुष्कळ तलवारी व दुसरीं रत्नखचित हत्यारें आणि एक खलिता पाठवून दिला. दिल्लीच्या खुद्द **महंमदशहा** पादशहानें त्याला नवाब ही पदवी आणि ४५०० स्वारांची मनसबदारी दिली. त्यांपैकीं २००० त्यानें आपल्या तैनातीस शांततेच्या काळींही ठेवण्याची परवानगी होती. त्याबद्दल खर्च त्याच्या अंगावर कांहीं एक नव्हता. **ड्युमा**चें नेहमीं फ्रान्सच्या हिताकडे लक्ष असल्यानें आणि मोठमोठे मानमरातब, व डामडौल पाहून एतद्देशिय लोकांच्या मनावर कसे परिणाम होत असतात व त्यांचे ग्रह कसे होत असतात तें त्याला चांगलें समजत असल्यानें आपल्याला मिळालेले मान व अधिकार आपल्या मागून जो कोणी दुसरा गव्हर्नर येईल त्याजकडे चालावे असें त्यानें मागणें केलें आणि मंजुरी मिळवून ठेविली.

वर सांगितलेला कठीण प्रसंग गुदरण्यापूर्वीच **ड्युमानें** फ्रान्स देशांत आपल्या वरिष्ठांकडे पत्र पाठवून त्यांना अशी विनंती केली होती कीं, आतां संधी येतांच मला मोकळें करावें. वर सांगितलेला सर्व प्रकार उलगडतो तों त्याला सूचना आली कीं, कोर्ट आफ डायरेक्टर्सनें आपला राजीनामा मंजूर करून आपल्या जागीं **एम. जोसेफ फ्रान्सिस ड्युप्ली** याची नेमणूक केली आहे. तो त्या वेळीं **चंद्रनगरचा** Intendant ठाणेदार होता. त्यानें **पाँदीशरी** येथें सन १७४१ च्या आक्टोबर महिन्यांत दाखल होऊन हिंदुस्थानांतील फ्रेंचांच्या ताब्यांतील मुलखाचा डायरेक्टर जनरल म्हणून शपथ घेतली आणि मोगल बादशहाचा नवाब व ४५०० स्वारांचा मनसबदार अशी आपली द्वाही फिरविली.

**मेस्य ड्युमा** यानें **पाँदीशरी**स सहा वर्षे कारभार केला. त्यावरून पहातां तो **फ्रान्सिस मार्टिन**च्या जागेवर बसण्याला अयोग्य नव्हता असें दिसून येतें. धीटपणा, युक्ति, शहाणपण, दूरदर्शित्व आणि चातुर्य हे गुण त्याच्या अंगीं पुष्कळ मोठ्या प्रमाणानें वसत असल्याचें दिसून आलें. फ्रेंच लोकांचा नांवलौकिक त्यानें फार वाढविला आणि त्यांच्या ताब्यांतला मुलुखही पुष्कळ वाढविला. परंतु त्यानें जीं हीं कृत्यें केलीं तीं **मार्टिननें** अगदीं सरळ मार्गानें वागावयाचें, कोणाच्या तंट्याबखेड्यांत आपण पडावयाचें नाहीं असा जो कित्ता घालून ठेविला होता तो सोडून केलीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे. **मार्टिनचा** कित्ता सोडून वागावें, नाहीं-

तर आपला नाश झाला तरी पुरवला म्हणावें अशी वेळ त्याला आलेली होती. असा प्रसंग **मार्टिनवर** येता तर तोहि बहुधा असाच वागला असता. **ड्युमा** शहाणपणानें धाष्टर्यानें वागल्यानें **पाँदीशरीच्या** वसाहतीला अशी स्थिति प्राप्त झाली कीं, हिंदुस्थानांतील मुसलमानी साम्राज्य डबघाईस आलें असल्यामुळें त्या वसाहतीची भरभराट कधीं कोणीं स्वप्नातसुद्धां मनांत आणली नसेल इतकी करतां येईल. **ड्युमा**च्या मागून त्याच्या जागेवर येणाराच्या अंगीं जसें कर्तृत्व असेल तसें पुढें सर्व कांहीं घडणार होतें. त्यानें पुढचा मार्ग स्पष्ट दाखवून दिला होता; फ्रेंचांचें वजन बसविलें होतें आणि नांव गाजविलें होतें. याप्रमाणें त्यानें जी कृति केली तिच्या योगानें पुढें जी एक एक संधी येत गेली ती साधून **ड्युप्लीनें** अधिक अधिक फायदा कोणत्या प्रकारें करून घेतला तें आतां आपण पाहूं.



# भाग २ रा.

## ड्युप्लीची पद्धत.

**जोसेफ फ्रान्सिस ड्युप्ली** हा **लांड्रेसिस** येथें सन १६९१ मध्यें जन्मला. त्याचा बाप हिंदुस्थान कंपनीचा ( Company of the Indies ) फारमर जनरल आणि डायरेक्टर जनरल होता. त्याच्या मनांत मुलाला लहानपणापासूनच व्यापारधंद्यांत घालावयाचें होतें. **ड्युप्लीला** तर त्याचा अगदीं तिटकारा होता. त्याला शास्त्राध्ययनाची फार हौस आहे असें दिसत होतें. तें त्याचें वेड काढून टाकावें म्हणून तो सत्रा वर्षांचा झाला तेव्हां बापानें त्याला समुद्रपर्यटण करावयास पाठवून दिलें. त्या उपायानें त्याचा हेतु सिद्धीस गेला. तो तरुण नाविक आटलांटिकमहासागर व हिंदीमहासागर यांवरून सफर करून घरीं परत आला तों त्याचें मन ताळ्यावर येऊन आतां आपण व्यवहारांत केव्हां पडूं आणि व्यापारधंदा केव्हां करूं लागूं असें त्याला होऊन गेलें. तो आतां अगदीं बापाच्या इच्छेप्रमाणें वागण्यास सिद्ध झाला. तें पाहून बापाला संतोष होणें साहजिकच होतें. त्यानें त्याला लागलीच हिंदुस्थान कंपनीच्या पदरीं **पाँदीशरी** ( **पाँदीश्री** ) येथें एक मोठी जागा मिळवून दिली. सन १७२० मध्यें **ड्युप्ली** नोकरीवर रुजू झाला. थोडक्याच काळांत त्याच्या मनानें असें ठरविलें कीं **पाँदीशरी**ला दक्षिण हिंदुस्थानांतली मुख्य उतारपेंट करतां येईल. तेथचा गव्हर्नर **लेन्वार** याला त्यानें आपला बेत सांगितला तो त्याला पसंत पडला; परंतु त्याच्या हातीं पुरेसा पैसा नसल्यामुळें त्याला झटून काम करून तो सिद्धीस नेतां येईना. तेव्हां **ड्युप्ली** स्वतःच पुढें सरसावला आणि नीट शिस्तीनें काम चालविलें तर आपला बेत कसा फलद्रूप होईल आणि त्यापासून धनप्राप्ति कशी खात्रीनें होईल हें त्यानें दाखविलें. कंपनीच्या कायद्यांनीं तिच्या नोकरांस खासगी व्यापार करण्यास मोकळीक होतीच, त्याप्रमाणें त्यानें आंतील मुलखांत आपला खासगी व्यापार सुरू केला आणि थोड्याच दिवसांत पुष्कळ पैसा मिळविला.

**फ्रान्स** देशांत मुख्य कंपनीच्या रचनेंत काय काय फेरफार झाले होते तें मागच्या भागांत सांगितलेंच आहे. त्या फेरफारांमुळें इकडे **पाँदीशरीस** अधिकारी मंडळींत ऐक्य नाहींसें होऊन घांसाघीस सुरू झाली आणि एकमेकांविषयीं मनें कलुषित झालीं. त्याचा एक परिणाम असा झाला कीं, डायरेक्टरांच्या हुकमावरून सन १७२६ च्या डिसेंबर महिन्यांत **ड्युप्ली**ला कामावरून तूर्त बाजूस करून ( Suspended ) फ्रान्स देशास बिन खर्चानें परत जाण्याची समज मिळाली. तो मी जात नाहीं म्हणाला आणि झालेला हुकूम अन्यायाचा आहे, हा रद्द होऊन मला दाद मिळावी असा अर्ज करून तेथेंच राहिला. पुढें चार वर्षें लोटल्यावर त्याच्यावर आणलेले आरोप खोटे आहेत असें डायरेक्टरांस दिसून आलें ( ३० सप्टेंबर १७३० ) आणि त्या अन्यायानें त्याचें जें नुकसान झालें तें भरून निघावें म्हणून पुढें थोड्याच दिवसांनीं त्यांनीं त्याला **चंद्रनगर** येथें इंटेंडंट म्हणजे मुख्य अधिकारी नेमिलें. त्याप्रमाणें तो तिकडे निघून गेला.

सन १६७६ मध्यें **चंद्रनगर** येथें फ्रेंचांनीं ठाणें घातलें. पुढें सन १६८८ मध्यें **औरंगजेब** बादशहाकडून तें त्यांनीं रीतीप्रमाणें कायमचें करून घेतलें हें मागें सांगितलेंच आहे. तेव्हांपासून इतकीं वर्षें तेथची स्थिति पाहिली तर ती कांहीं बरी म्हणण्यासारखी नव्हती. कंपनीच्या दरिद्रावस्थेमुळें **पाँदीशरी**पेक्षां **चंद्रनगरची** अधिकच दुर्दशा उडालेली होती. तेथें व्यापाराची हालचाल नाहींशी होऊन सर्वत्र मंदी आली होती. कंपनीच्या गुमस्त्यांजवळ कांहीं साधनें नसल्यानें आणि त्यांच्या अंगांत हिंमत नसल्यानें ते दिवसेंदिवस आळशी आणि निर्बल होत गेले. ते जे काय अतिशय मोठे प्रयत्न करीत असत ते ज्यांवांचून चालावयाचेंच नाहीं अशीं निकडीचीं जेवढीं कामें असतील तेवढीं करण्यापुरते असत. तें स्थळ पहाणाराला येथें रहाणारांच्या अंगांत हिम्मत नाहीं असें तेव्हांच दिसत असे. त्याच्या तटांवर नेहमीं सामसूम असून त्यांवर जंगल माजलें होतें आणि तें अगदीं मोडकळीस आल्यासारखें दिसत होतें. **हुगळी**च्याच काठीं **चटानटी** नांवाचें लहानसें खेडें होतें तेथें फ्रेंचांचे प्रतिस्पर्धी जे इंग्रज त्यांनीं ठाणें दिलें होतें. त्यांची दिवसेंदिवस चलती होती. त्या खेड्याला **कलकत्ता** असें नांव देऊन तेथच्या चिखलमातीच्या भिकार झोंपड्या मोडून त्यांच्या जागीं त्यांनीं भरभक्कम टोलेजंग वखारी उठविण्याचा सपाटा लावला होता. **चंद्रनगर-**

ला लागून वेगानें वहाणाऱ्या **हुगळी**नदींतून आंतल्या मुलखांतून येणारा माल गलबतें भरभरून जाऊन **कलकत्त्या**च्या वखारींत पडत होता पण इकडे **चंद्रनगराकडे** पहावें तर तेथच्या बंदरांत गलबतें त्या मानानें थोडीं जात होतीं. तीं रिकामीं असल्यासारखींच असत. बंदर ओसाड पडल्यासारखें दिसे.

**ड्युप्ली चंद्रनगर**चा मुख्य अधिकारी होऊन सन १७३१ मध्यें तेथें गेला तेव्हां तेथची स्थिति अशा प्रकारची होती. तें स्थळ मोडकळीस आलेलें आणि गळाठलेलें असें जरी दिसलें तरी त्याला याबद्दल काळजी आणि उद्विग्नता प्राप्त झाली नाहीं. हें बंदर मोठ्या सोईच्या जागीं आहे असें पाहून त्याच्या मनांत निराळेच तरंग उत्पन्न झाले. त्याला असें दिसलें कीं, त्यांत सुधारणा करूं म्हटलें तर होण्यासारखी आहे. तें **चटानटी** इतकें भरभराटीस आणतां येईल. हिंमतीनें आणि शहाणपणानें भांडवलाचा नीट उपयोग केला तर आपल्याबरोबरची सुस्त मंडळी Colleagues आश्चर्यानें थक्क होऊन जाईल अशा गोष्टी करून दाखवितां येतील. तो लागलाच मनापासून झटून काम करूं लागला. **पाँदीशरी** येथें त्यानें जो पैसा मिळविलेला होता तो खर्चून जहाजें खरेदी घेऊन तीं मालानें भरलीं. आंतील मुलखांतील लोकांशीं देवघेव सुरू केली आणि एतद्देशीय व्यापाऱ्यांचीं मनें वळवून त्यांना **चंद्रनगरांत** येऊन रहाण्यास सांगितलें. त्याचा उत्साह आणि हिम्मत पाहून त्याच्या हाताखालचे लोक वळले आणि त्याला सामील होऊन पैसा मिळविण्याच्या कामीं एकमेकांपुढें उड्या घालण्यास सिद्ध झाले. तो सर्वांना बरें आहे ह्मणाला. त्याच्याजवळ सर्वांची सोय होण्यासारखी सवड होती. कांहीं असामींस त्यानें पैसा उधार दिला आणि बाकीच्यांनां आपले भागीदार केलें. याप्रमाणें त्यानें सर्वांनां उत्तेजन दिलें. त्यायोगानें **चंद्रनगरांत** तेथील अधिपतीचा हा गुण लौकरच दिसूं लागला. सन १७३१ मध्यें तेथच्या बंदरांत सारे ६ देशी मचवे असून तेही रिकामेच पडलेले असत; पण **ड्युप्ली** तेथें येऊन चार वर्षें लोटतात न लोटतात तों त्याच ठिकाणीं लहान मोठीं तीस चाळीस गलबतें झालीं. तीं बंगालचा माल घेऊन **जड्डो, मोखा, बसरा, सुरत** आणि **चीन**, अशा दूरदूरच्या बंदरीं जाऊं येऊं लागलीं. तो तेथून जाण्यापूर्वींच गलबतांची संख्या वाढून ७० म्हणजे दुप्पट झाली. इतका व्यापार कांहीं सहज वाढला नाहीं. **ड्युप्लीनें** आंतल्या मुलखांतील मोठमोठ्या ठिकाणीं,

अगदीं **तिबेटांत**सुद्धां, देवघेव सुरू करून तो इतक्या रंगारूपास आणला. **चंद्रनगराचें** पुनरुज्जीवन आणि अशी भरभराट झाल्यानें **फ्रान्स**च्या लोकांना अतिशय आनंद झाला. त्याला इतकी ऊर्जितावस्था येऊन आपल्याला व तेथें रहाणाऱ्या लोकांना इतका लाभ होण्याला मुख्य कारण एक, तेथें नवीन नेमलेल्या मुख्य अधिकाऱ्याचें कर्तृत्व; असें नीट ओळखून त्यालाच आतां **पाँदीशरीस मेस्य ड्युमा**च्या जागीं नेमावें असें हिंदुस्थानच्या कायमच्या कंपनीच्या अधिकाऱ्यांच्या मनांत आलें.

**चंद्रनगराहून** निघण्यापूर्वीं तारीख १७ एप्रिल सन १७४१ रोजीं **ड्युप्लीचा** विवाह झाला. त्यानें ज्या स्त्रीस वरलें ती फार हुशार होती. तिची सल्लामसलत तो नेहेमीं घेत असे आणि तिच्या एवढी योग्यता दुसऱ्या कोणाच्याच मसलतीची त्याला वाटत नसे. तिचा बाप **एम. आल्बर्ट** नामक शस्त्रवैद्य होता, तो **पाँदीशरी** येथें कंपनीचा नौकर होता. **पाँदीशरी** येथील वरिष्ट कौन्सिलांत **एम. व्हिन्सेन्स** म्हणून एक सभासद होता त्याला तिनें सन १७१९ मध्यें वरलें होतें आणि त्याच्यापासून तिला सहा मुलें झालीं होतीं. तो **चंद्रनगर** येथें सन १७३९ किंवा १७४० मध्यें वारला तेव्हां विधवा झालेल्या त्या स्त्रीला **ड्युप्लीनें** सन १७४१ मध्यें वरलें. तो लग्नसमारंभ बऱ्याच थाटाचा झाला. त्यावेळीं **ड्युप्लीचें** वय ४२ वर्षांचें असून तो **पाँदीशरी** येथील वरिष्ठ कौन्सिलाचा अध्यक्ष आणि हिंदुस्थानांतल्या फ्रेंच मुलखाचा अधिपति General commandant होता. तिचें वय ३३ वर्षांचें होतें. **ह्या ड्युप्लीबाई** विषयीं असा लेख आहे कीं, **ड्युप्लीवर** जे जे प्रसंग आले त्या सर्वांतून निभावण्याला आधार काय तो एक तिच्या मसलतीचा ( Counsels ) आणि हिमतीचा असे. हिंदुस्थानांतल्या फ्रेंचांच्या मुलखाचा तो राज्यकारभार करीत होता तो सारा काळ ती त्याच्याबरोबर होती आणि तो कारभार आटोपल्यावर तो जेव्हां फ्रान्स देशाला माघारा गेला तेव्हां त्याच्याबरावर गेली. त्याच्या कारभाराची समाप्ति कशी झाली तें पुढें यथास्थळीं सांगण्यांत येईल. ती त्याला परमपूज्य मानीत असे आणि अगदीं जीव कीं प्राण करीत असे. अशा त्या आपल्या परमप्रिय पतीचा अन्यायानें छळ होऊन त्याला त्रास होऊं लागलेला पाहून तिचें हृदय दुःखानें पोळून फाटून गेलें आणि प्राणोत्क्रमण झालें.

ड्युप्ली पाँदीशरीस जाऊन कामावर रुजू होऊन पहातो तों मराठ्यांच्या स्वारीमुळें पाँदीशरीच्या वसाहतीची दुर्दशा उडून गेली होती. त्यांच्या लुटारू सैन्याची टोळधाड मुलखावर पडल्यानें तो लुटून फस्त होऊन गेला असून त्यांचा मुक्काम तेथेंच असल्यानें पुढच्या हंगामास पेरा करण्याकरितां जमीन नांगरून तिची कष्टमशागत करून तयारी करावयाची ती करतां आली नाहीं. कर्नाटकाची दशा तीच असून शिवाय दक्षिणेचा सुभेदार त्यावर स्वारी करण्याला उद्युक्त झाला होता. शिवाय युरोपांत फ्रान्स आणि इंग्लंड यांचें युद्ध लौकरच जुंपण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. तसें घडून आल्यास हिंदुस्थानांतल्या फ्रेंच वसाहतींवर अनिष्ट प्रसंग कदाचित् गुदरेल तर त्यांतून पार पडण्यास काय केलें पाहिजे तें मनांत आणून तशी तयारी करून ठेवावयास पाहिजे होती.

बाहेरून येणाऱ्या संकटाचें निवारण करण्याचें सामर्थ्य अंगीं येण्याला आपली घरची तयारी नीट असली पाहिजे असें ड्युप्लीचें मत होतें म्हणून तो आधीं त्या व्यवस्थेस लागला. घरांत खर्च विनाकारण जास्त होत आहे असें त्याला वाटलें म्हणून तो कमी करण्याच्या उद्देशानें त्यानें चौकशी सुरू केली. तेथें लांच घेण्याची वहिवाट पडली होती—ही एतद्देशीयांपासून उचलली होती म्हणतात.— ती बंद करावी म्हणून त्यानें कानू केले. त्यानें तटबंदीची येथून तेथून चांगली दुरुस्ती केली. कर्नाटकच्या राजेरजवाड्यांनां आणि तसेंच हैदराबादच्या निजामाला त्यानें असें कळविलें कीं, मेस्य ड्युमाच्या जागीं फ्रेंच वसाहतींचा गव्हरनरजनरल म्हणून माझी नेमणूक झाली आहे; तेव्हां त्या अधिकाऱ्याला दिल्लीच्या बादशहाकडून जे मानमरातब मिळाले आहेत ते आतां मजकडे चालावयाचे. पाँदीशरीच्या आसपासच्या मुलखांत जे त्याच्याहून कमी दर्जाचे होते त्यांनीं स्वतः जाऊनच त्याला मुजरे केले. याप्रमाणें इकडची व्यवस्था करून आणि काम चालीस लावून तो चंद्रनगरास गेला. तेथें नवाब म्हणून गादीवर बसण्याचा समारंभ लोकांच्या आवडीप्रमाणें त्यानें मोठ्या थाटानें केला. तो पार पडल्यावर हुगळी शहरच्या मुसलमान मनसबदाराला भेटावें असें मनांत आणून त्यानें त्याच्याकडे सांगून पाठविलें. परंतु त्यानें उलट मी आधीं आपल्या दर्शनाला येणार असा आग्रह धरला. कारण हा फ्रेंच गृहस्थ आपल्यापेक्षां वरिष्ठ दर्जाचा आहे, तेव्हां आपणच त्यास आधीं भेटलें पाहिजे असें त्याच्या मनानें घेतलें

होतें; तें अस्सल मुसलमानाच्या आंगच्या उपजत सभ्यपणास अनुसरूनच होतें. मग **ड्युप्ली** त्याच्या भेटीस गेला तेव्हां त्यानें त्याचा जो अतिशय आदरसत्कार केला तो पाहून एतद्देशीय लोकांच्या मनावर त्याच्या थोरपणाविषयीं विलक्षण ग्रह झाला. **चंद्रनगरचा** समारंभ आटपून **पाँदीशरीस** परत आल्यावर **ड्युप्ली** तेथेंही डामडौलानेंच वागत असे. आपल्या आसमंतात् असणारे ल्हानसान राजे-रजवाडे, जमीनदार, वगैरे लोक एकाद्याच्या डामडौलावरून त्याचा अधिकार मोठा किंवा लहान हें अनुमान बसवीत असतात असें त्याला माहीत असल्यानें आपल्याला खुद्द दिल्लीदरबारांतून अधिकार मिळालेला आहे असें त्यांच्या मनावर बिंबवावें म्हणून तो नवाबी थाटानें वागत असे. त्यांचा तो ग्रह दृढ होत जावा म्हणून तो डामडौल करण्यांत अगदीं कसूर करीत नसे. अनिष्ट काल येत चालला होता तेव्हां आपल्यावर कोणा युरोपियन शत्रूनें हल्ला केल्यास एतद्देशीय लोकांच्या मनाचा ग्रह फ्रेंचांविषयीं जसा बरावाईट असेल तसें त्यांचें बरेंवाईट होण्याचा संभव आहे असें त्याला वाटत होतें. म्हणून राजेरजवाड्यांपासून तों सामान्य मनुष्यां-पर्यंत सर्व लोकांनीं आपल्यास चांगलें म्हणावें, त्यांचें मन आपल्यावर बसावें; अशा तऱ्हेनें वागण्याविषयीं तो फार झटत होता.

ह्या कठीण प्रसंगीं **ड्युप्लीला** फ्रान्सदेशांतून सढळ हातानें, उदारपणानें पुष्कळशी चांगली मदत मिळावयास पाहिजे होती, ती मिळती तर त्यानें **पाँदीशरी** ठाणें असें मजबूद करून ठेविलें असतें कीं दक्षिण हिंदुस्थानांतल्या युरोपियन वसाहतींत तें अग्रगण्य झालें असतें. परंतु त्याला मदत मिळाली पाहिजे अशा अगदीं निकराच्या प्रसंगीं ती न मिळतां उलट थप्पड बसली. परपेचुअल् कंपनीच्या डायरेक्टरांकडून त्याला तारीख १८ सप्टेंबर सन १७४३ चा खलिता (despatch) आला त्यांत त्यांनीं असें लिहिलें होतें कीं इंग्लंडाशीं फ्रान्साची लढाई जुंपण्याचा संभव दिसत असल्यानें आम्हाला हिंदुस्थानांत चारीहून अधिक गलबतें पाठवितां येत नाहींत. यांपैकीं **पाँदीशरीस** दोनच येतील. त्यांनीं त्याला आग्रहपूर्वक आणखी असें लिहिलें होतें कीं यावेळीं तुमच्या तेथचा खर्च तोडणें अवश्य आहे याजकरितां तो निम्मेनें कमी करा आणि तटबंदीकडे तूर्त खर्च अगदीं करूं नका, सर्व बंद ठेवा.

वरून हुकूम तर असा येऊन पडला, आतां पुढें कसें करावें हें **ड्युप्लीपुढें** मोठें कोडें येऊन पडलें. त्यांत तटबंदीचें काम बंद करावें असें जें लिहिलेलें होतें

तें त्याच्या मनाला फार लागलें. **पाँदीशरी**ची तटबंदी अगदीं भिकार, तिच्यावर प्रथम पडावें असें शत्रूला वाटण्यासारखी आहे हें त्याला माहीत होतें आणि डायरेक्टरांनांही हें माहीत असल्याचें त्याला ठाऊक होतें. पहिला तट तर ढांसळतच होता आणि समुद्राच्या—म्हणजे जिकडे मुख्यत्वेंकरून चांगला बंदोबस्त असावयास पाहिजे त्या—बाजूस १००० टाइजेस (toises) म्हणजे ६००० फूट जागा अगदीं उघडी होती. या प्रसंगीं **ड्युप्लीनें** जें वर्तन केलें त्यावरून तो कशा प्रकारचा मनुष्य होता तें कळतें. अशा प्रसंगीं डायरेक्टरांचा हुकूम मान्य करणें म्हणजे आपल्या हातानें आपला नाश करून घेणें आहे आणि आपल्याला डायरेक्टर जनरल हा हुद्दा असल्यानें आपण फ्रान्स देशाचे प्रतिनिधि, आणि जरी नांवानें नाहीं तरी वस्तुतः त्याला जबाबदार आहों, तेव्हां त्याप्रमाणें वागलें पाहिजे असें म्हणून त्यानें तो हुकूम गुंडाळून ठेवला आणि वर सांगितलेल्या सगळ्या जागेच्या पुढच्या बाजूस भरभक्कम तट बांधून त्याच्या पुढेंमागें दोन्ही बाजूंस खंदक खणला. त्याला व्यापार चांगला साधून त्यांत पुष्कळ पैसा मिळून तो संग्रहीं पडला होता; त्यापैकीं कांहीं त्यानें ह्या कामाकडे अगदीं सढळ हातानें लावला. त्याला पुढें सूचना आली होती तीप्रमाणें फ्रान्सांतून दोन गलबतें त्या वर्षीं आलीं, त्यांचें भरताड करण्याला त्यानें आपल्या पदरचा कांहीं पैसा घातला. त्यानें छाती करून हात सईल सोडून माल खरेदी करून भरला नसता तर त्या गलबतांना रिकामेंच परत जावें लागलें असतें. कंपनीचा दुसरा हुकूम त्यानें अगदीं सक्त बजावला. त्यानें नोकरांचे पगार कमी केले; कांहीं गैरशिस्त गोष्टी होत्या त्या मोडून टाकिल्या, आणि लांचखाऊपणा बंद केला. त्यामुळें कांहीं असामी कुरकुरूं लागले आणि कोणी कोणी तर उघड उघड बोलूं लागून तक्रारीवर आले. परंतु त्यानें कोणाचें कांहीं न ऐकतां आपला हुकूम गाजवून जमेची आणि खर्चाची तोंडमिळवणी व्हावयास पाहिजे होती ती करून बस्तान बसविलें. तेव्हां डायरेक्टरांनीं त्यानें केलेलें सर्व कांहीं पसंत करून त्याची तारीफ केली. तटबंदीच्या कामीं त्यानें त्यांचा हुकूम जुमानला नाहीं म्हणून त्यांस राग यावयाचा, परंतु त्यांचीं गलबतें रिकामीं परत पाठविलीं नाहींत, माल भरून पाठविलीं म्हणून राग जाऊन उलट त्याच्यावर त्यांची मर्जी सुप्रसन्न झाली. त्या कामीं त्यांनीं त्याला असें लिहिलें " तुम्ही व **पाँदीशरी**च्या आणि **चंद्रनगर**-

च्या कौन्सिलांनीं आमच्या हिताकडे लक्ष पुरवून आस्थेनें आमच्या दोन गलबतांस मालाचा पुरवठा केला हें पाहून आम्हाला फार संतोष झाला. ” त्यानें तटबंदीचें काम चालविलेलें पुरें होण्यास दोन वर्षांवर काळ लागला. तें झाल्यावर तारीख ३० नोव्हेंबर सन १७४६ रोजीं त्यांनीं त्याला असें लिहिलें— ‘ **पाँदीशरी** शहर समुद्राच्या बाजूला उघडें असलेलें बंदिस्त करण्याच्या कामीं तुम्हीं जी त्वरा केली ती पाहून आम्हाला खरोखर आनंद झाला. या कामीं तुमचे आमच्यावर मोठे उपकार झाले. ’ पुढें आणखी—‘ आम्हीं इकडून जीं दोन गलबतें पाठविल्याचें लिहिलें होतें त्यांत मालाची भरती करण्याकरितां तुम्ही आपली गरिबी असतांही जे जे उपाय केले ते सर्व पाहून आम्हाला तितकाच मोठा आनंद होत आहे. ’

इसवी सन १७४४ मध्यें युरोपांत **आस्ट्रिया**च्या गादीवर वारसा कोणाचा तें ठरण्याबद्दल लढाई सुरू झाली. तेव्हां **इंग्लंड** एका पक्षाला मिळालें आणि **फ्रान्स** दुसऱ्या पक्षाला मिळालें. फ्रेंचांनीं **पाँदीशरी**स ठाणें घातल्यापासून ह्या दोन राष्ट्रांमध्यें आजपर्यंत लढाईचा प्रसंग नव्हता, तो आतां आला. इंग्लिश लोक त्याच किनाऱ्यावर **पाँदीशरी**च्या वरच्या बाजूस, तेथून ८६ मैलांवर समुद्रकांठींच एका लहानशा ठिकाणीं सन १७३९ मध्यें तळ देऊन बसले होते. त्यांनीं त्या जागीं एक किल्ला बांधून त्याला **फोर्ट सेंट जॉर्ज** असें नांव ठेविलें होतें. त्या गांवाला हिंदु लोक **चन्नापट्टनम्** म्हणत असत. इंग्रजांनीं त्याचें नांव **मद्रास** ठेविलें. ती जागा ठाण्याला योग्य, शहाणपणानें निवडून काढलेली अशी कांहीं नव्हती. ऑक्टोबरपासून जानेवारीपर्यंत बंदर धोक्याचें होतें. किल्ल्याच्या आसपासच्या प्रदेशांतलि जमीन कोरडी आणि नापीक होती आणि त्या प्रदेशांत लोकांची वस्ती अगदीं पातळ होती. असें होतें तरी इंग्रजांनीं आपल्या हिमतीनें त्यांतल्या कांहीं अडचणी दूर केल्या आणि बाकीच्यांना ते जुमानीत नव्हते. एतद्देशीय लोकांची वस्ती त्या ठाण्याभोंवती वाढत जात जात बरीच झाली आणि युरोपांतून जीं दरसाल गलबतें येत तीं आणलेला माल फारसें नुकसान न होतां उतरीत आणि त्याचप्रमाणें इकडचा माल त्यांस वर घेतांही येई. फ्रान्सानें इंग्लंडबरोबर लढाई करावयाची असें प्रसिद्धपणें म्हटलें तेव्हां म्हणजे सन १७४४ च्या मार्चमध्यें **मद्रासच्या** ठाण्यांत इंग्रजांचा जो मुख्य गव्हर्नर

होतां त्याचें नांव **मोर्स**. तो व्यापारी होता. त्याचा सारा जन्म दुकानदारींत गेला होता. त्याला राजकारणांची फारशी कांहीं माहिती नव्हती.

इंग्लंडबरोबर आपण लढाई सुरू केल्याचा फ्रान्सानें पुकारा केला, परंतु याचा परिणाम काय होईल इकडे तेथच्या सरकारानें नीट दृष्टि पोहोंचविली नाहीं. इंग्रजसरकारानें तत्काळ दूरवर नजर देऊन पुढें स्थिति कशी होईल हें आपल्या शत्रूपेक्षां फार जास्त मनांत आणलें होतें. **पाँदीशरी** ठाण्याची चांगली भरभराट आहे, तेथचा गव्हर्नर बुद्धीचा चलाख, प्रसंग पडेल तसा वागणारा आहे, इत्यादि गोष्टी त्यांच्या कानावर गेल्या असल्यामुळें इंग्रजी प्रधानमंडळ वेळेवर सावध होतें. त्यांनीं आपल्या आरमारांतल्या पूर्वेकडील ठाण्यांतील **कोमोडोर बार्नेट** यास तावडतोब असा हुकूम पाठविला कीं हिंदुस्थानच्या पूर्वकिनाऱ्यावर तुम्ही जाऊन दाखल व्हावें आणि आपल्या मोठ्या आरमाराचा चांगला उपयोग करून होईल तितकें हित साधावें. फ्रेंच सरकारची तयारी इंग्रजांप्रमाणें कांहीं नव्हती. तथापि परपेच्युअल् कंपनीच्या डायरेक्टरांनीं **ड्युप्ली**ला पत्र पाठवून एवढें कळविलें कीं, **ईल ऑफ फ्रान्स** आणि **बूर्बे** येथील गव्हर्नर **मस्य द्‌ला बूर्दोने** याला आपला काफला ( Squadron ) घेऊन तुमच्या मदतीस जाण्यास हुकूम पाठविला आहे. त्यांनीं त्याला आणखी असें लिहिलें कीं मद्रासचा गव्हर्नर **मोर्स** ह्याच्याशीं साधल्यास सलोखा करण्याची खटपट करून पहा; त्याच्याशीं असें बोलणें लावा कीं ह्या एथल्या वसाहतींनां एकमेकींशीं भांडण्याचें कांहीं कारण नाहीं; आपले मुख्य देश जरी तिकडे एकमेकांशीं लढत असले तरी इकडे आपण कांहीं तसें करण्याचें कारण नाहीं; आपण स्वस्थ रहावें हें बरें.

ही गोष्ट साध्य किंवा निदान शक्य आहे असें देखील **ड्युप्ली**ला वाटलें नाहीं. तरी त्यानें आपल्याकडून खटपट करण्यास कांहीं अनमान केलें नाहीं. गव्हर्नर **मोर्स** याची दृष्टि सद्यःफलावर होती, त्याच्यापलीकडे ती जात नव्हती. त्याला असें वाटत होतें कीं, ब्रिटिश काफला लौकरच येईल. तो येण्याची फुरसत, मग आपल्याला **पाँदीशरी** धुळीस मिळवण्यास मुळींच अवकाश नको, कांहीं कठीण पडणार नाहीं. परंतु त्याच्या मनांत असें आलें नाहीं कीं, न जाणो, एकादा दिवस असा येईल कीं त्या प्रसंगीं सर्व पारडें एकदम फिरून जाईल. म्हणून त्यानें **ड्युप्ली**ची विनवणी मनावर न घेतां त्याला असा जवाब दिला कीं,

मला विलायतेहून सरकारचा जो हुकूम आला आहे तो मोडून उलट वागतां येत नाहीं.

**मोर्स**कडून हा जबाब येत आहे तों इतक्यांत पाठोपाठ लागलीच दुसरी अशी बातमी येऊन ठेपली कीं, **द्ला बुर्दोनेनें** आपला काफला इकडे न पाठवितां फ्रान्सला माघारा रवाना केला. आतां आपली तजवीज आपण पाहिली पाहिजे असा प्रसंग येऊन ठेपला तेव्हां **ड्युप्ली** त्या विचारास लागला. आपल्या प्रतिस्पर्ध्यांच्या लोभामुळें येणाऱ्या संकटाचें निवारण करण्याची युक्ति तो पहात होता, ती त्याला सांपडली. **पाँदीशरी**चा किल्ला कांहीं कामाचा नव्हता; कारण त्याच्या तटबंदीचें काम त्यानें चालविलें होतें तें पुरें होत देखील आलें नव्हतें; आणि त्याच्याजवळ फक्त ४३६ युरोपियन लोक लढण्याच्या कामाला लावतां येण्यासारखे होते. परंतु त्यानें मोठ्या मेहेनतीनें एतद्देशीय राजेरजवाड्यांचा जो स्नेह संपादन केला होता तो ह्या प्रसंगीं चांगला फळाला आला. त्याचा उपयोग पुष्कळ मोठा झाला. **ड्युप्लीनें** कर्नाटकच्या नबाबाला पत्र पाठविलें. त्यांत आपल्या वाडवडलांचा व फ्रेंच लोकांचा किती स्नेह होता तें मनांत आणावें; मराठ्यांनीं कर्नाटकावर स्वारी केली तेव्हां **पाँदीशरी**चे फ्रेंच नबाबाच्या कोणत्या प्रकारें उपयोगी पडले तें ध्यानांत आणावें; फ्रेंच लोक आपल्या आसपासच्या, सभोतालच्या सर्व लोकांशीं कसे वागत असतात तें लक्षांत आणावें; त्यांची इच्छा स्वस्थपणें रहाण्याची आहे; इत्यादि गोष्टी लिहून शेवटीं अशी विनंति केली होती कीं, इंग्रज लोक हे आपलीं भाडेकरी कुळें आहेत, मी दिल्लीच्या मोगल बादशहाच्या पदरचा नबाब असून स्वतः आपला दोस्त आहें; तर अशा अम्मलदाराच्या ठाण्यावर आपल्या भाडोत्री कुळांनीं हल्ला करण्याचें मनांत आणलें असतां आपण आपला अधिकार चालवून त्यांना ताकीद देऊन ते कांहीं गडबड करतील तर ती चालूं देऊं नये.

नबाब **अन्वारुद्दीन** हा कर्नाटकच्या गादीवर नुकताच बसला होता, परंतु **ड्युप्लीनें** लिहिलेल्या सर्व गोष्टी त्याला चांगल्या माहीत होत्या. त्याला किंवा हिंदुस्थानांतल्या इतर कोणाही मनुष्याला, हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर एथें एक तेथें एक अशा दूरदूरच्या ठाण्यांत राहिलेले युरोपियन लोक म्हणजे कोणी मोठे आहेत, किंवा त्यांचे कांहीं मनांत आणण्यासारखे हक्क आहेत, ते पाहिले पाहिजेत

असें वाटत नव्हतें. ते फक्त वरिष्ठ सरकारचीं कुळें, निवळ व्यापारी, सरकारची मर्जी असेपर्यंत रहाणारे, याच्यापलीकडे कांहीं नाहीं असेंच सारे समजत होते. परंतु त्यांतल्या त्यांत फ्रेंच लोक सभ्य, स्नेहाभिलाषी, कोणाच्या वाटेस न जाणारे, दुसऱ्याचें मन धरण्याविषयीं झटणारे, असा त्यांचा लौकिक होता. दुसऱ्याच्या उपयोगीं पडण्याच्या संधीही त्यांना आलेल्या होत्या. त्या प्रसंगीं ते कशा प्रकारें वागले तें पाहून त्यांच्याविषयीं लोकांचा ग्रह चांगला झालेला होता. त्यामुळें **ड्युप्लीची** विनंती कांहीं फुकट गेली नाहीं. **अन्वारुद्दीनानें** ती चांगली मनास आणून **मोरोसला** सांगून पाठविलें कीं फ्रेंचांच्या ठाण्यावर हल्ला करशील तर खबरदार. त्यानें त्याला असेंही कळविलें कीं, दोघांनाही एकच गोष्ट लागू; फ्रेंचांना मी तुमच्या ठाण्यावर हल्ला करूं देणार नाहीं.

याप्रमाणें तें मोठें संकट आलेलें तूर्त तर टळल्यासारखें झालें आणि **पाँदीशरी**चा बचाव झाला. परंतु इंग्रजी काफला येऊन हजर झाला होता आणि समुद्राच्या बाजूनें **पाँदीशरीला** वस्तुतः त्याचा वेढा पडल्यासारखाच होता; म्हणून **ड्युप्ली**ची काळजी कांहीं अजून दूर झाली नव्हती. **द्‌ला बूर्दोने** काफला घेऊन येतो अशी त्याला सूचना आली होती, परंतु तो येण्याची आशा कधींच नाहींशी झाली होती; तेव्हां आतां काय करावें अशा विवंचनेंत तो पडला असतां सन १७४५ च्या मे महिन्यांत जेव्हां त्याला अशी पक्की विश्वसनीय बातमी आली कीं **द्‌ला बूर्दोनेचीं** जहाजें पश्चिम किनाऱ्यावर दूर नजरेस पडलीं. तेव्हां सारी काळजी दूर होऊन त्याला जो आनंद झाला त्याचें कांहीं वर्णन करतां येत नाहीं. त्याची वाचकांनीं कल्पनाच करावयाची.

**द्‌ला बूर्दोने** लहानपणींच काम करूं लागल्यापासून हा मोठ्या योग्यतेस चढेल असें दिसूं लागलें होतें. **ईल आफ फ्रान्स** आणि **बूरबॉन** या बेटांचा गव्हर्नर **मस्य द्यूमा** याच्या जागीं सन १७३५ मध्यें त्याची नेमणूक झाली. त्या बेटांना पुढें जी भरभराट आली तिचा पाया त्यानें दुसऱ्यांना शिकवून व आपण आपल्या हातानें काम करून दाखवून घातला होता. हें सांगणें म्हणजे त्याची मोठीशी प्रतिष्ठा गाइल्यांतलें आहे असें नाहीं. फ्रान्साची इंग्लंडाशीं लढाई जुंपण्याचा प्रसंग आला तर हिंदी महासागरांत एका जागीं बसून कवाईत शिकवून फौज तयार करतां येईल, आपल्या शत्रूंचीं गलबतें त्या मार्गानें चाललीं

असतां तेथून टेहेळून त्यांवर तुटून पडतां येईल, स्वारी करण्यास आधारभूत असें ( base of operations ) हें स्थळ झाल्यानें आपल्या हिंदुस्थानांतील ठाण्यांस त्यापासून अतिशय नफा होईल; फ्रान्सच्या ताब्यांतलीं हीं दोन बेटें म्हणजे जसें हवें तसें मूलाधार-स्थलच आहे, तेथें गलबतें आणि शिपाईमनुष्यें एवढेंच काय तें कमी आहे, इत्यादि गोष्टी आपल्या सरकाराला आपण समक्ष जाऊन सांगून त्यांची खात्री करून द्यावी म्हणून सन १७४० मध्यें तो फ्रान्सला निघून गेला होता. त्याचें बोलणें कांहीं एकदम मान्य झालें नाहीं. त्याची पुष्कळ वेळ झिडकारणीच झाली. तरी पण अखेर आपल्या बोलण्यांत अर्थ आहे अशी त्यानें * **कार्डिनल फ्लुरी** याची खात्री करून दिली आणि मग सन १७४१ मध्यें त्याला कंपनीकडून पांच गलबतें मिळालीं तीं घेऊन तो आपल्या जागीं माघारा आला. तो तेथें येऊन पोहोंचतो न पोहोंचतो इतक्यांत त्याला अशी बातमी समजली कीं, कर्नाटकावर मराठ्यांनीं स्वारी केली असल्यानें **पाँदीशरी** संकटांत आहे. ( त्या स्वारीची हकीगत मागें सांगितलीच आहे. ) मग तो तत्काळ **पाँदीशरीस** जाण्यास निघाला. तेथें दाखल झाल्यावर त्याला असें समजलें कीं, **मस्य ड्यूमा** यानें आपल्या बुद्धिचातुर्यानें आलेलें संकट वारलें आहे; परंतु पश्चिम किनाऱ्यावर **माही** हें ठाणें संकटांत आहे. तेव्हां तो तसाच उलटून तिकडे गेला आणि त्याचें भय नाहींसें करून स्वस्थानीं माघारा गेला. तेथें जाऊन पोहोंचतो तों तीं गलबतें फ्रान्सला परत पाठवून द्यावीं असा **कार्डिनल फ्लुरी** याचा हुकूम येऊन पडलेला त्यानें पाहिला. हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर येवढें थोरलें आरमार आपण पाठविलें म्हणून इंग्लंडला राग येईल अशी त्या मुत्सद्याला भीति पडून त्यानें तें माघारें बोलाविलें होतें. **द्‌ला बूर्दोने** यानें हुकूम मान्य करून तीं गलबतें माघारी लावून दिलीं आणि आपल्या जागेचा राजीनामा पाठवून दिला. इतकें होतें तों **फ्लुरी** वारला. पुढें थोड्याच महिन्यांनीं लढाई ठरली. **द्‌ला बूर्दोनेनें** ज्या प्रसंगाचें भविष्य केलें होतें आणि जो टाळण्याची तयारी असावी असें सुचविण्याकरितां मुद्दाम फ्रान्सापर्यंत धांव ठोकली होती तो प्रसंग तर येऊन ठेपला. परंतु ज्या उपायानें तें उठलेलें काहूर शमविण्याचें त्यानें योजलेलें होतें तें त्याच्या हातांतलें शस्त्र त्याच्या वरिष्ठांनीं आपल्या मूर्खपणानें हिसकून घेतलें

* **कार्डिनल फ्लुरी** हा फ्रान्सचा मुख्य प्रधान होता.

होतें. बराच काळ गेल्यावर त्या सरकाराला आपला मूर्खपणा दिसून आला आणि त्यांनीं त्याला राजीनामा देऊं नको, आपल्या जागेवर रहा आणि हातून होईल तितकी उत्कृष्ट कामगिरी बजाव असा हुकूम फरमाविला. **द्‌ला बूर्दोनें** जात्या शूर आणि निश्चयी असल्यानें त्यानें कामाचा अगदीं निदिध्यास घेऊन एक आरमार तयार केलें, खलाशी शिकवून तयार केले, शिपायांना कवाईत शिकविली आणि फ्रान्सांतून येणारें जें गलबत दिसलें तें धरलें. इतक्या खटपटीनें नऊ गलबतें तयार झालीं. त्यांवर शस्त्रास्त्रांचा पुरवठा यथायथाच होता आणि मनुष्यबळही बेताचेंच होतें. तरी तीं बरोबर घेऊन दक्षिण हिंदुस्थानांतील फ्रेंचांच्या वसाहतीवर आलेल्या संकटाचें निवारण करण्याला तो तारीख १ जून सन १७४६ रोजीं निघाला. महिना अखेर तो **माहीच्या** बंदरांत येऊन दाखल झाला. तेथें त्याला असें समजलें कीं इंग्लिश काफला ( squadron ) आपल्यापुढें गेलेला आहे. फ्रेंचांच्या **कारिकल** ठाण्यापासून जवळच **नागापट्टनम**जवळ तो पोहोंचल्याची बातमी आलेली आहे. तो तेथें आपल्याला गांठून अडवावें, पुढें जाऊं देऊं नये, म्हणून आपली वाट पहात राहिला आहे. इतकी बातमी कळतांच त्याच्याशीं सामना करण्याला उभें रहावें असें ठरवून तो लागलाच शीड चढवून निघाला. **नागापट्टनम**जवळ उभयतांची गांठ पडून लढाई जुंपली. तींत अमक्याचा जय आणि अमक्याचा पराजय असें साफ म्हणतां येण्यासारखा कांहीं शेवट झाला नाहीं. तरी पण **द्‌ला बूर्दोनेचीच** कार्यसिद्धि झाली. ती अशी कीं, इंग्लिश **कोमोडोर पेटोन** हा पूर्वकिनारा शत्रूच्या संचाराला खुला करून देऊन **त्रिंकोमालीकडे** निघून गेला. मग अर्थातच **द्‌ला बूर्दोने** जयजयकार करीत दोन दिवसांनीं **पाँदीशरी**च्या बंदरांत शिरून गलबतें नांगरून बसला. **ड्युप्ली** आणि **द्‌ला बूर्दोने** ह्या दोघांनाही अधिकार मिळालेला, आपण वरिष्ठ असावें अशी दोघांनाही उत्कट इच्छा; तूं वरिष्ठ खरा, मी तुझ्या हाताखालचा, असें म्हणून तसें वागण्याची एकाचीही इच्छा नाहीं, अशा दोन पुरुषांचा मग निकट संबंध आला. उभयतांच्या भेटीचा दिवस येऊन ठेपेपर्यंत दोघेही एकमेकांशीं अगदीं एकविचारें मिळून वागावयाची आपली अत्यंत उत्सुकता आहे असें बोलून दाखवीत होते. त्या वर्षाच्या आरंभीं **ड्युप्लीनें** **द्‌ला बूर्दोने**ला पत्र पाठविलें होतें त्यांत असें लिहिलें होतें कीं, ' जयश्रीच्या मानाचे भोक्ते तुम्ही

व्हाल. तिच्या प्राप्तीच्या साधनांना माझा हातभार लागला म्हणून मी आपल्याला नशीबवान समजेन; कारण त्यांना जी योग्यता येणार ती केवळ आपल्या कौशल्यानें.' उलटपक्षीं **द्‌ला बूर्दोनेनें** त्याला असें लिहिलें ' आतां पुढें ज्या गोष्टी घडतील त्यांत आपलें उभयतांचें हित सारखेंच आहे असें मानून आपण उभयतांनीं एकविचारें काम करावें हेंच योग्य आहे. माझ्याविषयीं म्हणाल तर, महाराज, मी आधींच आपल्याला सर्वस्वीं वाहिलेला आहें; आणि शपथपूर्वक असें सांगतों कीं, आपल्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. ' आतां फ्रेंच वसाहतींवर संकट गुदरतें, तें अगदीं जवळ येऊन ठेपलें आहे, असें जेव्हां दिसत होतें तेव्हां उभयतांची भेट होण्यापूर्वीं, त्यांचीं भाषणें अशा प्रकारचीं होतीं. परंतु उभयतांची भेट होऊन एक तास लोटला नाहीं तों दोघांत वरिष्ठ कोण असा प्रश्न उत्पन्न झाला. एक पडला हिंदुस्थानांतल्या फ्रेंचांच्या सर्व मुलखाचा डायरेक्टर जनरल, आणि दुसरा स्वतः सिद्ध केलेल्या, सज्ज केलेल्या आणि शिकवून तयार केलेल्या आरमाराचा अधिपति ( Admiral ). इंग्लिशांचें आरमार आलें होतें तें पळालें. **मद्रासवर** पाहिजे तेव्हां हल्ला करतां येण्यासारखा होता. त्या कृत्याला अडचण काय ती एक नबाबाच्या संमतीची. तेवढी मिळविली असती म्हणजे झालें होतें. मग **मोरोस** गव्हर्नर आणि **पेटॉन कोमोडोर** मिळून **पाँदीशरी**चा सत्यनाश करावयाला पहात होते तशीच त्यांनां **मद्रासची** वाट लावतां आली असती. परंतु आतां हें घडणें न घडणें तो फ्रेंच गव्हर्नर आणि फ्रेंच आडमिरल या उभयतांचें एकचित्त होण्यावर अवलंबून आहे असें दिसूं लागलें. **मद्रासचा** किल्ला बऱ्याच अंशीं लढून टिकाव धरण्यासारखा नव्हता. त्याचा बचाव होण्याची मोठी आशा काय ती **डुप्ली** आणि **द्‌ला बूर्दोने** हे भांडण्याचा, निदान एकदिलानें न लढण्याचा, संभव दिसत होता त्यावर होती.



# भाग ३ रा.



## आपलें वर्चस्व स्थापण्याकरितां फ्रेंचांनीं दिलेला पहिला रट्टा.

फ्रेंचांचा हिंदुस्थानांतला मुख्य मुलकी अधिकारी आणि आरमाराचा अधिपति, या उभयतांच्या तंट्यांतल्या एकंदर गोष्टी येथें सांगण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. ह्या पुस्तकांतील कथानकाशीं त्यांतल्या जेवढ्यांचा संबंध येणार तेवढ्यांचा उल्लेख केला म्हणजे पुरे आहे. **दूला बूर्दोने** ह्याला **पारीस** येथून जो हुकूम आला होता त्यावरून हिंदुस्थानांतल्या फ्रेंच वसाहतींवरचा मुख्य अधिकारी **ड्युप्ली,** डायरेक्टर जनरल, याचा जमिनीवर अधिकार सर्वांच्यावरला असें त्याला कबूल करणें भाग पडलें. मद्रासवर हल्ला करून ती आपल्या ताब्यांत आणावी .हीं इच्छा दोघांच्याही मनांत सारखीच प्रबळ होती. परंतु ती पूर्ण होण्याला आतां बार उडवून फत्ते करून घेण्याची वेळ आली तेव्हां **ड्युप्लीचा** अगदीं निर्धार होता, तो असें करावयाचेंच म्हणत होता, तरी **दूला बूर्दोने** हातपाय गाळूं लागल्यासारखा दिसला. तो म्हणाला प्रथम **फोर्ट सेंट डेव्हिडवर** हल्ला करून तो घेऊं. हा किल्ला **पाँदीशरी**च्या दक्षिणेस १६ मैलांवर **गुडलूर** शहराजवळ असून तो सन १६९१ मध्यें इंग्रजांनीं विकत घेतला होता. एकदा त्यांचें मुख्य ठाणेंही तेथेंच होतें. ही अगदीं यःकश्चित गोष्ट; ह्या करण्यांत कांहींच अर्थ नाहीं, असें जेव्हां **ड्युप्ली** निक्षून म्हणाला तेव्हां **दूला बूर्दोने** म्हणाला, तर मग मी शीड उभारून इंग्रजी आरमाराच्या पाठीस लागतों. त्याप्रमाणें गलबतें हाकारून जाऊन त्यानें इंग्रजी आरमार पाहिलें, परंतु त्याला लढाईस उभें रहाणें भाग पाडतां आलें नाहीं; तेव्हां माघारा फिरून तारीख २५ आगस्ट रोजीं तो पुनः **पाँदीशरीस** आला. आतां तरी **मद्रासवर** हल्ला कर असें **ड्युप्ली** म्हणूं लागला, परंतु त्याला तो मान्य होईना. त्याची अगदीं इच्छा नाहीं असें दिसलें. तो जी मोठी हरकत दाखवूं लागला ती ही कीं इंग्रजी आरमाराचा फडशा न उडवतां **मद्रासेवर**

हल्ला केला तर आपल्यावर मोठें संकट गुदरेल. उलटें त्याचें आणखी असें म्हणणें पडलें कीं तारीख १५ आक्टोबरच्या पुढें मला येथें रहातां येत नाहीं. कारण त्या सुमारास इकडला पर्जन्यकाळ ( Monsoon ) बहुधा सुरू होत असतो. तो मोठा भयंकर असतो, त्याच्या वादळाच्या तडाक्यांत ह्या उघड्या बंदरांत जीं गलबतें सांपडतात त्यांचा फडशा उडाल्याशिवाय रहात नाहीं; तर अशा संकटांत किनाऱ्यावर गलबतें घेऊन मला बसतां येणार नाहीं. कांहीं सांगितलें तरी ह्याचें मन वळत नाहीं, हा आपलाच हेका चालवणार असें दिसलें तेव्हां **ड्युप्ली** म्हणाला, आतां असें उपयोगीं नाहीं. ह्याला अन्य उपायानें जेरीस आणलें पाहिजे. मग त्यानें आपल्या कौन्सिलाच्या संमतीनें काय करावयाचें तें ठरवून त्याप्रमाणें त्याला दोन गोष्टी लेखी कळविल्या; आणि दुसऱ्या दिवशीं म्हणजे तारीख २७ आगस्ट रोजीं पुनः पत्र पाठवून असें विचारलें कीं, काल आम्ही आपल्या राजाच्या आणि कंपनीच्या तर्फेनें म्हणून ज्या दोन गोष्टी सुचविल्या त्यांतली कोणती तरी एक करणार कीं नाहीं ? कौन्सिलमध्यें सर्वांनुमतें ठरलेले जे दोन बेत त्यांनीं त्याला सुचविले होते, त्यांतला पहिला असा होता कीं, मद्रासवर हल्ला करावा; आणि दुसरा इंग्रजी आरमाराच्या पाठीस लागून त्याचा विध्वंस करावा. त्यांनीं त्याला आणखी असें लिहिलें होतें कीं, सध्याच्या स्थितीला योग्य, राजाच्या वैभवाला अनुरूप, राष्ट्राच्या प्रतिष्ठेला शोभेल अशा, कंपनीचें ज्यांत हित आहे अशा, तुमच्या आरमाराच्या शक्तीला शोभण्यासारख्या आणि शत्रूचा जमिनीवर व समुद्रावर जो कमकुवतपणा आहे त्याला उचित, अशा आम्ही ज्या ह्या दोन गोष्टी सुचविल्या आहेत, एवढ्याच आम्हाला सुसाध्यशा वाटतात. दोनही बेत अगदीं उघड करून दाखविलेले होते. ते हे कीं **द्‌ला बुर्दोनेनें** मद्रासवर हल्ला तरी करावा, नाहींतर इंग्लिश आरमाराचा पाठलाग करीत निघून तरी जावें.

याप्रमाणें **ड्युप्ली** जेव्हां अगदीं निकरावर आला तेव्हां दुसऱ्या दिवशीं **द्‌ला बूर्दोनेनें** आपल्या आरमाराला मद्रासच्या किनाऱ्याला जाऊन नांगर टाकून उभे रहाण्याचा हुकूम करून त्याची रवानगी केली. तो स्वतः तारीख १२ सप्टंबर रोजीं आपलें गलबत हाकारून निघाला. तारीख १४ रोजीं **मद्रासला** पोहोंचून त्याच दिवशीं सायंकाळीं त्यानें इंग्लिशांच्या किल्ल्याच्या दक्षिणेस १२ मैलांवर ६०० मनुष्यें आणि दोन तोफा उतरल्या. दुसऱ्या दिवशीं फौज उतरून एकंदर

११०० युरोपियन ४०० शिपाई आणि **बूर्बेमधून** आणलेले सुमारें तितकेच आफ्रिकन असा मोठा जमाव करून तो **फोर्ट सेंट जॉर्ज**वर चालून गेला. किल्ल्यापुढें उभा राहून त्यानें तेथच्या गव्हर्नरास सांगून पाठविलें कीं, किल्ला आमच्या स्वाधीन करा.

गव्हर्नर **मोरोस** याची किल्ला लढवून कांहीं वेळ तरी टिकाव धरवेल अशी स्थिति मुळींच नव्हती. त्या वेळेस त्याच्याजवळ सारे ३०० तीनशें गोरे शिपाई होते; त्यांपैकीं फक्त २०० कामाच्या उपयोगीं होते. किल्ल्यांत जे व्यापारी किंवा वखारीवाले होते त्यांत पुढें थोड्या वर्षांनीं **ड्युप्लीचें** सारें बेत लटपटवून टाकणारा पुरुष जो **क्लाईव्ह** तो आतांही होता हें खरें; परंतु या वेळीं त्याची ती तीव्र बुद्धि विकास पावलेली नसल्यानें तिचा प्रकाश पडूं लागला नव्हता; इतकेंच नव्हे, त्याचें तोंड म्लान झालेलें आणि मन अत्यंत उदास असलेलें दिसे; अशा निरुत्साही शरीरांत त्या बुद्धीचें गुप्त वास्तव्य होतें, परंतु ती प्रकट झाली असती तरी तिचा कांहीं उपयोगही झाला नसता. कारण आतांचा प्रसंगच असा बिकट होता कीं पुढें लौकरच **रॉबर्ट क्लाइव्ह** यानें जें बुद्धिचातुर्य दाखविलें तें आतां दाखविलें असतें तरी त्यानें आलेलें संकट कांहीं दूर झालें नसतें. कर्नाटकच्या नवाबानें **पाँदीशरीचें** संरक्षण केलें तसें आतां मद्रासचें करावें म्हणून **मोरोस** गव्हर्नरानें यत्न करावयाचा तो केला, नाहीं असें नाहीं; परंतु तो जसा नीट युक्तीच्या वाटेनें, चातुर्यानें करावयास पाहिजे होता तसा त्याला करतां आला नाहीं. त्यामुळें त्यानें पाठविलेल्या निरोपाला उत्तर न मिळतां नवाबाकडे गेलेला मनुष्य मुकाट्यानें परत आला. **मोरोस**चा उपाय खुंटला तेव्हां मग त्यानें तारीख २१ रोजीं तो किल्ला आणि त्या खालचा मुलुख **द्‌ला बूर्दोने**च्या स्वाधीन केला. त्यांतले शिबंदीचे लोक लढाईतले कैदी म्हणून स्वाधीन झाले.

याप्रमाणें मद्रास ताब्यांत आल्यावर आतां त्याची पुढची व्यवस्था लावण्याचा अधिकार **द्‌ला बूर्दोनेचा** कीं, **ड्युप्ली** आणि त्याचे कौन्सिलर यांचा हा वाद उपस्थित झाला. परंतु तो प्रस्तुतचा विषय नसल्यानें त्याची हकीगत येथें देण्याचें कारण नाहीं. येथें येवढें सांगितलें म्हणजे पुरे आहे कीं, असा वाद उत्पन्न होईल हें भविष्य जाणूनच कीं काय न जाणों, त्यांच्या वरिष्ठांनीं आधींच एक खलिता पाठवून दिला होता. त्यांत सर्व अधिकार **ड्युप्ली**चा असें निर्णित केलेलें

होतें. असो. मद्रास घेतल्यापासून सुमारें सवा महिनाभर तेथचा अधिकार ती घेणाऱ्या फ्रेंच आरमाराच्या अधिपतीकडे असावा कीं, फ्रेंच मुलखाच्या डायरेक्टर जनरलाकडे असावा हा वाद चालला होता. त्यांत अत्यंत अश्लाघ्य प्रकार दिसून येऊन अखेर तारीख २३ आक्टोबर रोजीं **दूला बूर्दोननें फोर्ट सेंट जॉर्ज** आणि त्याच्याखालीं असलेला मुलुख **पाँदीशरी**च्या कौन्सिलपैकीं एक मेंबर **मस्य दे प्रे मेनीय** ( M. Despremesnil ) याच्या स्वाधीन केला. तारीख १५ आक्टोबरला पर्जन्यवादळ ( monsoon ) सुरू होऊन गलबतांना इजा झाली म्हणून त्यांची दागदुजी करतां आली तितकी करून **दूला बूर्दोने** आपलें आरमार घेऊन **मद्रासे**हून **पाँदीशरीस** निघून गेला; आणि तेथून शेवटीं **बूर्बा** बेटांना आणि तेथून फ्रान्सला गेला.

**दूला बूर्दोने** निघून गेला तेव्हां **ड्युप्ली**च्या चित्ताला स्वस्थता आली. आतां हिंदुस्थानांत काय पाहिजे तें करण्याला त्याला अडचण उरली नाहीं. त्या विशालबुद्धिपुरुषाचा एवढा वेळपर्यंत सारा एक हेतु होता; तो असा कीं हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर ज्या युरोपियन लोकांनीं पाय ठेविला आहे त्यांना हांकून लावून एकट्या फ्रान्सानें हातपाय पसरावे असें कांहीं होणें नाहीं तर निदान फ्रान्सानें सर्वांत श्रेष्ठ तरी असावें. त्याचे सर्व परिश्रम ही इच्छा पूर्ण करण्याकरितां चालले होते. त्यानें आतां असें मनांत आणलें कीं, इंग्रजांची **मद्रास** घेतली खरी, परंतु ही फ्रेंचांकडे रहाण्याला नवाबाची परवानगी पाहिजे; त्यावांचून रहाणार नाहीं म्हणून हर तऱ्हेनें ती मिळवण्याची खटपट करावी. त्या नवाबाच्या परवानगीशिवाय त्याला आधीं **मद्रासवर** हल्लाच करतां येत नव्हता. त्यानें त्याचीं आर्जवें करून परवानगी घेतली तेव्हां त्याला असें सांगितलें होतें कीं आम्हीं मद्रास हल्ला करून काबीज केली एवढें झालें म्हणजे पुरे, आम्हाला तिचा लोभ नाहीं, घेण्याबरोबर लागलीच तुमच्या हवालीं करूं असें अगदीं पक्कें समजा. याप्रमाणें नवाबाला वचन देतेवेळीं त्याच्या मनांत कांहीं पाप नसावें; त्याचें अंतरंग पुष्कळ अंशीं शुद्ध असावें. परंतु पुढें **मद्रास** घेतल्यावर **दूला बूर्दोने** ती त्याच्या स्वाधीन करीना आणि काळ लोटत चालला तसतसा रंग पालटत चालला. त्याच्या वचनावरचा नवाबाचा भरंवसा उडाला. **दूला बूर्दोने** माझ्या हुकमांत नाहीं, तो किल्ला माझ्या ताब्यांत देत नाहीं म्हणून मला तो आपल्या अम्मल-

दाराच्या स्वाधीन करतां येत नाहीं; ही त्यानें सांगितलेली सबब नबाबाला कांहीं खरी वाटेना. **ड्युप्लीनें** आपल्याला फसविलें असें त्याच्या मनांत येणें सहजच होतें. त्याप्रमाणें येऊन तो अगदीं संतापून गेला. स्वेच्छाचारी राजाचें मन क्षुब्ध झालें म्हणजे त्याच्या रागाचे जे जे आविर्भाव व्हावयाचे ते ते होऊं लागले; आणि फ्रेंचांना तो किल्ला आपल्या स्वाधीन करण्याचें भाग पाडण्यासाठीं **द्‌ला बूर्दानें** तेथून जाण्यापूर्वींच तो किल्ल्याजवळच सैन्याची जमवाजमव करूं लागला. आपल्यावर येणारें हें संकट **ड्युप्लीला** दिसत नव्हतें किंवा तें त्याच्या खिसगणतींतही नव्हतें असें नाहीं. परंतु त्याचा नाइलाज झाला होता. त्याची स्थिति कष्टमय होत चालली होती. **द्‌ला बूर्दानेनें** इंग्रजांपासून किल्ला ताब्यांत घेतेवेळीं त्यांनां असें वचन दिलें होतें कीं, हा शेवटीं तुमचा तुम्हाला परत देऊं. हा करार मला अगदीं कबूल नाहीं असें **ड्युप्लीनें** त्याच वेळीं अगदीं निक्षून सांगितलें होतें. त्याचें म्हणणें असें होतें कीं फ्रेंच फौजेनें आपल्या पराक्रमानें इंग्रजांना जेरीस आणून मद्रासचें ठाणें मुकाट्यांनीं आमच्या स्वाधीन करणें भाग पाडलें आहे, त्याला शर्तबिर्त कांहीं एक नाहीं. **द्‌ला बुर्दानेनें** केलेलें करारपत्र तो मंजूर करीना. मीं केलेल्या स्पष्ट हुकमाच्या उलट हा करार असल्यानें मला मान्य नाहीं असें तो साफ म्हणाला. परंतु नबाबाला तसा जबाब त्याच्यानें देववेना. त्याच्याशीं त्याची स्थिति अगदीं निराळ्या प्रकारची होती. मद्रास घेण्याबरोबर तुमच्या स्वाधीन करतों असें वचन देऊन तीवर चालून जाण्याची त्यानें परवानगी मिळविली होती. परंतु आतां किल्ला हातीं आला तसें त्याचें मन बदललें; हरतऱ्हा करून युक्तिप्रयुक्तीनें, जो साधेल तो मार्ग योजून त्या वचनाच्या पाशांतून निसटून जाण्याचा प्रयत्न करावयाचाच असा त्यानें निश्चय केला. ह्या पूर्व किनाऱ्यावर इंग्रजांचीं जितकीं ठाणीं आहेत तितकीं सारीं घेऊन ह्या दुकानदारांना आतां आपणाला येथून हांकून लावतां येईल असें वाटूं लागून त्याला अत्यानंद होत होता. त्याला भीति कायती एवढीच पडली होती कीं न जाणो, आपण फ्रान्साकरितां इतकी जिवापाड मेहेनत करून काबीज केलेला किल्ला नबाबाच्या हातांत गेला तर तो त्यांना देऊन टाकील. **द्‌ला बुर्दानेचें** आणि त्याचें सख्य होऊन दोघे एकविचारें वागण्याचा जर संभव असता तर तो याच्याहीपेक्षां दूरच्या कल्पनातरंगांत गर्क झाला असता. पर्जन्यकाळ सुरू होण्यापूर्वीं जर **द्‌ला**

**बूर्दोने** आपलें आरमार घेऊन हुगळी नदीवर जाता तर जी **मद्रासची** तीच **चटानटीची ( कलकत्याची )** दशा उडवून त्याला आपल्या देशबांधवांना सर्वांत श्रेष्ठपद प्राप्त करून देतां आलें असतें, इतकेंच नव्हे, तर **हुगळी**पासून **कन्याकुमारी**पर्यंत सर्व मुलखांत त्यांचा अव्याहत अम्मल बसवून देतां आला असता.

परंतु तो **द्ला बुर्दोने** तर निघून गेला. तथापि **ड्युप्लीला** असें वाटत होतें कीं, मद्रास जर आपल्या हातांत कायम राहील तर आपल्या मनोरथाचा एक भाग सिद्धीस गेल्यासारखें होईल. म्हणून तो इष्ट हेतु साधण्याकरितां त्यानें नबाबाकडे वकिली बोलणें लावून कार्य उरकून घेण्यासाठीं आपली होती तेवढी शिकस्त करून पाहिली; पण तो नवाब कांहीं वळेना. तो अगदीं संतापून गेला होता आणि त्याच्या सल्लामसलतगारांना असें वाटलें होतें कीं, यांनीं आपल्याला फसविलें आणि तें कांहीं त्यांना सहन करवेना. म्हणून नवाबानें फौज जमविण्याची आणि लढाईच्या सामानसुमानाची तयारी चालविलीच होती. ती पुरी होतांच त्यानें आपला मुलगा **माफुजखान** ह्याला **मद्रासच्या** किल्ल्यावर हल्ला करून तो घेण्याची कामगिरी सांगितली. इकडे **ड्युप्लीचा** निश्चय ठरला कीं किल्ला हातचा सोडा-वयाचा नाहीं. त्यानें **दे प्रे मॅनीय** याला असा हुकूम पाठविला कीं, प्राणाची पर्वा न करतां **फोर्ट सेंट जॉर्जचें** संरक्षण कर. कुमक लौकर पाठवितों. **माफु-जखान** तारीख २५ आक्टोबरच्या सुमाराला **मद्रास**पुढें जाऊन तळ देऊन बसला. त्याच्या बरोबर १०००० सैन्य होतें. त्यांत बहुतेक घोडेस्वारच होते. किल्ल्यांत सुमारें ५०० लोक होते; त्यांना पाणी मिळेनासें करून टाकून त्यानें थोड्याच दिवसांत अगदीं जेरीस आणलें. तेव्हां तारीख २ नोव्हेंबर रोजीं **दे प्रे मॅनीय** यानें पाण्याचे झरे विहिरी वगैरे ठिकाणें स्वाधीन करून घेण्याकरितां शत्रू-वर अकस्मात् जाऊन तुटून पडावें असा हुकूम करून एक ४०० लोकांची तुकडी पाठविली. त्यांच्याबरोबर त्यानें दोन तोफा दिल्या. व्यापाराकरितां आलेले, आर्जवें करून जागा मागून घेऊन ठाणीं घालून राहिलेले, वसाहतवाले युरोपियन लोक आणि ह्या देशचे शिपाई यांच्यामधली ही अगदीं पहिली लढाई. येथून पुढें उभयतांमध्यें ज्या लढाया झाल्या त्यांचा हा पहिला मासला होता. त्या दोन तो-फांनींच सारें काम उरकलें. एकदां गोळा उडाला म्हणजे पुनः दुसरी सरबत्ती

होईपर्यंत मध्यें पुष्कळ वेळ जातो अशी इकडच्या लोकांची समजूत असून त्यांना आजपर्यंत तीच संवय होती; म्हणून पहिली सरबत्ती झाली तेव्हां ते कांहीं गडबडले नाहींत. परंतु तिच्या पाठोपाठ त्याच तोफांतून लागलीच दुसरी सरबत्ती होतांना त्यांना मोठें आश्चर्य वाटलें. आणि तिच्याच पाठोपाठ जेव्हां तिसरी झाली तेव्हां तर ते घावरून गेले आणि सैरावैरा धांवत पळत सुटले. त्यांचें ७० मनुष्य पडलें परंतु फ्रेंचांकडचें एक कोणी जखमी देखील झालें नाहीं.

परंतु थोडक्याच तासांनीं नबाबाच्या छावणींत उडालेली ती गडबड कमी झाली आणि त्याचे हेर **माफूजखाना**कडे बाहेरून अशी बातमी घेऊन आले कीं, किल्ल्यांतल्या लोकांच्या मदतीला फ्रेंच फौज येत आहे. तींत गोरेलोक सारे २३० असून ७०० शिपाई आहेत आणि त्यांच्याबरोबर तोफ एकही नाहीं. हें वर्तमान कळतांच **माफूजखान** अगदीं निर्भयपणें आपली १०००० फौज घेऊन त्यांच्यावर निघाला. त्यांना **अड्यार** नदी उतरून आलीकडे येऊंच द्यावयाचें नाहीं असा त्यानें बेत केला. ह्या मदतीस येणाऱ्या सैन्याचा नायक **पॅरॅडिस** नामक एंजिनीअर खात्यांतला एक कामदार होता. तो फार हुशार होता. तो तारीख ४ नोव्हेंबर रोजीं **अड्यार**नदीच्या उत्तरतीराला येऊन पोहोंचला आणि पहातो तर पलिकडच्या बाजूस शत्रूच्या अफाट सैन्याच्या खेंचून रांगांच्या रांगा लागल्या आहेत; एवढ्या सेनासमुद्रांतून पार होऊन जाणें दुर्घट आहे. तरी पण आतां आपल्या देशबांधवांच्या नशीबावर हवाला ठेवून याच्याशीं गांठ घालावी किंवा मुकाट्यांनीं पळून जावें, याशिवाय दुसरा मार्ग नाहीं असें दिसतांच कसें करूं काय करूं न म्हणतां, क्षणैक विलंब न करतां तो झट्कर नदी उतरून आलीकडे आला. तेथें फौज उभी करून त्यानें शिलका ( फैर ) * झाडण्यास हुकूम केला आणि तत्काल पुढें असलेल्या त्या प्रचंड जनसमूहावर चाल केली. त्याचा परिणाम त्यांच्यावर अकस्मात् वीज पडावी तसा झाला. शत्रूनें असें विलक्षण धाष्टर्य केलेलें एतद्देशीय लोकांनीं कधींच पाहिलेलें नसल्यानें ते अगदीं घाबरून गेले आणि पळत सुटले. इतक्यांत **मद्रासच्या** किल्ल्यांतून फौज बाहेर पडली आणि तिनें अकस्मात् पाठीमागून येऊन हल्ला केला. मग काय विचारावें ! त्यांची

* शिलक असा मराठी शब्द आहे. फैर झडली म्हणतात तो fire याचा अपभ्रंश आहे.

अगदींच दुर्दशा झाली. असा पूर्ण जय कधींच कोणाला मिळाला नसेल, किंवा युद्धाचा शेवट असा कधींच झाला नसेल.

ही लढाई खरोखर स्मरणांत ठेवण्यासारखी झाली. मद्रासच्या किल्ल्यांतून फ्रेंचांच्या टोळीनें अकस्मात् बाहेर पडून हल्ला केला आणि नबाबाच्या फौजेची त्रेधा उडविली आणि जय मिळविला तो त्यांच्या त्या गोळे उडविण्याच्या विलक्षण तऱ्हेमुळें, असें त्यावेळीं लोकांना वाटलें. परंतु आतां **अड्यार**नदीवर फ्रेंचांजवळ एकही तोफ नव्हती; **माफुजखाना**जवळ कांहीं थोड्या नव्हत्या, पुष्कळ होत्या. तथापि त्यांनीं जो जय मिळविला तो धीटपणा, साहस, धैर्य, आणि संकटाची मुळींच पर्वा न करतां उडी घालणें ह्या गुणांनीं—**सैं तॉमे** हें स्थळ त्या रणांगणापासून जवळच असल्यानें त्या लढाईला **सैं तॉमे**ची लढाई असें म्हणतात. नबाबादिक ह्या देशचे राजेरजवाडे हे प्रभु आणि व्यापाराकरितां या देशांत येऊन राहिलेले युरोपियन लोक हीं त्यांचीं कुळें असा जो आजपर्यंत राजा आणि प्रजा म्हणून सेव्यसेवकसंबंध होता तो ह्या लढाईनें पालटला. फ्रेंच किंवा इंग्रज यांतून कोणीच त्या वेळापर्यंत येथच्या राजांचें वर्चस्व व प्रभुत्व मानण्यास तक्रार केली नव्हती. **फ्रान्स** आणि **इंग्लंड** ह्या दोनही राष्ट्रांचे जे प्रतिनिधि इकडे येत ते कर्नाटकच्या नबाबाचे आम्ही ताबेदार असें संतोषानें म्हणत असत. **सैं तॉमे**च्या लढाईनें या संबंधांत क्रांति घडून आली. युरोपियन लोकांना आणि तसेंच आमच्या लोकांना ही लढाई * **बास्तीय** तुरुंगावरील हल्ल्याप्रमाणें वाटूं लागली. तेथून पुढें असें झालें कीं जो कोणी एखाद्या राज्यावर आपला हक्क सांगण्याला उठे तो मोठ्या आतुरतेनें युरोपियन लोकांचें साहाय्य

---

* पारीसमध्यें हा मोठा मजबूद किल्ला होता. पुढें पुढें त्यांत राजकीय कैदी ठेवून त्यांचे फार हाल करीत. फ्रान्समध्यें राजक्रांति झाली तेव्हां लोकांनीं अगदीं चवताळून त्यावर हल्ला केला आणि मोठ्या निकरानें लढून तारीख १४ जुलै सन १७८९ रोजीं तो घेऊन अगदीं जमीनदोस्त करून टाकला. त्या जागेवर आतां ब्रांझ Bronze धातूचा एक मोठा थोरला स्तंभ उभारलेला आहे आणि त्यावर मरक्यूरी Mercury , बुध ) देवाची मूर्ति पंख पसरून उड्डाण करीत आहे अशी बसविलेली आहे. सन १७८९ च्या जुलै महिन्यांत आणि सन १८३० मध्यें जे देशभक्त लढले, पडले, त्यांच्या स्मरणार्थ हा स्तंभ उभारला असें त्यावर लिहिलें आहे.

मिळवण्याला झटे. ही क्रांति ड्युप्लीच्या बुद्धीनें घडवून आणली. त्याच्या मनांत नवेनवे तरंग उठूं लागले आणि राज्य स्थापण्याचे अमर्याद बेत येऊं लागले. सारें दक्षिण हिंदुस्थान फ्रेंचांच्या सत्तेंत आतां आपल्यास कसें आणतां येईल हें त्याला ह्या लढाईनें उघड करून दाखविलें. आतां इंग्लंडबरोबर सुरू झालेलें युद्ध असेंच चालावें आणि आपल्याला स्वेच्छ वागण्याला मोकळीक असावी एवढेंच त्याला व्हावयास पाहिजे होतें. मग बाकीचें सारें तो पाहून घेण्यास समर्थ होता.



# भाग ४ था.

## यंत्रांतलें व्यंग.

**डुप्लीच्या** हातांत सर्व गोष्टी होत्या. त्याला हवें तें करतां आलें असतें. **पाँदीशरी, कारिकल** आणि **मद्रास** त्याच्या ताब्यांत होतीं. फ्रेंचांच्या पराक्रमाविषयीं नबाबाच्या मनांत त्यानें चांगलाच दरारा उत्पन्न केला होता. इंग्रज लोकांची एकंदर शिरगणती केली असतां सरासरी २०० संख्या भरली असती. ते सारे **फोर्ट सेंट डेव्हिडमध्यें** शिरून त्याच्या आश्रयाला होते. **पाँदीशरी**च्या दक्षिणेस १६ मैलांवर **गुडलूर** शहराच्या लगत्यास हा किल्ला असून सन १६९१ मध्यें ईस्ट इंडिया कंपनीनें खरेदी घेतलेला होता. तो कांहीं मजबूद नव्हता. तो घेण्याला धाडसानें हल्ला करून यत्न केला असतां हातीं येण्यासारखा होता. कारण **डुप्लीला** समरांगणीं निदान ९०० युरोपियन लोक उभे करतां आले असते.

**डुप्लीच्या** अंगांत पुष्कळ उत्तम गुण होते. तो सर्व गोष्टींची जुळवाजुळव करून उत्तम व्यवस्था करणारा होता; राजकीय स्थिति कशी आहे याचें स्थूलमानानें समालोचन करून जें अनुमान काढावयाचें तें त्याला अगदीं बरोबर काढतां येत असे, आणि आपल्या स्थितींत व्यंग काय आहे, कोणत्या गोष्टींत आपण निर्बळ आहों आणि कोणतींत प्रबळ आहों हें सर्व त्याला उत्कृष्ट प्रकारचें माहीत असे. परंतु त्याच्या व्यवस्थेंत एक न्यून होतें. तो स्वतः रणधीर पुरुष नव्हता. स्वतः समरभूमीवर उभें राहून सेनेचा व्यूह रचून, सेनानायकत्व आपल्या अंगावर घेऊन, युद्ध चालवावयाचें हें सामर्थ्य त्याच्या अंगीं नव्हतें. त्याचा शत्रु म्हणून थोड्याच काळांत जो पुरुष अगदीं प्रमुखत्वानें पुढें उभा रहाणार होता त्याच्या अंगांत तर हा गुण आश्चर्य करण्यासारखा विलक्षण वसत होता. आतां आपण ज्या वेळची हकीगत सांगत आहों त्या वेळीं ( म्हणजे **मद्रास** घेऊन इंग्रजांना तेथून हुसकून लावल्यावर ) **डुप्लीच्या** ध्यानांत असें आलें कीं, इंग्रजांचा अगदीं पूर्णपणें नाश करण्याला अद्याप एक गोष्ट केली पाहिजे. ती

एवढीच कीं त्यांनां **फोर्ट सेंट डेव्हिडमधून** बाहेर हांकून लावावयाचें. तेवढें केलें, त्यांना तेथून हांकललें म्हणजे **मद्रासेस** आरंभलेल्या कार्याची समाप्ति झाली. त्याजपाशीं जवळ जवळ इंग्लिशांच्या पांचपट सैन्य असल्यानें त्याला मनांत आणलेलें तें कृत्य करणें कांहींच कठीण नव्हतें.

ती एक गोष्ट व्हावयाला पाहिजे होती हें आज इतका काल गेल्यावर जसें इंग्रजांना गतकालाचें पर्यालोचन करतांना दिसून येतें तसें **ड्युप्ली**ला त्याच वेळीं स्पष्ट दिसून आलें. मग त्यानें क्षणैक विलंब लावला नाहीं. **फोर्ट सेंट डेव्हि-डवर** चालून जाण्याकरितां ९०० युरोपियन, ६०० कवाइत शिकलेले शिपाई, १०० आफ्रिकन, ६ तोफा आणि ६ गरनळा (Mortars) एवढी फौज त्यानें तयार केली. मग ह्या सेनेचें आधिपत्य कोणास द्यावें हा प्रश्न उत्पन्न झाला. त्या अधिकाराला योग्य असा निदान एक मनुष्य त्याजवळ होता. तो कोण म्हटलें तर **सें तॉमेच्या** युद्धांत विजयी झालेला **पॅरडिस**. परंतु **पॅरडिस** नुसता कप्तान Captain होता. त्याच्यापेक्षां वरच्या पदवीचे जे अम्मलदार होते ते आपला हक्क सांगूं लागले आणि सेनाधिपत्य आपल्यास मिळालें पाहिजे असें म्हणूं लागले. तेव्हां **ड्युप्ली**ला त्यांचें म्हणणें बरोबर, त्यांची तक्रार योग्य, असें वाटून विनाशकाळ आल्यानें विपरीत बुद्धि झाली आणि त्यानें त्या मोहिमेवर **द ब्यूरी** नामक एका ऐशीं वर्षांच्या वयोवृद्ध, दुर्बल, सामर्थ्यहीन, नालायक, मनुष्याची योजना केली. **द ब्यूरी** तारीख १९ दिसेंबर रोजीं **फोर्ट सेंट डेव्हिडवर** चाल करून निघाला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं **पनार** नदी उतरून जाऊन त्यानें एक बाग घेतली आणि तींत तळ दिला. त्या बागेसभोंती भिंत होती. तेथें उतरल्यावर चौकीपहाऱ्याचा वगैरे कांहीं एक बंदोबस्त न करतां त्यानें साऱ्या शिपाईप्याद्यांना खाण्यापिण्याला, स्वयंपाक करण्याला अगदीं मोकळें सोडलें. याप्रमाणें ते अस्ताव्यस्त पसरलेले, बेसावध आहेत असें पाहून कर्नाटकच्या नबाबाच्या दोघा मुलांनीं आपली फौज त्यांच्यावर अकस्मात् ढकलली आणि त्यांची अगदीं त्रेधा उडवून दिली; तेव्हां त्यांची मोठी तारांबळ उडून गेली आणि ते अगदीं लगबगीनें जशी ज्याला वाट सांपडली तसे पळत सुटले. सातच आठवड्यांपूर्वीं २३० मनुष्यांनीं ज्याचा पराभव केला होता तेंच हें नाबाबाचें सैन्य आतां असें विजयी झालें.

**ड्युप्लीला** हा चांगलाच धक्का बसला. तरी पण त्यांतून सांवरतां येणार नाहीं असेंच केवळ नव्हतें. त्याचा परिणाम होतां होईल तितका कमी भोंवावा म्हणून त्यानें नबाबाबरोबर पुनः तहाचें बोलणें सुरू केलें. आपल्याशीं सख्य व्हावें अशी नबाबाची इच्छा आहे असें त्याला वाटण्याला कांहीं कारण झालें होतें. **मद्रासचा** किल्ला **फोर्ट सेंट जार्ज** नबाबाच्या स्वाधीन केला म्हणजे तो कसा बसा वळेल असें त्याला एकंदरींत दिसून आलें. तेव्हां कसा तरी बरावाईट तह ठरावा म्हणून **ड्युप्लीनें फोर्ट सेंट डेव्हिडवर** समुद्राच्या बाजूनें अकस्मात् हल्ला करण्याचा निश्चय केला. त्या कामाकरितां त्यानें ५०० मनुष्यें गलबतांवर चढवून तारीख १० जानेवारी रोजीं त्यांना हल्ला करण्याला पाठवून दिलें. परंतु त्या प्रसंगीं एक महाभूत त्याच्यावर रुष्ट झालें! वादळ झाल्यामुळें त्या गलबतांना माघारें फिरावें लागलें.

इतकें झालें खरें, तरी अद्यापि दैव अगदींच फिरलें असें कांहीं नव्हतें. तें अंध दैवत कांहीं कंटाळलें नव्हतें. त्यानें त्याला आणखी एकवार संधी आणून दिली आणि ती अशी तशी नव्हे, खरोखर मोठी, उत्तम संधी होती. **फोर्ट सेंट डेव्हिडवर** घाला घालण्याचा यत्न निष्फळ होऊन तीं गलबतें परत आल्यावर दहा दिवसांनीं फ्रेंचांच्या चार गलबतांचा एक काफला त्या किनाऱ्याला आला. त्यावर **कोमोडोर डारडेलीन** हा मुख्य सरदार होता. त्याच्या साहाय्यानें इंग्लिशांच्या त्या किल्ल्यावर पाण्यांतून आणि जमिनीवरून असा दोहींकडून जर एकदम हल्ला झाला असता तर तो सर झाल्याशिवाय राहिलाच नसता असें वाटतें. परंतु तसा यत्न कां झाला नाहीं हें सांगणें कठीण आहे. एक अनुमान असें आहे कीं, **डारडेलीन** हा कांहीं धाडशी मनुष्य नव्हता आणि **पॉंदीशरीच्या** कौन्सिलाचा त्याच्यावर कांहीं हुकूम चालत नव्हता. तो समुद्रावर स्वतंत्र, आपल्या आरमाराचा मुक्त्यार होता. तथापि त्या बाऱ्यावर त्याच्या नुसत्या येण्यानें **ड्युप्लीचें** एक कार्य झालें. तें असें कीं, तो नबाब लागलाच कौलास आला. इंग्रजांची तो केव्हांच फारशी काळजी करीत नव्हता. त्यांचे देशबांधव त्यांची कांहीं वास्तपुस्त करीत नाहींत, त्यांना त्यांनीं सोडलें आहे; फ्रेंच कांहीं तसे नाहींत; त्यांच्या साहाय्याला चार लढाऊ गलबतें हजर आहेत, तेव्हां त्यांना पाठबळ आहे असें त्याला वाटलें. त्याला आणखी अशी भीति

उत्पन्न झाली कीं, न जाणो हे फ्रेंच माझ्या **अर्काट** प्रांतांत शिरून कांहीं तरी दंगाधोपा मांडतील. म्हणून **मद्रास**वरचा आपला हक्क सोडून **ड्युप्ली**बरोबर तह करण्यास तो कबूल झाला. आजरोजीं जितका प्रदेश खरोखर फ्रेंचांच्या ताब्यांत आहे तितका त्यांना बहाल केला आहे असें लिहून देऊन त्या तहनाम्यावर त्यानें सही केली. नवाबाचा पुत्र **माफुजखान** यानें स्वतः तो तहनामा तयार करून दिला. ( फेब्रुआरी सन १७४८ )

शेवटीं आतां **ड्युप्ली**ला आपला हेतु पूर्ण करून घेण्याची उत्कृष्ट संधि आली. निकरानें एक हल्ला करण्याचाच काय तो अवकाश होता. **फोर्ट सेंट डेव्हिड**वर एकीकडून जमिनीवरून नीट शिस्तीनें हल्ला आणि दुसरीकडून पाण्यांतून गलबतांवरुन मारा झाला असता म्हणजे तो पाडाव झाल्याशिवाय राहिलाच नसता. कारण ह्या वेळेस आंतल्या शिबंदीला मागच्याप्रमाणें नवाबाच्या फौजेचें साहाय्य मिळण्याची कांहीं आशा नव्हती. परंतु जयप्राप्ति होण्याला एकदम बार उडाला पाहिजे होता. त्याला क्षणैक विलंब खपला नसता. इंग्लिश ( squadron ) काफला **हुगळीं**त होता तो इकडे खालीं येण्याला अगदीं सिद्ध होता. **सेंट डेव्हिड**च्या मदतीकरितां येणारें सैन्य त्यावर चढावयाचें होतें त्याची तो वाट पहात होता. तें येण्याची मुदतही होऊन गेली होती. लढाईमध्यें सुयोग ( opportune moment ) म्हणून एक वेळ येत असते ती अगदीं जपून साधावी लागते . तेवढें चुकलें आणि ती जर का घालविली तर त्याचें प्रायश्चित्त इष्टफळास मुकणें हें भोगावें लागल्याशिवाय कधीं रहात नाहीं. परंतु ह्या प्रसंगीं **ड्युप्ली**नें असली उत्तम संधी घालविली हें तर खरें. असें कसें झालें ह्याचें कारण मात्र कांहीं कळत नाहीं. नवाबाबरोबरच्या तहनाम्यावर सही झाल्यावर तारीख १९ फेब्रुआरी रोजीं **डारडेलिन** शीड चढवून पश्चिम किनाऱ्याला चालता झाला. तूं जाऊं नको, येथें काम आहे, जाणें बरें नव्हे, असें **ड्युप्ली** त्याला कांहीं म्हणाला नाहीं इतकेंच नव्हे, उलट त्यानें त्याला संतोषानें निरोप दिला असें दिसतें. आतां **फोर्ट सेंट डेव्हिड**वर मारा करीत बसावें तर न जाणो, उत्तरेकडील वारा सुरू झालेला आहे त्याच्या जोरावर इंग्लिश काफला येऊन आपल्याला गांठील असें **डारडेलिना**ला भय पडलें असावें असा एक तर्क केला असतां तो संभवनीय आहे.

पुढें काय करणें योग्य आहे हें **ड्युप्लीला** नेहेमीं चांगलें कळत असे. त्याप्रमाणें आतां **डारडोलिन** निघून गेल्यावर पुनः **फोर्ट सेंट डेव्हिड** घेण्याचा प्रयत्न करण्याचा त्यानें निश्चय केला आणि त्यावर स्वारी करण्याची तयारी केली. या प्रसंगीं आम्ही वरिष्ट, आमचा हक्क अधिक, म्हणणाऱ्या त्या अम्मलदारांची संमति घेऊन त्यानें सेनाधिपत्य त्या हुशार **पॅरडिसला** दिलें. तो कामगार तारीख १३ मार्च रोजीं निघाला आणि दुसऱ्या दिवशीं **पनार** नदी उतरून **द् ब्यूरी** ज्या बागेंत उतरला होता आणि मार खाऊन तेथून तारांबळीनें पळाला होता त्याच ठिकाणीं उतरला. तेथून दुसरे दिवशीं सकाळीं किल्ल्याघर चालून जाण्याची त्यानें तयारी केली. परंतु आतां नशीब आडवें आलें. दिसेंबरच्या १० व्या तारखेपासून मार्चच्या ७।८ तारखेपर्यंत म्हणजे चांगले तीन महिने गेले; तितक्यांत केव्हांही हल्ला केला असता तर किल्ला हटकून घेतां येता अशी संधी दैवानें **ड्युप्लीला** किती तरी वेळ आणून दिली होती ! परंतु ती त्यानें साधली नाहीं तेव्हां आतां तें रुसलें आणि त्यानें अकस्मात् असें दाखविलें कीं, आपला कोणी अनादर केला तर तो आपल्याला खपत नसतो. त्याला आपण शासन करीत असतों. बहुधा २४ तास पुरले असते, ४८ तास खात्रीनें पुरे होते. तितक्यांत जर मोठ्या धैर्यानें हल्ला झाला असता तर त्या किल्ल्याला कांहीं नेटानें टिकाव धरवला नसता. परंतु तितकेंच काय तें अंतर पडलें. तेवढी वेळ गेल्याबरोबर पारडें फिरलें. तारीख १४ मार्च रोजीं उजाडलें आणि सकाळच्या प्रहरीं **पॅरडिस गुडलूर** समूर समुद्राकडे पहातो तर इंग्लिश निशाणें फडकावणारीं जहाजें त्यावर पसरलीं आहेत आणि त्यांवर आपण घेण्याला आलेल्या ह्या किल्ल्यांतील शिबंदीच्या मदतीला आलेले १०० लोक आहेत. **फोर्ट सेंट डेव्हिड**ला मदत पोहोंचवावी आणि **पाँदीशरी**ला शह द्यावा असा ह्या आरमाराचा दुहेरी डाव आहे हें ओळखून **पॅरडिस**नें हल्ल्याचा नाद सोडला आणि लगेच तेथून माघारी फिरून **पाँदीशरी**पुढें येऊन तळ दिला. पुढें थोड्याच दिवसांनीं इंग्रजी आरमार तेथें आलें तेव्हां तो शहरांत शिरला. इंग्रजांना ह्या पूर्व किनाऱ्यावरून अजीबाद उचलून टाकावें असा आपण बेत केला होता आणि जे डाव केले होते ते कांहीं साधले नाहींत; आतां उलट ते आपल्यावर तसेच प्रयोग करणार; तर ते सफळ होऊं नयेत म्हणून, त्यांचा प्रतिकार करण्याला आपल्याला

आपली सर्व बुद्धि खर्चून हरतऱ्हा करावी लागेल हें **ड्युप्ली**ला कळून चुकलें होतें.

परंतु नशीबानें त्याच्याकडे वळून आणखी एकवार कृपाकटाक्ष फेंकून पुनः एक चांगली संधी आणून दिली. त्या संकटसमयीं त्याला हात देण्याला एक फ्रेंच काफला आला. त्याला पाहून इंग्रजी आरमार मागें हटलें. वेळेची किंमत काय आहे हें **ड्युप्ली**च्या ध्यानांत आतां चांगलें येऊन **फोर्ट सेंट डेव्हिड**वर घाला घालण्याचा आणखी एकवार यत्न करून पहाण्याचा त्यानें निश्चय केला आणि सैन्य तयार केलें. त्यांत १८०० लोक होते त्यांपैकीं ८०० युरोपियन होते. त्या सैन्याला **फोर्ट सेंट डेव्हिड** घेण्याला त्यानें तारीख २७ जून रोजीं रवाना केलें. त्यावर मुख्य सेनापति त्यानें कोणाला नेमलें होतें हें कळत नाहीं. परंतु तो सरदार अविचारी, उगाच उडी घालणारा, त्या कामाला नालायक असावा असें दिसतें. ह्या वेळीं **फोर्ट सेंट डेव्हिड**मध्यें जो मुख्य सरदार होता तो हिंदुस्थानांत जे मोठे युक्तिमान् आणि धाडशी म्हणून मोठा नांवलौकिक मिळालेले इंग्लिश अम्मलदार होऊन गेले त्यांतला मासला होता. त्याला तेथें येऊन सहा महिने झाले होते. त्याचें नांव मेजर **स्ट्रिंगर लॉरेन्स**. ह्या किल्ल्या-वर अमूक जागीं हल्ला झाला असतां आपल्यावर कठिण प्रसंग येईल, अमूक ठिकाणीं झाला तर आपण त्याची कांहीं फिकीर बाळगणार नाहीं, अशा त्यानें खोट्या नाट्या बातम्या बाहेर पसरल्या. त्या त्या फ्रेंच सरदाराच्या कानीं जाऊन तो फसला. यांत खरेखोटेपणा किती आहे याचा विचार करावा, बातमी काढावी, तपास करावा आणि खात्री करून घ्यावी, तें न करतां जें ऐकिलें तें खरेंच मानून किल्ल्याचा जो खरा सगळ्यांत मजबूद भाग होता त्याच ठिकाणीं त्यानें अगदीं निःष्काळजीपणानें हल्ला केला. झालें, **लॉरेन्स**चा हेतु सिद्धीस गेला. त्यानें त्याच्यावर मोठ्या निकरानें मारा करून त्याचा अगदीं पराभव करून त्याला माघारें फिरायाला लाविलें. आपला यत्न फुकट गेला म्हणून लज्जित होऊन तो खालीं मान घालून **पाँदीशरी**स निघून गेला.

**फोर्ट सेंट डेव्हिड** घेण्याविषयींचा **ड्युप्ली**चा हा शेवटचा प्रयत्न होता. यापुढें थोड्याच आठवड्यांनीं इंग्लिश आरमारावरचा सरदार आडमिरल **बोस्का-वेन** यानें पुष्कळ मजबूद जहाजें आणून **पाँदीशरी**वर हल्ला केला तेव्हां त्याला तिचें संरक्षण करण्याचा प्रसंग आला.

# भाग ५ वा.



## पाँदीशरीला इंग्लिशांचा वेढा.

**ड्युप्लीला** फ्रान्समधून खलिते आले त्यांत त्याला सावध रहाण्याविषयीं सूचना होती. ती अशी कीं, आजपर्यंत हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर कधीं गेलें नाहीं एवढें मोठें आरमार तिकडे जाण्याकरितां इंग्लंडाहून गेल्या नोव्हेंबर महिन्यांत रवाना झालेलें आहे. त्यावर इंग्रजी सैन्यही मोठें आहे. सन १७४८ च्या जून महिन्याच्या अखेरीस तें आतां अकस्मात् येऊन आपल्यापुढें उभें राहील असें त्याला वाटूं लागलें होतें. म्हणून **फोर्ट सेंट डेव्हिड** घेण्याला आतां झटतां येत नाहीं असें समजून त्यानें तो नाद अगदीं सोडून दिला आणि आपली सर्व शक्ति खर्चून **पाँदीशरी**चा किल्ला मजबूद करण्याचें काम हातीं घेतलें. **पाँदीशरी** शहरापासून सुमारें दोन मैलांवर **अर्यांकुपुन** नांवाचा एक लहानसा किल्ला होता, तो त्यानें **पॅराडिसच्या** साहाय्यानें नीट करून त्याच्यावर शत्रूचा बहुधा कांहीं इलाज चालूं नये असा मजबूत करून सोडला. तो किल्ला म्हणजे **पाँदीशरी**ची देवडीच म्हणावयाची. **पॅराडिस** हा **ड्युप्लीच्या** हाताखालीं एक लाख्या मनुष्य होता. खुद्द **पाँदीशरी** शहराभोंवतालचा तट त्यानें असा भक्कम मजबूद केला कीं त्यावर बसून नीट लढलें असतां शत्रूचा कांहीं काट चालूंच नये. शत्रु अफाट सैन्य आणून चढाई करील तरची गोष्ट निराळी, पण एरवीं सहसा दाद लागूं नये असा तो मजबूद झाला होता.

परंतु **आडामिरल बोस्कावेन** यानें आणलेली फौज फारच मोठी होती; त्याचें आरमारही तसेंच अफाट होतें. त्यांत त्याच्या बरोबरचीं आणि इकडचीं हिंदुस्थानच्या समुद्रांतलीं मिळून तीस जहाजें होतीं. त्यांपैकीं १३ तर फार मोठालीं, प्रत्येकावर ७४ किंवा त्याहूनही अधिक तोफा ठेविलेलीं, अशीं होतीं. ( ships of the line carrying 74 or more guns ) त्या आरमारांतून आलेली जमिनीवरची फौज १४०० होती. त्यावेळीं **हालंडही फ्रान्सा**बरोबर लढाईला उभें राहिलेलें असल्यानें त्यानें आपल्या **नागापट्टन-**

मच्या **डच्च** ठाण्यांतून शिबंदीपैकीं १२० लोक देण्याचा करार केला होता. त्याच-प्रमाणें त्यानें आपल्या ईस्ट इंडिया कंपनीच्या जहाजांपैकीं ६ त्यांवरच्या ५०० कसलेल्या शिपायांसुद्धां दिलीं होतीं. ह्या एकंदर फौजेशिवाय दोनही आरमारां-वरचे पुष्कळ शिपाई खुष्कीवर लढण्याला मिळण्यासारखे होते. **पाँदीशरीवर** हल्ला करून लढण्याला **आडमिरल बोस्कावेन** ह्याला निदान ३७२० युरोपियन लोक आणि त्यांच्या मदतीला युरोपियन तऱ्हेनें कवाईत शिकविलेले हत्यारबंद एतद्देशीय शिपाई २००० रां वर, इतके उभे करतां आले असते एवढें अगदीं खचित होतें.

**ड्युप्ली**जवळ **पाँदीशरींत** आणि **अर्याकुपन**मध्यें मिळून १८०० युरो-पियन आणि ३००० शिपाई होते. त्यांना त्या दोन्ही स्थळांचें रक्षण करावयाचें होतें. आपल्यावर चालून येणारें सैन्य त्यांना मोठें अफाट वाटलें.

तीं इंग्लिश व डच्च अशीं दोनही आरमारें एक होऊन तारीख ११ आगस्ट रोजीं **पाँदीशरी**च्या बाऱ्यावर आलीं; आणि तारीख १९ रोजीं जमिनीवरच्या हल्ल्याला सुरवात झाली. हल्ल्याचें काम १७ ऑक्टोबरपर्यंत चाललें होतें.

तो हल्ला मोठ्या नेटानें चालला होता. कारण आडमिरल **बोस्कावेन** ह्याला एवढें पक्कें माहीत होतें कीं, आक्टोबरचा दुसरा आठवडा सुरु झाला म्हणजे ह्या किनाऱ्यावर गलबतांचा निभाव लागत नसतो. त्यांना मोठें भय असतें. **पाँदी-शरी**वर हल्ला करण्यापूर्वीं आधीं **अर्याकुपुन** हस्तगत झाला पाहिजे असें होतें म्हणून त्याच्या हल्ल्याचें काम फारच ईर्षेनें चाललें होतें. त्याचें संरक्षण करण्या-च्या कामीं प्रतिपक्षही सर्वप्रकारें तसाच नेटानें लढत होता. **ड्युप्ली**चा दिवाण त्याच प्रांतींचा **रंगापुले** नांवाचा होता, त्यानें रोजनामा ठेविला होता. त्यांत त्या वेळ्याची आणि किल्ल्याच्या संरक्षणाची रोजची हकीगत लिहिलेली आहे. ती मोठी मनोरंजक आहे. त्या लेखाच्या आधारानें पुढील मजकूर लिहिलेला आहे. **अर्याकुपुन** किल्ल्याच्या संरक्षणाचें काम **परडिस**कडे सोंपविलेलें होतें. तारीख ३० आगस्टपर्यंत शत्रूंनीं जितके हल्ले केले तितके सारे त्यानें माघारे फिरविले. त्या दिवशीं इंग्रजांनीं केलेला यत्न सिद्धीस जाऊन त्याच्या दारूखा-न्याला आग लागून तो उडाला. त्यामुळें आतां येथें आपला निभाव खास लागणार नाहीं असें दिसलें तेव्हां तो आपल्या हाताखालच्या सर्व लोकांसह

तेथून बाहेर पडला आणि **पाँदीशरींत** शिरला. **पाँदीशरी**च्या वेढ्याला खरी सुरवात झाली ती त्याच्या पुढच्या दिवसापासून. मग **ड्युप्ली**चे जे हेर होते त्यांतल्या एका एतद्देशीय मनुष्यानें कांहीं बातमी सांगितल्यावरून **ड्युप्लीनें** तारीख ११ सप्टेंबर रोजीं **परडिस**ला ८००।९०० मनुष्य बरोबर घेऊन त्या हेरानें सांगितल्या ठिकाणीं शत्रूवर अकस्मात् जाऊन तुटून पडण्यास सांगितलें. **परडिस** बरें आहे म्हणून त्याप्रमाणें बाहेर पडला. परंतु त्या हेरानें त्यांना फसवून हळूच शत्रु दबा धरून छपून बसले होते तेथें नेऊन काळाच्या दाढेंत ढकललें. त्यांनीं अकस्मात् एका बाजूनें त्यांच्यावर गोळ्यांचा वर्षाव सुरू केला. **परडिस**च्या मस्तकांतून एक गोळी पार जाऊन त्याचा तेथेंच अंत झाला. याप्रमाणें **ड्युप्ली**च्या हातांतलें तें उत्कृष्ट रत्न गेलें. हें मोठें नुकसान झालें खरें परंतु तो कांहीं निराश झाला नाहीं. त्यानें **पाँदीशरी**चें संरक्षण करण्याचें काम मोठ्या नेटानें असें हिमतीनें चालविलें कीं पर्जन्यकाळ ( Monsoon ) सुरू होण्यापूर्वीं हा किल्ला सर करणें अशक्य आहे अशी आडमिरल **बोस्कावेन** याची हळुहळु खात्री होत चालली. आपलें आरमार किल्ल्याच्या तटाखालीं जितकें जवळ आणवलें तितकें आणून तोफा सुरू करून त्यानें अगदीं गोळ्यांचा भडिमार उडवला. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेर तारीख १३ आक्टोबर रोजीं त्याला असें वाटलें कीं, आतां आपण येथून पाय काढला पाहिजे. दुसऱ्या दिवशीं म्हणजे तारीख १४ रोजीं त्यानें पुढें काय करावें तें ठरविण्याकरितां लष्करी कामगारांची सभा ( council of war ) भरविली. त्या सभासदांचा अभिप्राय त्याच्याचसारखा पडला. मग त्यांच्या संमतीनें मोर्चे उभारलेले पाडून टाकावे, अन्नसामुग्री व सामानसुमान जाळून टाकावें आणि जहाजांवर चढावें असे त्यानें हाताखालील अम्मलदारांस हुकूम केले. त्याप्रमाणें दोन दिवसांत करून तारीख १७ रोजीं ती, त्या वेळापर्यंत हिंदुस्थानच्या भूमीवर पूर्वीं कधीं आली नाहीं एवढी मोठी, गोरी फौज वेढा उठवून **फ्रोर्ट सेंट डेव्हिड**कडे चालती झाली. तिच्या संख्येपैकीं १०६५ लोक फ्रेंचांच्या गोळ्यांनीं आणि आजारानें जायाजखमी होऊन खपले होते. फ्रेंचांकडले २५० लोक कामास आले. त्यांत २०० गोरे आणि ५० काळे होते.

वर सांगितलेल्या **रंगापुले** दिवाणाच्या रोजनाम्यावरून असें दिसून येतें कीं, इंग्रजांना शेवटीं वेढा उठवलाच पाहिजे असें **ड्युप्ली**ला तारीख १ ऑक्टोबर

रोजींच कळून चुकलें होतें. वेढा घालणारांतले कांहीं लोक त्यानें कैद केले होते, त्यांच्याकडून त्याला असें समजलें कीं, त्यांच्या सैन्यापैकीं अमूक लोक मेले आणि बाकीच्यांचें धैर्य खचलें आहे आणि आडमिरल **बोस्कावेन** संतापला आहे. तारीख ६ रोजीं आणखी कैदी सांपडले, त्यांनीं असें सांगितलें कीं, शत्रूच्या सैन्यांत आजार पसरला आहे आणि आतां शेवटचा उपाय म्हणून आडमिरल साहेब सारीं जहाजें आणून तोफांचा भडिमार करून तट उडवून देण्याच्या विचारांत आहे. पुनः दुसऱ्या दिवशीं दुसऱ्या कैद्यांकडून असें समजलें कीं, २१ गलबतांनीं सरवत्ती सुरु केली होती परंतु तोफांचे गोळेच कमी पडले. त्याच्या दुसऱ्या दिवशीं गोळ्यांचा वर्षाव मोठाच झाला, परंतु त्यापासून कांहीं नुकसान झालें नाहीं, तेव्हां त्या दिवाणानें आपल्या धन्याची प्रशंसा करून असें लिहिलें आहे. " इंग्रजांचें शौर्य कोठें गेलें ? अतुल प्रतापी **ड्युप्ली**च्या तेजापुढें त्याचें काय झालें ? तें अंधकाराप्रमाणें लय पावलें. " **ड्युप्लीनें** नवे मोर्चे उभारून तारीख ९ आणि तारीख ११ रोजीं इंग्रजी आरमारावर तोफा लागू केल्या तेव्हां त्यांचें किती नुकसान झालें तें त्यानें लिहिलें आहे. तारीख १३ रोजचा लेख असा आहे कीं, शत्रूकडील कांहीं लोक पळून आले त्यांनीं अशी बातमी सांगितली कीं, वेढा उठवण्याचें बहुतेक ठरल्यासारखें आहे. त्याचें मुख्य कारण एवढेंच कीं, पर्जन्यकाळ ( Monsoon ) अगदीं जवळ येऊन ठेपला. तारीख १६ च्या रोजनाम्यांत असें लिहिलेलें आहे कीं, फ्रेंचांची सर्व आशा परिपूर्ण झाली. शत्रूचें सैन्य माघारें फिरलें त्याचा पाठलाग करण्यास घोडेस्वार व पायदळ अशी गोरी व काळी मिळून मोठी फौज रवाना झाली. तारीख १७ रोजीं आपल्याला जय आला म्हणून उत्सव करून ईश्वराचे आभार मानण्याचा समारंभ झाला. तारीख १८ रोजीं एकत्र झालेलीं शत्रूचीं दोनही आरमारें निघून गेलीं.

**पाँदीशरीं**चा वेढा उठल्यावर उभय पक्षांकडील स्थिति कशी काय झाली म्हणून पाहूं गेलें तर इंग्रजांनीं वेढा घालण्याचें मनांत आणलें त्यापूर्वीं उभयतांची जी स्थिति होती तीच बहुतेक अंशीं वेढा उठल्यानंतर होती. फ्रेंचांच्या ताब्यांत **पाँदीशरी** आणि **मद्रास** हीं दोन ठाणीं होतीं; इंग्रजांकडे फक्त **फोर्ट सेंट डेव्हिड** आणि त्याच्याजवळचें **गुडलूरशहर** हीं होतीं. **सेंट डेव्हिड** किल्ल्यांत इंग्रजांचें पहिलें सैन्य होतें त्यांत आणखी थोडीशी भर पडून तें वाढलें

होतें तर पुढच्या म्हणजे सन १७४० वर्षाच्या अवैलीसच **ड्युप्लीच्या** कुमकेला २०० दोनशें शिपाई येऊन पोहोंचले, त्या योगानें पहिल्यानें त्याचें मनुष्यबळ जास्त होतें तसें आतां पुनः झालें. मग तो **फोर्ट सेंट डेव्हिड** घेण्याचा आणखी एकवार यत्न करून पहाण्याचें मनांत आणून त्याप्रमाणें बेत करूं लागला. इतक्यांत तिकडे युरोपांत **एलिशापेल** येथें तह ठरून त्याप्रमाणें तहनाम्यावर सही झाल्याची बातमी येऊन पोहोंचली. त्या तहनाम्यांत एक कलम असें होतें कीं, लढाई सुरू झाल्यापासून एकमेकांनीं एकमेकांचा जो मुलुख घेतला असेल तो परस्परांस परत द्यावा. हें कलम **ड्युप्लीला** फारच झोंबलें. कारण त्यामुळें त्याला आतां आपल्या शत्रूंना **मद्रास** ठाणें परत देणें भाग पडलें. जी **मद्रास** घेण्याला त्याला एवढें साहस करावें लागलें, एवढे श्रम पडले, तिचा खरा मालक जो **अर्काटचा** नबाब आपला जिवलग मित्र, त्याच्याशीं असलेला स्नेह सोडून वैर संपादावें लागलें, जी हातीं आल्यापासून त्यानें पुष्कळ सुधारली होती आणि मजबूद केली होती, ती **मद्रास** मुकाट्यांनीं शत्रूंना परत द्यावी लागल्यानें त्याला किती वाईट वाटलें असेल! असो. लढाईला सुरुवात होऊन पांच वर्षें लोटलीं, इतके श्रम, साहस करून नफा काय झाला म्हणून पाहूं जातां त्याला असें दिसून आलें कीं, अखेर आपण आपल्या मूळपदावरच आहों; नवीन मुलुख कांहीं वीतभर मिळाला नाहीं. परंतु दुसऱ्या बाजूनें नफा मोठा झाला. त्याची आणि त्याच्या देशबांधवांची कीर्ति मोठी झाली, नांवलौकिक आणि वजन हीं फार वाढलीं; आणि त्या मानानें तीं इंग्रजांचीं कमी झालीं. कारण त्यांची **मद्रास** त्यांना संभाळतां आली नाहीं, हातची गेली आणि **पाँदीशरी** घ्यावी म्हणून मोठ्या डौलानें तिला वेढा घालून बसले होते परंतु तेथें कांहीं कटाव चालला नाहीं, मुकाट्यांनीं खालीं मान घालून माघारें जावें लागलें. त्या वेळीं त्या मुलखांतल्या राजेरजवाड्यांत आणि लोकांत इंग्रजांपेक्षां फ्रेंचांची मानमान्यता फारच अधिक झाली होती यांत कांहीं शंका नाहीं. **मद्रास** परत दिल्यावर देखील **ड्युप्लीला** असें स्पष्ट दिसूं लागलें कीं, **एलिशापेलचा** तह झाला म्हणून कांहीं हरकत नाहीं, पुनः युद्धप्रसंग येणार, आणि त्यावेळीं आपल्याला आतां झालेला हा नांवलौकिक फार उपयोगीं पडेल. त्याच्या चाणाक्षपणानें त्याची अशी पक्की खात्री झाली होती कीं, इंग्लंड आणि फ्रान्स ह्या दोन युरोपियन राष्ट्रांमध्यें जो

वैराग्नि उत्पन्न झाला आहे तो तीं **कारोमांडेल** किनाऱ्यावर एकमेकांसमोर असल्यानें त्यांची नजरानजर झाली म्हणजे पुनः प्रज्वलित झाल्याशिवाय कधीं रहाणार नाहीं; युरोपांत उभयतांमध्यें किती जरी तहनामे झाले तरी ते कागदांतले कागदांत रहातील आणि येथें दोघेही हातघाईवर येऊन चकमक झडेलच झडेल.



# भाग ६ वा.

## दुप्लीच्या भाग्याचा कळस.

**एलिशापेल**च्या तहांत ठरल्याप्रमाणें फ्रान्स आणि इंग्लंड ह्या उभय राष्ट्रांचे दक्षिण हिंदुस्थानांत जे प्रतिनिधि होते त्यांना एकमेकांचे घेतलेले मुलुख परत देऊन लढाईला सुरवात होण्यापूर्वीं असलेल्या स्थितीस म्हणजे आपल्या पूर्व पदास यावें लागलें आणि वैरभाव सोडून प्रेमानें वागूं अशीं परस्परांस वचनें द्यावीं लागलीं. तेव्हां **सें तॉमे**च्या लढाईंत **पराडिस**ला जय मिळाल्यानें जी क्रांति झाली तिचा परिणाम कसा झाला तें चांगलें स्पष्ट दिसूं लागलें. त्या लढाईपूर्वीं फ्रेंच काय आणि इंग्रज काय, दोघेही सारखेच, नुसते व्यापारी आहेत असेंच सारे लोक समजत असत. परंतु त्या लढाईनें तो समज पार घालवून दिला आणि ते शस्त्रधारी, मोठ्या योग्यतेचे योद्धे आहेत असें त्यांच्या प्रत्ययास आणून दिलें. मग त्यांना असें वाटूं लागलें कीं, इकडच्या राजेरजवाड्यांत कोठें गादीविषयीं कलह उत्पन्न झाला, दोन असामी आपण खरे हक्कदार म्हणून वारसा सांगूं लागून अखेर निकरावर येऊन आपला पक्ष शस्त्र धरून सिद्ध करण्यास उठले, तर उभयतांतून ज्या कोणास ह्या परद्वीपस्थ योद्ध्यांचें साहाय्य संपादन करतां येईल त्याचा कार्यभाग अगदीं निःसंशय उरकेल. त्यांतही फ्रेंचांच्या साहाय्याची योग्यता विशेष वाटत होती. कारण त्यांनीं इंग्रजांच्या हातांतून **मद्रास** हिसकाऊन घेतल्यानें आणि **पाँदीशरी**वर ते चढाई करून गेले होते तेव्हां त्यांना त्यांनीं हांकून लावल्यानें त्यांची कीर्ति फारच झाली होती. जोंपर्यंत त्यांच्या त्यांच्यांत कलह माजून ते एकमेकांशीं उघडउघड लढत होते तोंपर्यंत राजेरजवाड्यांनीं वर सांगितल्याप्रमाणें त्यांपैकीं कोणाच्या थोर पराक्रमाचा उपयोग करून घेण्याचें मनांत आणलें असतें तरी तें सिद्धीस जाणें अशक्य होतें. परंतु **एलिशापेल**च्या तहानें त्या उभयतांस एकमेकांवर उचललेलीं शस्त्रें खालीं ठेवावीं लागलीं आणि हिंदुस्थानांत नांवाला तरी शांततेनें रहाणें भाग पडलें त्याबरोबर कित्येक राजेरजवाड्यांच्या मनांत उद्भवलेली इच्छा प्रबळ

झाली आणि तिला अंकुर फुटून त्या फ्रेंच व इंग्लिश ठाण्यांतल्या मुख्यांची मनोधारणा करून त्यांना आपल्या पक्षास कसें मिळवून घेतां येईल ह्या विचाराला ते लागले. त्यांनीं मनांत धरलेला हेतु सिद्धीस जाण्याला एक गोष्ट आयतीच फार अनुकूल होती. ती अशी--इंग्रजांची आणि फ्रेंचांची लढाई सुरू झाली तेव्हां त्यांच्या दक्षिणहिंदुस्थानांतल्या ठाण्यांत सैन्याची वाढ होत चालली होती. होतां होतां ती वरीच झाली आणि युरोपांत तह होऊन इकडे लढाई ऐन रंगांत आलेली अकस्मात् बंद पडली तेव्हां तें सैन्य रिकामें झालें. त्यांत गोरे लोक पुष्कळ होते, शांततेच्या काळांत नित्याच्या बंदोबस्ताला चौकीपहाऱ्याला इतक्या लोकांची कांहीं जरूर नव्हती. तेव्हां त्यांना कोठेंतरी कांहींतरी नफ्याची कामागिरी मिळाली तर बरें, नाहींतर त्यांना रिकामें पोसावें लागल्यानें **पाँदीशरी**चा आणि **मद्रास**चा हे दोघेही गव्हरनर,--त्यांत ही मुख्यत्वें **पाँदीशरी**चा--खर्चाखालीं बेजार होऊन जाऊन टेंकीस आले असते. म्हणून कोणी एकाद्या मोठ्या थोर राजानें **डुप्ली**ला जर असें म्हटलें कीं, तुमचें हें फाजील असलेलें सैन्य आतां रिकामें बसून राहिलें आहे, यांतलें थोडेंसें आमच्या मदतीला द्या, त्याबदला पैसा, किंवा कांहीं मुलुख, किंवा दोन्ही, जें मागाल तें आम्ही देतों; तर तो तें बोलणें आनंदानें मान्य करील असा संभव होता. आमच्या वाचकांच्या हें लक्षांत आलेंच असेल कीं, **टॉमे**च्या युद्धप्रसंगानें आसपासच्या राजेरजवाड्यांचा जो कांहीं समज झाला असेल त्यापेक्षां **डुप्ली**च्या मनाचा ग्रह फार निराळा झाला असावा. त्याची सूक्ष्म, तीव्र दृष्टि फार दूर गेली होती. तिनें जी भरारी मारली ती विंध्याचलाच्याही पलीकडे गेली. एवढ्या अफाट प्रदेशावर आपण आपलें श्रेष्ठत्व गाजवूं असे त्याचे कल्पनातरंग होऊं लागले होते. त्यानें आपल्या मनांतल्या मनांत असें ठरवून टाकलें होतें कीं, राजेरजवाड्यांना आपल्या तंत्रानें वागावयाला लावून आधीं त्यांच्यावर आपली छाप पुरी बसवावयाची; आणि मग विंध्याद्रीच्या ह्या बाजूला आपण सर्वसत्ताधीश होऊन बसावयाचें. त्याला असें पक्कें वाटत होतें कीं, आज ना उद्यां, केव्हां ना केव्हां तरी हे राजेलोक आपली विनवणी करून साहाय्य मागूं लागतील. मोठमोठ्या वजनदार सरदारांशीं त्याचें आधींच चांगलें सख्य जमलेलें होतें; आणि त्यांना वाहवा वाहवा म्हणून फुगवून, त्यांच्या

अंगांत वारें भरून देऊन आपला हेतु कसा साधावा हें त्याचे प्रतिस्पर्धी जे इंग्रज त्यांपेक्षां त्याला अधिक चांगलें कळत होतें. शिवाय इंग्रजांना जितकी गोरी फौज जमवतां आली असती तीपेक्षां त्याच्याजवळ ती अधिक होती. युरोपियन तऱ्हेची कवाईत शिकवून तयार केलेले काळे शिपाई त्याच्याजवळ बरेच होते; आणि थोडेच परंतु निवडक निवडक अशा मराठी घोडेस्वारांची एक लहानशी तुकडी त्यानें आपल्या नोकरीस ठेविलेली होती. याप्रमाणें त्याची सैन्याची तयारी असून राजेरजवाडे त्याचा उपयोग करून घेण्याला जसे उत्सुक झालेले होते तसा तोही तें त्यांनीं मागितल्याबरोबर देण्याला अगदीं सिद्ध होता.

**फ्रेंचां**प्रमाणें **इंग्लि**शांचीही तयारी होती. ती म्हणजे कमी होती असें नाहीं; परंतु त्याचें कारण मात्र अगदीं निराळें होतें. दक्षिणहिंदुस्थानांत आपलें वजन सर्वांपेक्षां अधिक असावें किंवा आपला अधिकार सर्वांवर चालावा असल्या कांहीं कल्पना त्यांच्या मनांत घोळत नव्हत्या. परंतु ते पडले व्यापारी; त्यांची नजर सद्यःफलावर. त्यांच्याजवळही जरूरीपेक्षां जास्त सैन्य होतें. समुद्रकिनाऱ्यावर पुष्कळ स्थळें अशीं होतीं कीं तीं हातीं लागलीं असतां त्यांना आपला व्यापार वाढवण्याची मोठी सोय होणार होती. म्हणून फ्रेंचांप्रमाणें तेही आपली फौज कांहीं मोबदला मिळाला असतां घेऊन कामाला देण्याला आतुर होते. याप्रमाणें दोघेही आपआपले लोक मजुरीला लावण्याला सिद्ध असून त्यांना आमच्याकडे मजुरीनें द्या असें म्हणायाला कोणी आपल्याकडे येतो का म्हणून वाट पहात बसले होते. हें झालें, परंतु आतां आमच्या वाचकांनीं एवढें ध्यानांत ठेवावें कीं फ्रेंचांचा मुख्य उद्देश आपलें वजन वाढावें आणि राजकीय सत्ता, अधिकार, हीं आपल्या हातांत यावीं हा होता; इंग्रजांचा हेतु आपला व्यापार फैलावावा, उदीमधंदा वाढावा, एवढाच होता.

याप्रमाणें हीं एकमेकांशीं स्पर्धा करणारीं दोन युरोपियन राष्ट्रें आपल्या फौजा दुसऱ्याला मजुरीनें द्यावयाला अगदीं तयार होतीं तसें त्यांना आमच्याकडे द्या म्हणून मागायाला ही पुष्कळ असामी उभे राहतील असा संभव दिसत होता. त्यावेळीं दक्षिणहिंदुस्थानची स्थिति तशीच चमत्कारिक झालेली होती. कोणा एका राजाला फ्रेंच आणि इंग्रज हे दोघेही आपले लोक देणार नाहींत हें उघड

होतें. तेव्हां एकाकडे एक झाला तर दुसऱ्याकडे दुसरा जावयाचा असें सहजच होणार होतें. म्हणून त्यांनीं आपलीं सैन्यें कोणातरी राजांना मदतीला देण्याचें कबूल करण्याचा कायतो अवकाश होता. तेवढें झालें कीं, **एलिशापेल**च्या तहनाम्यावर सही न झाल्यासारखेंच होऊन तो खर्डा ठरून तोंडानें जरी कोणी तसें म्हटलें नाहीं तरी फ्रेंच आणि इंग्रज हे दोघेही एकमेकांवर शस्त्र उपसून प्रत्यक्ष शत्रु बनूनच रणांगणीं उभे राहिल्याचें त्यांना रूप येणार होतें.

सन १७४८ च्या जून महिन्यांत फ्रेंच आणि इंग्रज लोक **पाँदीशरी**च्या आणि **फोर्ट सेंट डेव्हिड**च्या जवळ एकमेकांशीं लढण्यांत गुंतले होते तेव्हां तिकडे **हैदराबादे**स दक्षिणेचा सुभेदार **निजामउल्मुलुक्** मेला. त्याचा कुटुंबविस्तार मोठा * होता; पुत्र, पौत्र, पुष्कळ होते परंतु त्या सर्वांना बाजूस ठेवून आपल्या कन्येचा पुत्र **मुजफरजंग** यानें आपल्या पश्चात् गादीवर बसावें असें त्यानें ठरविलें होतें. म्हणून त्याचाच हक्क आहे आणि तोच मालक होईल असें सर्वांना वाटत होतें. **निजामउल्मुलुका**चा थोरला मुलगा दिल्लीस बादशहाच्या दरबारांत मोठ्या हुद्यावर होता. त्याच्या पाठचा **नादिरजंग** हा बदफैली असल्यानें बापानें त्याचा वारसा बुडवला होता. त्याच्यापेक्षां लहान आणखी तीन चार भाऊ होते, ते जनानखान्यांत पडून होते. **मुजफरजंगा**ला आजानें दिलेला हक्क आणि वारसा दिल्लीदरबारांत मान्य होऊन त्यानें गादीवर बसावें असा बादशहानें फरमान दिला होता.

परंतु **निजामउल्मुलुका**चें देहावसान झालें त्या समयीं **मुजफरजंग** सन्निध नव्हता. तो दूर विजापुरास होता. हक्क बुडालेला **नादिरजंग** जागेवर, जवळ होता. त्यानें बापाची इच्छा, मृत्युपत्र, बादशहाचा फरमान, वगैरे सारें गुंडाळून ठेवून आधीं जामदारखाना बळकावला आणि मी दक्षिणेचा सुभेदार अशी द्वाही फिरविली. **मुजफरजंगाला** आजोबानें आपल्या पश्चात् दक्षिणेचा सुभेदार होण्याचें ठरवून टाकलें होतें परंतु त्याच्या अंतकाळीं तो जवळ नसल्यानें तसें कांहीं घडलें नाहीं. तेव्हां तो विजापुराहून निघून सुभेदारी मिळवण्याचा प्रयत्न करण्याकरितां मराठ्यांचें साहाय्य संपादावें म्हणून **साताऱ्यास** गेला. तेथें त्याची आणि **चंदासाहेबाची** गांठ पडली. कर्नाटकचा नबाब **दोस्तअली**

* त्याच्या पुत्रांचीं नांवें, पुढच्या पत्रावर दिलीं आहेत.

# निजामाची वंशावळ.

खाजा आबिद कलिजखान अजमीरचा सुभेदार

|

मीर शहाबुदीन ऊर्फ गाजीउद्दीनखान, गुजराथचा सुभेदार

|

मीर कमरुद्दीन. चिनकिलीजखान. निजामउल्मुक्. पहिला निजाम सन १७१३–४८

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
|---|---|---|---|---|---|---|
| मीर गाजीउद्दीन बावनीच्या नवाबांचा मूळ पुरुष | मीर महंमदनासिरजंग.* दुसरा निजाम सन १७४८–५० | कन्या — हिदायत मोहउद्दीन मुजफरजंग. तिसरा निजाम. १७५०–५१ | मीर असफउद्दौला सलावतजंग. चौथा निजाम १७५१–६१ | मीर सुजा उल्मुक् बसालतजंग | मीर निजामअली खान. पांचवा निजाम. १७६१–१८०३ | मीरनाशीर-उल्मुल्क मोगल अलीखान मीर मोगल. |

* किंवा नादिरजंग

मीर निजामअली खान (६) यांचे पुत्र:

| | | |
|---|---|---|
| मीर अहमदखान अलीजहा. | मीर अकबर अलीखान शिकंदजहा. सहावा निजाम १८०३–२८ | मीर सुभान अली-खान फरीदून जहा आणि दुसरे पांच पुत्र |

# अर्काटचे नबाब.

महंमद सैद ऊर्फ सादत उल्लाखान. १७१०—३२

पुतण्या. दोस्तअल्लीखान. १७३२—४०

सफदर अल्लीखान १७४०—४२
याचा खून झाला

महंमद सैदखान. १७४२—४३

कन्या
हुसेन दोस्तखान ऊर्फ
चंदासाहेब याची स्त्री.

अन्वर–उद्–दीन १७४३—४९

माफुजखान

वालाजहा महंमद अल्ली
१७४९—१७९५

उमदत–उल–उमरा
१७९५—१८०१

म्हणून होता त्याचा हा जांवई. सुमारें आठ वर्षांपूर्वी मराठ्यांनीं त्याला कैद करून आणून येथें ठेविलें होतें. त्याची सुटका होण्याला बराच पैसा पाहिजे होता, तो मिळेना म्हणून तो अडकून पडला होता. खुद्द त्याची आणि फ्रेंचांची चांगली दोस्ती होती. **ड्युप्लीनें** त्याच्या बायकामुलांना **पाँदीशरींत** आश्रय देऊन त्यांचें संरक्षण केलें होतें. तीं अजूनही तेथेंच रहात होतीं. **मुजफरजंगाचा** आणि **चंदासाहेबाचा** थोड्याच दिवसांत स्नेह जमला. मग **चंदासाहेबानें** **मुजफरजंगाला** मराठ्यांचा नाद सोडून फ्रेंचांची कांस धरण्याचा उपदेश केला. तो ठसून त्यानें **ड्युप्ली**कडे सूत्र लावलें. त्यानें त्याला असें कळविलें कीं दाक्षिणच्या सहा सुभ्यांच्या मसनदीचा खरा कायदेशीर वारस मी आणि कर्नाटकच्या नवाबपदाचा अधिकारी **चंदासाहेब** हे दोघेही सध्या **साताऱ्यास** आहों. आम्ही तूर्त आपल्या थोर पदाला अंतरल्यासारखे झालों आहों, परंतु या प्रसंगीं तुम्ही आम्हांवर कृपा करून मोठें साहाय्य कराल तर आमचे पाय थाऱ्याला लागतील अशी आमची खात्री आहे. याप्रमाणें त्याची **ड्युप्ली**कडे विनवणी गेली तेव्हां ती लागलीच मान्य करून त्यांना संतोष वाटेल असें उत्तर त्याच्यानें देववलें नाहीं. कारण त्या वेळीं इंग्रजांशीं युद्ध चालू असल्यानें त्याला त्यापुढें दुसरें कांहीं सुचत नव्हतें. परंतु **एलीशापेलचा** तह होऊन त्यांतील कलमांची इकडे हिंदुस्थानांत अम्मलबजावणी झाली तसा तो मोकळा झाला. मग त्यानें लागलेंच हें प्रकरण हातांत घेऊन त्याचा नीट विचार करण्यास सुरवात केली. त्याला तेव्हांच असें दिसून आलें कीं, आपल्यापुढें दीनपणें मुख पसरणाऱ्या ह्या उभयतां नवाबांच्या विनंतीला मान देऊन जर त्यांना आश्वासन दिलें तर आपले जे जे मनोरथ असतील ते सिद्धीस जातील. जर आपल्या साहाय्यानें **मुजफरजंग** दक्षिणेचा सुभेदार झाला आणि **चंदासाहेब** कर्नाटकचा नवाब झाला तर मग आपल्याला दुसरें काय पाहिजे ? दक्षिण हिंदुस्थानांतले जे दोन बलाढ्य राजे—कारण या वेळीं **म्हैसुरांत हैदरअली** प्रबळ झालेला नव्हता. त्याच्या बुद्धिबलानें म्हैसूरचें नांव गाजलें तें पुढें—ते सवाद्यांतर, कृतीनें आणि मनानें, फ्रेंच असल्यासारखे होतील; **पाँदीशरीहून** जसें सूत्र हालेल तसें त्यांचें चलनवलन, हुकमांत असल्यासारखें होईल. सारांश **साताऱ्याहून** त्याला जीं विनंतीपत्रें आलीं तीं त्याच्या मनांत जे एक एक अवाढव्य बेत चालले होते ते सफळ

होण्याचीं सुचिन्हें, आपल्या मनोरथप्रासादावर चढून जाण्याची पहिली पायरी आहेत, असें त्याला घाटलें.

झालें, आतां पुढें काय करावयाचें हा **ड्युप्ली**च्या मनाचा निश्चय ठरला. मग इंग्रजांबरोबरची लढाई बंद होऊन त्या काळजींतून मुक्त होतांच त्यानें चंदासाहेबाची सुटका होण्याकरितां मराठ्यांना सात लक्ष रुपये भरण्याची हमी घेतली आणि **मुजफरजंग** व **चंदासाहेब** या उभयतांसही असें कळविलें कीं, आपले मनोरथ पूर्ण होण्याला जे जे उपाय करावेसे वाटतील ते सिद्धीस पावविण्याला **पाँदीशरीं**तून माझ्या हातून जेवढें साहाय्य करवेल तेवढें अगदीं मनःपूर्वक करीन. हें माझें वचन पक्कें समजावें; कांहीं काळजी करूं नये. **चंदासाहेब** अटकेंतून मुक्त झाला आणि साताऱ्याहून निघाला तो ३००० सैन्य जमवून कूच करून कर्नाटकांत दाखल झाला. **ड्युप्ली**ची आणि त्याची भेट होऊन बोलणें चालणें झालें त्यांत असें ठरलें कीं **ड्युप्ली**नें त्याच्या मदतीला युरोपियन तऱ्हेनें कवाईत शिकविलेले २००० शिपाई आणि ४०० फ्रेंच लोक द्यावे. मग तेथून पुढें तो आपल्या सरहद्दीवर जाऊन पोहोंचतो तों खुद्द त्याच्या फौजेंत ६००० पर्यंत भरती झाली. तेथें **मुजफरजंगा**ची आणि त्याची भेट झाली. तो आपल्याबरोबर ३०००० फौज घेऊन आला होता. उभयतां मिळून निघाले ते जात जात उत्तर अर्काट प्रांतांत **दमालचेरी**च्या घांटापर्यंत गेले. **ड्युप्ली**नें करार केल्याप्रमाणें सैन्य सिद्ध करून तें दोघां हुशार सरदारांबरोबर देऊन रवाना केलें. त्यांतला एक **ब्यूसी** हा पुढें फार प्रख्यातीस आला. दुसरा **दोतय**, **पाँदीशरी**ला वेढा पडला होता तेव्हां तिच्या संरक्षणार्थ लढतांना यानें चांगला पराक्रम करून दाखविला होता. त्यांनीं जात जात जुलै महिन्याच्या अखेरीस, आपल्यापुढें गेलेल्या त्या उभयतां नबाबांस **दमालचेरी** येथें गांठलें. तेथें त्यांना असें वर्तमान समजलें कीं कर्नाटकचा खरा नवाब **अन्वारुद्दीन**—माझी **मद्रास** माझ्या हवालीं करा, तुमचा तिच्यावर कांहीं हक्क नाहीं, असें जो फ्रेंचांना म्हणत होता तो—हा त्याच प्रांतांत **अंबूर** येथें आपले उभयतां पुत्र आणि २०००० चांगले कसलेले शिपाई आणि ६० युरोपियन शिलेदार मदतीला घेऊन आपण पुढें येण्याची वाट पहात बसला आहे. मग ते लागलेच पुढें चालून गेले. तारीख ३ आगस्ट रोजीं **अंबूर** येथें उभय सैन्यांची गांठ

पडून तुमुल युद्ध झालें. त्यांत त्यांना मोठा जय आला. अगदीं निकरानें लढाई होत असतांना ऐन गर्दींत **अन्वार-उद्दीन** ठार झाला; त्याचा थोरला मुलगा **माफुजखान** कैद झाला आणि धाकटा **महंमदअल्ली** प्राण घेऊन धूम पळत सुटला तो **त्रिचनापल्लीं**त शिरला. पुढें इंग्लिशांनीं ज्याचा पक्ष उचलला, रण माजविलें आणि नांव गाजविलें तो हाच **महंमदअल्ली**.

याप्रमाणें युद्धाचा शेवट निःसंशय झाल्यानें **चंदासाहेब** आणि **मुजफर-जंग** यांचा हेतु सिद्धीस गेला. **ड्युप्ली**च्या साहाय्यानें सारें कर्नाटक त्यांच्या हातीं आलें; एक **त्रिचनापल्ली** काय ती राहिली. परंतु त्याशिवाय अजून **नादिरजंगा**चा समाचार घ्यावयाचा होता. तो पुष्कळ मोठी फौज घेऊन सम-रांगणीं उभा होता. तेव्हां आतां आधीं एकदम त्याच्यावर चालून जावें कीं **त्रिचनापल्ली**वर जाऊन महंमदअल्लीला धरून कैद करावें, तें न साधल्यास निदान तेथून हांकून तरी द्यावें, हा त्या उभयतां विजयशाली नवाबांना विचार पडला. अखेर त्यांनीं **त्रिचनापल्ली**वर स्वारी करण्याचेंच निश्चयांत आणलें. परंतु कोणतें-ही कार्य करण्याचें तोंडानें ठरणें आणि त्याप्रमाणें हातानें घडणें यांत महदंतर असतें; त्याप्रमाणें या प्रसंगीं झालें. बोलल्याप्रमाणें लागलेंच उठून समूर **त्रिच-नापल्ली**वर चालून जावें तें सोडून देऊन **चंदासाहेब** नूतन संपादलेल्या नवाब-पदाचें ऐश्वर्य खरोखर हातीं आलें कीं नाहीं याची खात्री करून घेत सुखोप-भोगांत निमग्न झाला. असा बराच काळ घालवल्यावर मग तो **मुजफरजंगा-**सहवर्तमान **ड्युप्ली**ला समारंभानें भेटावें म्हणून **पाँदीशरी**स गेला. **ड्युप्लीनें** फार मोठा थाट करून त्यांचें उत्तम स्वागत केलें आणि त्यांच्या चित्ताचें आक-र्षण करण्याचें आधींच अर्धे अधिक झालेलें काम या योगानें पुरें करून सोडलें. **चंदासाहेबा**नें मोठ्या कृतज्ञतेनें, आपले मजवर अगणित उपकार झाले, यांची फेड माझ्या हातून होणें कठीण आहे असें म्हणून, **ड्युप्ली**ला फ्रेंचांच्या मुलखालगतच्या ८१ गांवांची सर्व हक्कांसह मालकी ( sovereignty ) दिली, आणि पुढें याहूनही मोठें आणखी बक्षीस देईन असें वचन दिलें. **मुज-फरजंगा**ची देणगी अशाच प्रकारची व्हावयाची, परंतु या प्रसंगीं त्याचा हात चालता नव्हता; कारण तिकडे **नादिरजंग** सगळें बळकावून बसला होता म्हणून त्याचा नाइलाज होता. परंतु त्यानें वचनें देण्यांत कांहीं कमी केलें नाहीं.

त्यानें **पाँदीशरी**स आठ दिवस राहून आपल्या मदतीस फ्रेंच फौज देण्याचें **ड्युप्ली**कडून कबूल करून घेतलें. मग त्याबद्दल करारमदार झाल्यावर तो आपल्या सैन्यांत जाऊन मिळण्यास निघून गेला. **पाँदीशरी**ला वेढा पडला असतांना ड्युप्लीनें **चंदासाहेबा**च्या मुलामाणसांचें संरक्षण तेथें केलें होतें. त्यांना भेटून चार दिवस आनंदांत घालवावे म्हणून **चंदासाहेब** राहिला. परंतु हें बाह्यात्कारी दाखविण्याला होतें. त्याचा मुख्य उद्देश पुढें काय करावें हें **ड्युप्ली**च्या विचारें ठरवावें असा होता.

ती वेळ खरोखर **चंदासाहेबा**च्या नशीबाच्या परीक्षेची होती. **त्रिचना-पल्ली**चा प्रसिद्ध किल्ला ज्याची राजधानी होती तो प्रांत दक्षिण अर्काट प्रांताला लागून असून त्या वेळीं कर्नाटकच्या नबाबाच्या मुलखांतला एक भाग होता. **अंबूर**च्या लढाईनें बाकीचा सारा मुलुख त्याच्या अमलांत आला. तो जेवढें आपलें राज्य म्हणत होता तेवढ्यापैकीं एक **त्रिचनापल्लीच** काय ती जिंकून घेण्याची राहिली. त्या किल्ल्याची त्याला अगदीं पुरी माहिती होती. मराठ्यांनीं त्यावर हल्ला केला तेव्हां त्यानें तो लढवला होता, परंतु अखेर तो त्यांच्या स्वाधीन करून त्याला स्वतःही त्यांच्या स्वाधीन व्हावें लागलें आणि सात वर्षें त्यांच्या अटकेंत काढावीं लागलीं. अगदीं विलंब न लावतां आधीं त्या किल्ल्यावर चालून जा असें **ड्युप्ली**नें त्याला फार आग्रहानें सांगितलें. तो आणखी असें देखील म्हणाला कीं, **त्रिचनापल्ली** हातीं आल्याशिवाय आतां मिळालेला मुलुख किंवा नबाबपद सुखानें उपभोगतां येणार नाहीं हें पक्कें समज. सर्वांवरची दुसरी गोष्ट त्यानें अशी सांगितली कीं तिकडे **नादिरजंग** रणांगणीं उभा आहे; त्याच्याशीं गांठ घालण्याला तुम्हाला जाणें आहे; तें काम फार मोठें आहे. त्याला हात घालण्यापूर्वीं इकडे कर्नाटक अगदीं निष्कंटक करून ठेविलें पाहिजे; यांत मागें कांहीं शिलशिला रहातां उपयोगी नाहीं. याप्रमाणें **ड्युप्ली**नें त्याला कालावधि न करण्याविषयीं आपल्याकडून सांगावयाचें कांहीं शिल्लक ठेविलें नाहीं; खरोखर अगदीं शिकस्त करून सोडली, परंतु व्यर्थ. कसें करूं, काय करूं, ह्या जपांतच पुष्कळ काळ गेला. **चंदासाहेबाचें** मन द्विधा होत होतें. एका-पक्षीं पाहिलें तर कांहीं गोष्टी अशा होत्या कीं, त्यांत पुष्कळ संकटें येण्याचा संभव मोठा होता; दुसऱ्या बाजूनें पाहिलें तर कांहीं झालें तरी हें करावें असें

वाटण्यासारखीच स्थिति होती. अशी संकटावस्था तरी कशी काय प्राप्त झाली होती तें वाचकांच्या लक्षांत येण्याकरितां येथेंच विराम करूं आणि एतावत्काल-पर्यंत तिकडे इंग्रजांकडे काय चाललें होतें तें पाहूं.

**एलिशापेल**चा तह अमलांत येण्याबरोबर जशी फ्रेंचांची फौज रिकामी झाली तशी त्यांचे प्रतिस्पर्धी जे इंग्रज त्यांची ही झाली, आणि ती त्यांच्या फौजे-पेक्षां फारशी कमी नव्हती असें मागें सांगण्यांत आलेंच आहे. जसा इकडे हैद-राबादच्या आणि कर्नाटकच्या गाद्यांबद्दल तंटा उपस्थित झाला होता तसा तिकडे तंजावरच्या गादीबद्दल झाला होता. ती गादी आपली आहे, आपल्याला मिळावी असें म्हणणारा तेथच्या राजघराण्यांतला जो पुरुष होता तो इंग्रजांचें साहाय्य मिळवावें म्हणून त्यांच्याकडे गेला आणि मला तंजावरच्या गादीवर बसवा म्हणजे तुम्हांला **देवीकोट** शहर बक्षीस देतों; शिवाय लढाईला जो खर्च लागेल तो ही सारा देतों असें म्हणाला. **देवीकोट मद्रास**च्या दक्षिणेस १२० मैलांवर समुद्रकिनाऱ्यावर मोठ्या सोईच्या जागीं, कावेरी नदीला उत्तरेकडून येऊन मिळ-णारी जी **कोलरून** तिच्या तीरावर वसलेलें आहे. असलें उत्तम स्थळ मिळ-ण्याचा सुयोग आलेला पाहून इंग्रजांच्या तोंडाला पाणी सुटलें आणि त्यांनीं त्याला गादी मिळवून देण्याचें तत्काळ कबूल केलें. त्या कामावर लागलीच **क्याप्टन कोप** याची योजना होऊन सन १७४९ च्या एप्रिल महिन्यांत त्याच्याबरोबर ४३० गोरे इंग्रज सोल्जर व १००० शिपाई देऊन त्याची रवानगी झाली. त्याला जातांना वाटेंत भयंकर वादळानें गांठल्यामुळें बराच वेळ लागला. परंतु अखेर जाऊन **कोलरून**च्या उत्तर तीराला पोहोंचला आणि पहातो तर तंजावरच्या गादीवर असलेल्या राजाचें सैन्य समरांगणीं उभें आहे. परंतु त्याला असें दिसून आलें कीं त्या सैन्याचा उद्देश आपला मार्ग अडवून धरण्याचा नसून उलट आप-ल्याला नादीं लावून घुलवीत घुलवीत नदीपलीकडे अडचणीच्या जाग्यांत नेऊन पाडण्याचा आहे. त्याचा हेतु कांहीं त्यांची इच्छा पुरवण्याचा नव्हता. त्याला हुकूम **देवीकोटा** ताब्यांत घेण्याचा होता. म्हणून त्यानें तिकडे चाल केली. **आडमिरल बोस्कावेन** अद्याप त्या वाऱ्यावर असल्यानें आपल्याला त्याची मदत मिळेल ह्या आशेवर तो होता. परंतु ज्या वादळानें त्याला गांठल्यामुळें खालीं लौकर येतां आलें नाहीं त्याच वादळानें **बोस्कावेन**च्या आरमाराची

दुर्दशा उडवून टाकली होती; म्हणून **कोप देवीकोट्याजवळ**, अगदीं एका मैलाच्या आंत जाऊन पाहूं लागला तर एक देखील गलबत त्याच्या दृष्टीस पडेना; तरी त्यानें जाऊन **देवीकोट्या**वर तोफा सुरू केल्या. पण तो कांहीं हिंमतवान, धाडशी सरदार नसल्यानें तोफांची दाद लागत नाहीं असें दिसतांना तेथून उठून **फोर्ट सेंट डेव्हिड** कडे चालता झाला. परंतु **देवीकोट्या**वर तर इंग्रजांचा जीव गुंतला होता. म्हणून मग त्यांनीं ८०० ब्रिटिश सोल्जर आणि १५०० शिपाई अशी दुसरी नवी फौज तयार करून तिचें आधिपत्य त्या हुशार **स्ट्रिंगर लोरन्सला** देऊन रवाना केली. **लोरन्सला** असा हुकूम होता कीं कांहीं झालें तरी वेहेत्तर, **देवीकोटा** घ्यावाच. त्यानें बरें आहे म्हणून जाऊन एकदम हल्ला केला आणि बाह्यात्कारीं ज्याचा पक्ष धरून, ज्याच्यासाठीं म्हणून इंग्रजांनीं एवढी स्वारी केली, त्याला दूर ढकलून देऊन गादीवर असलेल्या राजाशीं करारमदार करून, त्याच्यापासून तें ठाणें इंग्रजी कंपनीकरितां कायमचें संपादन केलें.

ह्याच सुमारास मद्रासचा गव्हरनर **मिस्टर फ्लॉयर** ह्याला **अंबूरची** लढाई कशी झाली आणि तिचा परिणाम काय झाला तें वर्तमान समजलें; तेव्हां त्याला असें वाटलें कीं, आतां ज्याच्या हातांत सत्ता आहे त्याचें वर्चस्व आपण मान्य केलेंच पाहिजे; न करून चालणार नाहीं. म्हणून त्यानें **चंदासाहेबास** कर्नाटकचा नवाब म्हटलें. परंतु ह्या नूतन नवाब साहेबांची स्वारी **पाँदीशरी**ला निघून गेली आणि तेथें **ड्युप्लीनें** त्याचें स्वागत फार मोठ्या समारंभानें केलें असें जेव्हां समजलें आणि त्याच्या पाठोपाठ थोडक्याच काळांत मी तुम्हाला पदर पसरतों माझा पक्ष स्वीकारून माझें संरक्षण करा, इत्यादि दीनवाणीची **महंमद अल्लीची** विनंती जेव्हां त्याच्याकडे आली, तेव्हां त्याच्या मनाची किंचित्काल चलबिचल उडून आपण **चंदासाहेबाला** नवाब म्हटलें हें बरें झालें नाहीं असें वाटूं लागलें. **आडमिरल बोस्कावेन** याला **पाँदीशरी**चा वेढा उठवून खालीं मान घालून यावें लागलें होतें म्हणून तो दांत ओंठ चावीत होता. त्याला हें वर्तमान समजलें तेव्हां तो खुशालला आणि **फ्लॉयरला** म्हणाला **महंमदअल्लीला** हातीं धरीत असाल तर मी आपलें आरमार घेऊन तुमच्या मदतीला ह्याच वाऱ्यावर रहातों. परंतु त्याला तें काम मोठ्या जोखमाचें दिसलें; कारण **महंमदअल्ली**च्या बाजूस म्हणण्यासारखें कोणी नाहीं हें उघड दिसत होतें. तर

अशा बलहीन मनुष्याचा पक्ष उचलून तो स्थापित करण्याला आपल्या मुलखाचें सारें उत्पन्न भरीस घालीत बसावें यांत कांहीं अर्थ नाहीं असें त्याला वाटलें, म्हणून त्यानें **बोस्कावेनला** सांगितलें कीं, तुमच्या साहाय्याची कांहीं जरूर नाहीं. तो जवाब ऐकून **बोस्कावेन** तो किनारा सोडून आरमार घेऊन दुसरीकडे निघून गेला. ( तारीख १ नोव्हेंबर. )

**बोस्कावेन**चें आरमार जोंपर्यंत त्या किनाऱ्यावर होतें तोंपर्यंत **चंदासाहेबा**ला कांहीं चैन पडत नव्हतें, भयच वाटत होतें. परंतु इंग्रजांचें आरमार निघून गेलें असें वर्तमान कानीं पडतांच त्याची सारी भीति दूर झाली आणि धैर्य आलें. तो लागलाच **पाँदीशरी** सोडून **त्रिचनापल्ली**च्या मार्गाला लागला. त्याच्याबरोबर २०००० फौज असून मदतीला ८०० फ्रेंच लोक ३०० आफ्रिकन आणि तोफखाना होता; शिवाय **मुजफरजंग** त्याच्या-बरोबर निघाला.

**डुप्लीनें** जें पुनः पुनः अगदीं बजावून मनांत ठसेसें आपल्याकडून सांगितलें होतें तें जर **चंदासाहेबानें** ध्यानांत धरलें असतें आणि तेवढीच एक गोष्ट करण्याकडे सारें लक्ष पुरविलें असतें तर हुशार सेनापतीचा जो मोठा मुद्दा असतो तो त्यानें साधला असता, आणि साऱ्या मोहिमेचा निकाल ज्या एका ठिकाणावर लागावयाचा होता तेथें शत्रूनें आपली पराकाष्ठा केली तरी त्याचें कांहीं चालूं नये एवढ्या मोठ्या सैन्याचा मारा केला असता. म्हणजे तो जर **त्रिचनापल्ली**वर एकदम सरळ चालून जाता तर ती त्याच्या हातीं तेव्हांच आल्याशिवाय राहिली नसती; कारण त्या किल्ल्यांत जी तेथलीच शिबंदी होती तिचा त्याच्यापुढें टिकाव लागलाच नसता, हें **डुप्ली**च्या ध्यानांत येऊन चुकलें होतें; आणि त्यानें अगदीं जपून जो बेत योजला होता तो आतां खास पार पडतो असें त्याला वाटत होतें. त्यांत कांहीं संदेह नव्हता म्हणून **चंदासाहेबा**च्या सैन्याचा तळ हालून **त्रिचनापल्ली**कडे मोर्चा फिरला, तेव्हां युद्धाची समाप्तीच झाली असें तो समजला. परंतु तो इकडे याप्रमाणें मनांत मांडे खात असतां तिकडे भलतेंच, त्याच्या कधीं स्वप्नांतही न येई असें झालें, अशी जेव्हां त्याला एकीमागून एक वार्ता येऊन पोहोंचली तेव्हां आपला सारा व्यूह ढांसळला म्हणून त्याला किती वाईट वाटलें असेल, केवढा संताप आला असेल, तो

दुर्दशा उडवून टाकली होती; म्हणून **कोप देवीकोट्याजवळ**, अगदीं एका मैलाच्या आंत जाऊन पाहूं लागला तर एक देखील गलबत त्याच्या दृष्टीस पडेना; तरी त्यानें जाऊन **देवीकोट्या**वर तोफा सुरू केल्या. पण तो कांहीं हिंमतवान, धाडशी सरदार नसल्यानें तोफांची दाद लागत नाहीं असें दिसतांना तेथून उठून **फोर्ट सेंट डेव्हिड** कडे चालता झाला. परंतु **देवीकोट्या**वर तर इंग्रजांचा जीव गुंतला होता. म्हणून मग त्यांनीं ८०० ब्रिटिश सोल्जर आणि १५०० शिपाई अशी दुसरी नवी फौज तयार करून तिचें आधिपत्य त्या हुशार **स्ट्रिंगर लोरन्सला** देऊन रवाना केली. **लोरन्सला** असा हुकूम होता कीं कांहीं झालें तरी वेहेत्तर, **देवीकोटा** घ्यावाच. त्यानें बरें आहे म्हणून जाऊन एकदम हल्ला केला आणि बाह्यात्कारीं ज्याचा पक्ष धरून, ज्याच्यासाठीं म्हणून इंग्रजांनीं एवढी स्वारी केली, त्याला दूर ढकलून देऊन गादीवर असलेल्या राजाशीं करारमदार करून, त्याच्यापासून तें ठाणें इंग्रजी कंपनीकरितां कायमचें संपादन केलें.

ह्याच सुमारास मद्रासचा गव्हरनर **मिस्टर फ्लॉयर** ह्याला **अंबूरची** लढाई कशी झाली आणि तिचा परिणाम काय झाला तें वर्तमान समजलें; तेव्हां त्याला असें वाटलें कीं, आतां ज्याच्या हातांत सत्ता आहे त्याचें वर्चस्व आपण मान्य केलेंच पाहिजे; न करून चालणार नाहीं. म्हणून त्यानें **चंदासाहेबास** कर्नाटकचा नवाब म्हटलें. परंतु ह्या नूतन नवाब साहेबांची स्वारी **पाँदीशरी**ला निघून गेली आणि तेथें **डुप्ली**नें त्याचें स्वागत फार मोठ्या समारंभानें केलें असें जेव्हां समजलें आणि त्याच्या पाठोपाठ थोडक्याच काळांत मी तुम्हाला पदर पसरतों माझा पक्ष स्वीकारून माझें संरक्षण करा, इत्यादि दीनवाणीची **महंमद अल्लीची** विनंती जेव्हां त्याच्याकडे आली, तेव्हां त्याच्या मनाची किंचित्काल चलबिचल उडून आपण **चंदासाहेबाला** नवाब म्हटलें हें बरें झालें नाहीं असें वाटूं लागलें. **आडमिरल बोस्कावेन** याला **पाँदीशरी**चा वेढा उठवून खालीं मान घालून यावें लागलें होतें म्हणून तो दांत ओंठ चावीत होता. त्याला हें वर्तमान समजलें तेव्हां तो खुशालला आणि **फ्लॉयरला** म्हणाला **महंमदअल्लीला** हातीं धरीत असाल तर मी आपलें आरमार घेऊन तुमच्या मदतीला ह्याच बाऱ्यावर रहातों. परंतु त्याला तें काम मोठ्या जोखमाचें दिसलें; कारण **महंमदअल्ली**च्या बाजूस म्हणण्यासारखें कोणी नाहीं हें उघड दिसत होतें. तर

अशा बलहीन मनुष्याचा पक्ष उचलून तो स्थापित करण्याला आपल्या मुलखाचें सारें उत्पन्न भरीस घालीत बसावें यांत कांहीं अर्थ नाहीं असें त्याला वाटलें, म्हणून त्यानें **बोस्कावेनला** सांगितलें कीं, तुमच्या साहाय्याची कांहीं जरूर नाहीं. तो जबाब ऐकून **बोस्कावेन** तो किनारा सोडून आरमार घेऊन दुसरीकडे निघून गेला. ( तारीख १ नोव्हेंबर. )

**बोस्कावेन**चें आरमार जोंपर्यंत त्या किनाऱ्यावर होतें तोंपर्यंत **चंदासाहेबा**ला कांहीं चैन पडत नव्हतें, भयच वाटत होतें. परंतु इंग्रजांचें आरमार निघून गेलें असें वर्तमान कानीं पडतांच त्याची सारी भीति दूर झाली आणि धैर्य आलें. तो लागलाच **पाँदीशरी** सोडून **त्रिचनापल्ली**च्या मार्गाला लागला. त्याच्याबरोबर २०००० फौज असून मदतीला ८०० फ्रेंच लोक ३०० आफ्रिकन आणि तोफखाना होता; शिवाय **मुजफरजंग** त्याच्याबरोबर निघाला.

**ड्युप्ली**नें जें पुनः पुनः अगदीं बजावून मनांत ठसेसें आपल्याकडून सांगितलें होतें तें जर **चंदासाहेबा**नें ध्यानांत धरलें असतें आणि तेवढीच एक गोष्ट करण्याकडे सारें लक्ष पुरविलें असतें तर हुशार सेनापतीचा जो मोठा मुद्दा असतो तो त्यानें साधला असता, आणि साऱ्या मोहिमेचा निकाल ज्या एका ठिकाणावर लागावयाचा होता तेथें शत्रूनें आपली पराकाष्ठा केली तरी त्याचें कांहीं चालूं नये एवढ्या मोठ्या सैन्याचा मारा केला असता. म्हणजे तो जर **त्रिचनापल्ली**वर एकदम सरळ चालून जाता तर ती त्याच्या हातीं तेव्हांच आल्याशिवाय राहिली नसती; कारण त्या किल्ल्यांत जी तेथलीच शिबंदी होती तिचा त्याच्यापुढें टिकाव लागलाच नसता, हें **ड्युप्ली**च्या ध्यानांत येऊन चुकलें होतें; आणि त्यानें अगदीं जपून जो बेत योजला होता तो आतां खास पार पडतो असें त्याला वाटत होतें. त्यांत कांहीं संदेह नव्हता म्हणून **चंदासाहेबा**च्या सैन्याचा तळ हालून **त्रिचनापल्ली**कडे मोर्चा फिरला, तेव्हां युद्धाची समाप्तीच झाली असें तो समजला. परंतु तो इकडे याप्रमाणें मनांत मांडे खात असतां तिकडे भलतेंच, त्याच्या कधीं स्वप्नांतही न येई असें झालें, अशी जेव्हां त्याला एकीमागून एक वार्ता येऊन पोहोंचली तेव्हां आपला सारा व्यूह ढांसळला म्हणून त्याला किती वाईट वाटलें असेल, केवढा संताप आला असेल, तो

क्रोधानें किती लाल झाला असेल आणि अखेर कसा निराश होऊन बसला असेल याचें वाचकांनीं अनुमान करावें, कारण तें सांगतां येण्यासारखें नाहीं. **चंदासाहेब त्रिचनापल्लीवर** शिस्त धरून निघाला होता, परंतु तो मार्ग सोडून देऊन **तंजावरा**कडे वळला. बरें तसें कां होईना; तेथें जाऊन पोहोंचतांच तो त्या किल्ल्यावर लागलाच हल्ला करता तर तें तरी एक कार्य झालें असतें. त्या वेळीं राजाजवळ किल्ला लढवण्याला पाहिजे तेवढें बल नसल्यामुळें तो बहुधा पाडाव झाल्याशिवाय राहिला नसता. परंतु **चंदासाहेबा**च्या हातून तेंही घडलें नाहीं. तो सारें सोडून देऊन राजाजवळ तहाचें बोलणें लावीत बसला. तो राजा शहाणा होता. तो किल्ल्याची मजबुदी करण्याला आणि बाहेरून कोणाला तरी मदतीला आणण्याला फुरसत कशी मिळेल ह्या काळजींत पडला होता. सल्ल्याची गोष्ट त्याच्या आयतीच पथ्यावर पडली. आपण पढवून ठेवलेला सारा विचार बाजूस ठेवून चंदासाहेबानें भलतेंच आरंभलें म्हणून **ड्युप्ली** जरी अगदीं संतप्त होऊन गेला होता तरी त्यानें केलेली चूक कशी सुधारतां येईल ह्या विचारास तो लागलाच; त्याला एक उपाय दिसला. तो एवढाच कीं, तंजावरच्या किल्ल्यावर हल्ला करून तो स्वाधीन करून घ्यावा. त्याप्रमाणें तत्काळ निश्चय करून त्या तजविजीस तो लागला. त्यानें **चंदासाहेबा**बरोबर जें फ्रेंच सैन्य त्याच्या मदतीकरितां दिलें होतें त्याचें आधिपत्य ( Duquesne ) **ड्युकेन** याजकडे त्यानें दिलेलें होतें. त्याला त्यानें किल्ल्यावर हल्ला करण्याला तावडतोब हुकूम पाठविला आणि **चंदासाहेबाला** विनंतीपूर्वक असें सांगून पाठविलें कीं, **ड्युकेन** हल्ला करील तेव्हां त्याला आपली सारी फौज बरोबर घेऊन जाऊन चांगली मदत करा. **ड्युकेन**नें हुकमाप्रमाणें हल्ला केला तेव्हां राजा निरुपाय होऊन जेरीस आला. त्यानें किल्ल्यावरील आपलें निशाण खालीं उतरलें आणि नम्र होऊन काय सांगाल तें ऐकतों म्हटलें. **चंदासाहेबानें** त्याला ज्या अटी सांगितल्या त्या जबर होत्या; त्यांत मुख्यत्वेंकरून पैशाची मागणी फार मोठी होती. तरी त्यानें त्या साऱ्या कबूल केल्या. परंतु पुढें कराराप्रमाणें एकेका कलमाचा उलगडा करावयाचा समय आला तेव्हां त्याच्या कपटप्रयोगाला रंग येऊं लागला. त्या कसबांत तो चांगला प्रवीण होता. कांहींना कांहीं सबब सांगून तो पैसा देण्याचें लांबणीवर टाकूं लागला. त्यानें आंतून **नादिरजंगाला**

आपल्या मदतीस येण्याविषयीं आधींच विनंती केली होती. ती मान्य करून तो निघाला होता; त्याला होईल तितक्या त्वरेनें लौकर येऊन पोहोंचावें असे त्याचे वरचेवर निकडीचे निरोप चालले होते. इकडे **ड्युप्ली चंदासाहेबा**ला वरचेवर निरोप पाठवून राजाच्या थापांना भुलूं नको, सावध हो, सांगतों हें अजून तरी ऐक, अशी विनंती करून टुमणी लावीत होता; परंतु सारें व्यर्थ. राजाच्या गोड भाषणाला आणि पैशाच्या वचनांना भाळून जाऊन तो तंजावरापुढें खुशाल पडून राहिला होता. होतां होतां **नादिरजंगा**ची स्वारी कर्नाटकांत शिरल्याची बातमी येऊन पोहोंचली तेव्हां तो खडबडून जागा झाला. मग त्यानें शहरावर हल्ला केला असता परंतु तितक्यांत त्याचें सैन्य विथरलें. **नादिरजंग** जवळ आला असें समजलें तेव्हां त्याचे शिपाई लोक त्याच्याबरोबर हल्ला करण्याला निघतना; इतकेंच नव्हे, ते घाबरून गेले आणि हुकूम नसतांही छावणी सोडून माघारे फिरून **पाँदीशरी**ला गिधून गेले.

असा हा मोठा जबरदस्त धक्का बसल्यानें **ड्युप्लीनें** जे मोठमोठे बेत मनांत योजले होते ते सारे तूर्त तर विलयास गेले. पहातां पहातां खरोखर सारें पारडें एकदम फिरून खालचें वर, वरचें खालीं असें झालें. थोड्या आठवड्यांपूर्वी त्याचा साथीदार **चंद्रासाहेब** एक त्रिचनापल्ली खेरीज करून बाकीच्या साऱ्या कर्नाटकाचा जो मालक झाला होता, त्याला पुनः कोठें थारा नाहींसा झाला. तो सारा मुलुख **नादिरजंगा**च्या ताब्यांत गेला. तो मोठें थोरलें प्रचंड सैन्य, सुमारें ३००००० तीन लाख, घेऊन येऊन **पाँदीशरी**च्या अगदीं जवळ, तेथून नऊच मैलांवर **वलडाहूर** येथें येऊन दाखल झाला. इंग्रजांनीं **चंदासाहेबा**ला कर्नाटकचा नबाब म्हटलें होतें परंतु तें सोडून **महंमदअल्ली** हाच खरा नवाब आहे असें आतां ते म्हणूं लागले आणि तो **नादिरजंगा**च्या भेटीला आलाच होता. त्याच्या मागून थोड्याच दिवसांनीं, तारीख २ एप्रिल रोजीं, **मेजर लॉरेन्स** येऊन **नादिरजंगा**ला मिळाला. त्याच्या हाताखालीं ६०० इंग्रज लोक होते.

हा प्रसंग फार कठीण होता. **ड्युप्ली**ची बुद्धि, धैर्य, प्रसंगावधान, इत्यादि गुण चांगलेच कसोटीला लागून, ताऊन सुलाखून परीक्षा होण्याची ती वेळ होती. त्यानें जीं शस्त्रें हातांत धरलीं होतीं तीं जेथच्या तेथेंच मोडून पडत होतीं. त्याची

कांहीं चूक होती किंवा शस्त्र कसें धरावें हें त्याला कळतच नव्हतें म्हणून तसें होत होतें असें मात्र नव्हे; तर त्या शस्त्रांतच तसें वैगुण्य होतें. एकाद्या धाररावानें तलवार उगारली आणि अकस्मात् तिचें पानच मध्यें मोडून पडलें तर तो त्याचा दोष नव्हे, किंवा एखाद्या पायिक शिपायानें बंदुकीचें बागनीट ( buyonet ) शत्रूच्या उरांत खुपसण्याकरितां म्हणून प्रहार केला असतां तें वांकूंच लागलें तर ती कांहीं त्याची चूक नव्हे. त्या बिचाऱ्या धाररावाकडे आणि त्या शिपायाकडे बोल काय ? **चंदासाहेब** तलवारीच्या पानासारखा मोडून पडला आणि फ्रेंच लष्करांतले वरिष्ठ अम्मलदार ऐन प्रसंगीं बागनेटासारखे वांकडे तिकडे झाले ते कसे तें पहा. **द्युकेन** तंजावरच्या तटापुढें मरून गेला. त्याच्या जागीं **गूपीय** ( Goupil ) म्हणून उभा राहिला, तो दुखणेकरी पडून निरुपयोगी झाला. त्याच्या खालचा **दोतय** ( D, auteuil ) म्हणून जो होता तो दुसऱ्याच्या हाताखालीं काम करण्याला उत्तम होता, परंतु स्वतः शिरावर घेऊन काम करण्याला, सेनापतित्व करण्याला अगदीं नालायक होता. परंतु त्या प्रसंगीं दुसरा कोणी नांव घेण्यासारखा त्याच्यापेक्षां बरा नव्हताच म्हणून त्यालाच प्रमुख करून सारा भार त्याच्यावर टाकणें भाग पडलें. **द्युप्लीनें** असा विचार मनांत आणला कीं, आपल्या मुख्य ठाण्यापासून ९ मैलांच्या आंत म्हणजे अगदीं दारांत शत्रु अपरंपार सैन्य घेऊन येऊन उभा राहिला असतां आपण भ्याल्यासारखें, **पाँदीशरीं**त दडून लपून राहिल्यासारखें स्वस्थ बसून उपयोग नाहीं. पुष्कळ दिवसांच्या अनुभवानें त्याला असें कळून आलें होतें कीं, एशियांतल्या लोकांशीं प्रसंग आला असतां त्यांतून पार पडण्याचा मार्ग एकच असतो आणि तो एवढाच कीं, त्यांच्यापुढें दंड ठोकून समरांगणीं उभें रहाणें हा होय. त्याला २००० गोरे, फ्रेंच सोल्जर, आणि बरेच शिपाई जमवतां येण्यासारखे होते. शिवाय **चंदासाहेबा**ची आणि **मुजफरजंगाची** फौज मदतीला जागेवर होती. एवढ्या सैन्याच्या बळावर आपल्याला आपला कार्यभाग उरकून घेतां येईल असा त्याला भरंवसा होता. झालें याप्रमाणें करावयाचें असें त्यानें ठरविलें. मग चौकीपहारा वगैरे चालू रोजच्या कामाला जेवढे अवश्य पाहिजेत, ज्यांवांचून भागणार नाहीं, तेवढे लोक त्यानें ठेवून घेतले आणि बाकी सारे बाहेर काढून त्यांची रवानगी केली. **नादिरजंगाचें** जें प्रचंड सैन्य येऊन बसलें होतें त्याच्या समो-

रच जाऊन उतरावें आणि तसा प्रसंग दिसल्यास त्या सैन्यावर तुटून पडावें असा त्यानें आपल्या सैनिकांस हुकूम देऊन ठेविला होता. तो एवढ्यावरच स्वस्थ बसला नाहीं. **नादिरजंगा**वर मोहनीअस्त्र टाकून, त्याला वश करून घेऊन, तो जो शत्रु आहे तो मित्र व्हावा असा उपाय योजण्याच्या विचारास तो लागला. अशा कामांत तो अगदीं प्रवीण होता हें प्रसिद्धच आहे.

पण काय नशीब पहा! **ड्युप्ली**च्या हातांतलें शस्त्र पुनः मोडून पडलें. **नादिर-जंगा**ला शह देण्याकरितां त्यानें जी फौज पाठविली तिजवरचा मुख्य सेनापति **दोतय** यानें शत्रूवर छापा घालण्याचा बेत केला. परंतु ज्या रात्रीं हा डाव साधण्याचें त्यानें आपल्या मतें योजलें होतें त्या संध्याकाळीं त्याच्या हाताखालच्या अम्मलदारांनीं त्याला असें सांगितलें कीं, आम्ही किंवा आमच्या हाताखालचे शिपाई, यांतून कोणीही तुझ्याबरोबर येणार नाहीं. तंजावरापुढें ते जाऊन बसले होते तेथें तशी रड झाल्यानें आणि तें शहर घेतलें म्हणजे खूप लूट मिळेल अशी जी त्यांनां मोठी आशा होती तिचा भंग होऊन त्यांच्या हातीं कांहीं न लागल्यानें त्या लोकांत असंतोष उत्पन्न झाला होता. तो वाढत वाढत जाऊन ते आतां इतके बिथरून बसले होते कीं अम्मलदार, सोलजर, वगैरे सार्‍यांनीं आतां लढावयाचें नाहीं असा निश्चय केला. इतकेंच नव्हे, आज येथून उठून माघारें जावयाचें असा ते हट्ट धरून बसले आणि त्यांनीं खरोखर तसेंच केलें. ११ तोफा आणि ४० माणसें मागें टाकून ते रातोरात चालते झाले. ह्या पळापळींत कांहीं अनर्थ होऊं नये म्हणून **चंदासाहेब** पिछाडी संभाळीत त्यांच्याबरोबर निघाला. बिचारा **मुजफरजंग** निराश्रित होऊन पडला तो आतां मामा काय करील तें करो म्हणून **नादिरजंगा**च्या स्वाधीन झाला. त्यानें त्याच्या हातांत बिडी अडकवून त्याला कैदेंत ठेविलें. ते बिथरलेले फ्रेंच लोक माघारे निघाले ते **पाँदीशरी**पर्यंत कांहीं निर्विघ्नपणें सुखानें जाऊन पोहोंचले नाहींत. ते जागेवर नाहींत, पळून गेले असें वर्तमान शत्रूंनां पहाटेस लागलें आणि त्याबरोबर मराठे स्वार त्यांचा पाठलाग करण्याकरितां टाकोटाक निघाले. त्यांनीं त्यांनां **पाँदीशरी**च्या अलीकडेच गांठून १९ फ्रेंच लोक ठार केले. तोफांबरोबर ४० असामी मागें राहिले होते त्यांनांही तीच गति मिळाली.

या मोहिमेची हकीगत आपल्या चरित्रांत लिहितांना **ड्युप्ली** म्हणतो— ‘ आपल्या त्या नामर्द, भागूबाई अम्मलदारांच्या वर्तनाची सविस्तर हकीगत

समजली तेव्हां आणि तेवढ्यानें दुर्दैवाचा फेरा पुरा झाला नाहीं म्हणून त्यांत भर घालण्याला **मुजफरजंगा**ला **नादिरजंगानें** धरून बिडी घालून कैदेंत टाकलें असें जेव्हां **ड्युप्ली**ला * समजलें तेव्हां त्याला किती वाईट वाटलें असेल याची कल्पना सहज करतां येईल.' परंतु ज्याच्या खालीं साधारण मनुष्य केव्हांच चेंगरून जावयाचे अशीं डोंगरासारखीं मोठीं संकटें जेव्हां **ड्युप्ली**वर पडत तेव्हां त्याची बुद्धि किती विशाल आणि त्याचें कर्तृत्व किती विलक्षण होतें तें जसें दिसून येई तसें एरवीं कधीं दिसत नसे. पळपुटे लोक लढाई सोडून जेव्हां माघारे आले तेव्हां आपल्या सैन्यांत बेदिली उत्पन्न झाली होती आणि त्यामुळें हें बंड झालें असें त्याला प्रथम कळलें. मग तें मोडून टाकण्याला त्या कठीण प्रसंगीं त्यानें मोठ्या हिमतीनें आणि धैर्यानें जे कडक उपाय योजले त्यांनीं उत्तम गुण आला. माझा हुकूम न मानतां, मला न कळवतां तूं परतलास कसा असें म्हणून त्यानें पहिल्यानें आधीं त्या **दोतय** सेनापतीला उचलून कैदेंत टाकलें. मग अम्मलदार मंडळींतले जे कोणी बंडांत प्रमुख होते त्यांची चौकशी करून त्यांनां शिक्षा ठोठावल्या. नंतर त्या बंडखोर शिपायांनां उभे करून मोठ्या कठोर स्वरानें आणि विलक्षण आविर्भाव करून बोलूं लागून त्यांची अशी खरडपट्टी काढली कीं त्या योगानें ते अगदीं ताळ्यावर आले आणि लज्जित होऊन पश्चात्ताप पावले. ते अगदीं पायांपडणीस येऊन त्याला असें म्हणूं लागले कीं, आमच्या नांवाला आतां हा जो कलंक लागला आहे हा धुऊन टाकण्याची आम्हाला एक-वार संधी द्या. याप्रमाणें इकडे आपल्या बिथरलेल्या सेनेस ताळ्यावर आणण्याच्या कामास लागून तिकडे **नादिरजंगा**कडे बोलणें लावण्यास त्यानें दोन वकील पाठवून दिले. त्यांच्या बरोबर त्यानें जो निरोप पाठविला तो नम्रपणाच्या विनंतीचा, मिळमिळीत नव्हता. तर शत्रूला जिंकून मग त्याला तहाचीं कलमें मान्य करण्यास सांगावें तसा दरडावणीचा होता. तो असा—**अन्वारुद्दीना**च्या घराण्यापैकीं कोणालाही कर्नाटकचा नवाब असें म्हणतां नाहीं कामा; आणि निजामाची दौलत त्याच्या पणतवंडांनां, म्हणजे **मुजफरजंगा**च्या मुलांनां दिली पाहिजे. याप्रमाणें बाहेर उघड उघड सवाल टाकून आपला वरपगडा

---

* **ड्युप्ली** स्वतःविषयीं लिहितांना तृतीय पुरुषीं लिहीत असे; प्रथम पुरुषवाचक शब्द योजीत नसे.

दाखवून आंतून त्यानें निराळेंच कारस्थान आरंभिलें. तें असें कीं, **नादिरजंगा**-च्या लष्करांत जे त्याचे मोठमोठे सरदार बरोबर आलेले होते त्यांतल्या कांहीं बलाढ्य असामींनां फितवून आपल्याकडे सामील करून घ्यावें. ह्या कामीं त्यानें मोठे कुशल असे एतद्देशीय लोक निवडून काढून त्यांची योजना केली होती. त्यांनीं कसकसे यत्न केले आणि त्यांनां काय काय फळें आलीं तें पुढें यथा-स्थलीं सांगण्यांत येईल.

**ड्युप्ली**नें सांगून पाठविलेल्या गोष्टी **नादिरजंग** मान्य करील असें नव्हतेंच. त्यानें कांहीं एक ऐकिलें नाहीं. परंतु **ड्युप्ली**नें आंतून फितूर करण्याकरितां जे लोक पाठविले होते ते कांहीं रिकामे बसले नव्हते. सात दिवसपर्यंत सुभेदाराच्या लष्करांत राहून ते खटपट करीत होते. तितक्या अवकाशांत त्यानें आपल्या फौजेची पुनः नीट व्यवस्था लाविली. कांहीं अम्मलदारांचे दर्जे त्यानें कमी केले. कांहीं असामी पस्ताऊन जाऊन चुकलों म्हणून फार काकुळतीस आले, त्यांनां पूर्वपदावर कायम केलें. शिपाई लोक तर आपल्या गैरवर्तनानें आपल्या नांवाला लागलेला डाग धुऊन काढण्यासाठीं आपला पराक्रम गाजवून दाखविण्याला संधी केव्हां मिळेल अशी अगदीं वाट पहात होते. **दोतय** यानें आपल्याकडे अगदीं कांहीं दोष नाहीं अशी पक्की खात्री करून दिल्यामुळें त्याला पुनः त्याचें पूर्वपद मिळालें. फौजेवरील अम्मलदारांत **द ला तूश** ( De la Touche ) नांवाचा एक जवान मेजर होता, त्याची चालरीत, कर्तृत्व वगैरे **ड्युप्ली**नें विशेष नजर पुरवून पाहिलें होतें. त्यावरून तो त्याच्या पसंतीस उतरला होता. त्याला सेनापतिपद द्यावें असा त्याचा निश्चय झाला होता. त्याचा बेत असा होता कीं, **नादिर-जंगाच्या** छावणीवर छापा घालावा आणि आपण पूर्वींच पाठविलेल्या भेद्यांनीं जे सरदार फितूर करून ठेविले होते त्यांच्या साहाय्यानें **पाँदीशरी**चा गेलेला नांवलौकिक पुनः मिळवावा. हा आपला बेत **द ला तूश**ला सांगून तो सिद्धीस नेण्याचें काम त्यानें त्याच्यावर सोंपविलें. त्या हुशार तरुण पठ्या अम्मल-दारानें तें पत्करलें आणि **व्हलडावर** येथें गेलेले **ड्युप्ली**चे वकील तेथून परत आले त्याच्या दुसऱ्याच दिवशीं ३०० फ्रेंच लोक बरोबर घेऊन रात्र पडतांच तो जो निघाला तो पहाटे तीन वाजतां शत्रूच्या गोटावर तुटून पडून त्याची त्रेधा उडवून देऊन, आपल्याबरोबर लोक खरे किती आहेत हें त्यांनां समजूं न देतां

माघारा फिरून **पॉंदीशरीस** येऊन दाखल झाला. त्याच्या त्या तीनशें लोकांनीं शत्रूकडचे १२०० मुरदे पाडले. त्यांच्यांतले सारे तीन मेले. परंतु हा जो अकस्मात् घाला पडला त्यानें **ड्युप्लीचा** हेतु पूर्ण होऊन त्याच्या मनाप्रमाणें कार्यसिद्धि झाली. **नादिरजंग** सुभेदार तें कृत्य पाहून असा घाबरून गेला कीं, या अल्ला, तोबा तोबा, असें म्हणत लगेच आपला तळ हालवून तो लगबगीनें माघारा गेला. तो निघाला तसा **लारेन्स** ही उठला. तो आपले इंग्रजी सोल्जर घेऊन **फोर्ट सेंड डेव्हिड**च्या आश्रयाला गेला.

**नादिरजंग** सुभेदार पळ काढून माघारा गेला तेव्हां **महंमद अल्लीला** कोणाचाच आधार नाहींसा झाला. त्याला आश्रय घेण्याला स्थान म्हटलें तर त्याच्या छावणीपासून जवळच **तिरूवाडीचें** देवालय होतें. तें बांदिस्त होतें, त्याच्या सभोंता कोट होता. तेथून **फोर्ट सेंट डेव्हिड** सुमारें १३ मैल होता. **द ला तूशनें** ५०० लोक बरोबर घेऊन मुकाट्यांनीं उठून रात्रीची मजल मारून जाऊन **तिरूवाडीचें** तें देऊळ बळकावलें आणि त्यांत २० सोल्जर आणि ५० शिपाई असे ७० असामी चौकी पहाऱ्याला ठेऊन, तेथचा बंदोबस्त करून स्वतः आपण जाऊन **पनारनदीच्या** कांठीं तळ दिला. तो तेथें येऊन खबरदारीनें घट्ट बसला आहे असें पाहतांच **महंमद अल्ली** घाबरून गेला आणि आतां कसें तरी करून लौकर येऊन मला या संकटांतून सोडवा असे **नादिरजंग** आणि इंग्रज या उभयतांनां एकावर एक निकडीचे निरोप पाठवूं लागला. **नादिरजंगानें** त्याच्या मदतीला २०००० फौज पाठविली. इंग्रजांनीं ४०० गोऱ्या लोकांची एक टोळी आणि १५०० शिपाई **क्याप्टन कोप** ह्याच्याबरोबर देऊन पाठविले. त्यावेळीं असें झालें होतें कीं, मद्रासचा गव्हर्नर **मिस्टर फ्लायर** ह्याला काढून त्याच्या जागीं **मिस्टर सॉण्डर्स** याची नेमणूक झाली होती. तो नवा गव्हर्नर **विजागापट्टणाहून** येऊन कामावर रुजू होईपर्यंत मध्यंतरीं मेजर **लारेन्स** यानें तें काम चालवावें असा हुकूम झाला होता म्हणून **लारेन्सचा** कांहीं इलाज नव्हता. स्वतः जातां येईना. त्याला **कोपलाच** पाठविणें भाग पडलें.

याप्रमाणें वेळेवर चांगली मदत येऊन पोहोंचली तेव्हां धीर येऊन **महंमदअल्लीनें तिरूवाडीवर** चाल केली. परंतु तेथचा कडेकोट बंदोबस्त दिसला

तेव्हां देवळावर हल्ला करण्याची छाती होईना म्हणून तेथून माघारा फिरून **दोतय** उतरला होता तेथें गेला आणि त्याच्या छावणीवर तोफा लावून गोळे उडवूं लागला. परंतु तो कांहीं गाफील नव्हता. तो चांगला सावध राहून शत्रु आपल्या अंगावर येण्याची वाटच पहात होता. त्यानें लागल्याच आपल्या तोफा सुरू करून जो भडिमार केला त्यानें याचीं पुष्कळ माणसें मरून गाळण उडाली आणि हताश होऊन माघारें फिरावें लागलें. मग परत जात असतांना पुढें कसें करावें काय करावें ह्या विचारांत उभयतां सेनाधीशांचें भिन्न मत होऊन बेबनाव झाला. अखेर **क्याप्टन कोप** आपलें सैन्य घेऊन **फोर्ट सेंट डेव्हिड**कडे गेला. **महंमदअल्ली**नें कांहीं अगदीं सारी आशा सोडली नाहीं. इंग्रजांचें मन वळवून त्यांनां बरोबर घेऊन अर्काटला जावें अशा उद्देशानें **फोर्ट सेंट डेव्हिड** आणि **तिरूवाडी** यांच्यामध्यें, **पनारनदी**च्या कांठीं तो छावणी करून राहिला. नदी त्याच्या मागच्या बाजूस होती.

**डुप्ली** हा कांहीं हाडाचा शिपाई नव्हता. त्याच्या विशाळबुद्धीला जे मोठाले बेत करतां येत ते हातानें पार पाडण्याला अंगांत जो कांहीं एक विशेष पराक्रम हवा लागतो—पुढें थोड्याच काळानें त्याचे सारे बेत लटपटवणारा जो त्याचा प्रतिस्पर्धी उत्पन्न झाला त्याच्या अंगांत जो गुण अगदीं ओतप्रोत भरलेला होता—तो ईश्वरानें त्याच्या ठायीं ठेवला नव्हता; म्हणून त्याचें सारें लंगडें पडत असे. **महंमदअल्ली पनारनदी**वर उतरल्याचें वर्तमान त्याला समजलें त्याबरोबर त्यानें ती केवढी चूक केली होती तें त्याच्या ध्यानांत आलें आणि त्याबद्दल त्याला पुरें प्रायश्चित्त भोगावयाला लावावयाचें असा त्यानें निश्चय केला. मग त्यानें **दोतय** यास आपली जागा सोडून तळ उठवून **तिरूवाडीस** निघून जाण्याविषयीं हुकूम पाठविला आणि असें लिहिलें कीं, तेथें १२०० फ्रेंच लोक आणि २५०० शिपाई एवढें सैन्य घेऊन **द ला तूश** येऊन तुला मिळेल; शिवाय **चंदासाहेब** १००० स्वार घेऊन येईल; त्या साऱ्या जमावानिशीं कूच करून जाऊन **महंमदअल्ली**ला अकस्मात् गांठून घाबरा करून टाक. **दोतय** यानें हा त्याचा हुकूम अगदीं अक्षरशः बजावला. तारीख १ सप्टेंबर रोजीं तो एकाएकीं जाऊन **महंमदअल्ली**च्या छावणीवर पडला. त्याच्या लष्करांत २०००० लोक होते; पण त्या साऱ्यांची त्यानें अगदीं त्रेधा उडवून दिली. त्यांनां प्राण

घेऊन पळतां भूय थोडी झाली. त्यांनीं **जिंजी**ची वाट धरली. **महंमदअल्ली**ची जी दुर्दशा झाली ती तर कांहीं पुसूंच नये. त्याच्याजवळ दोनच नोकर उरले. त्यांना बरोबर घेऊन तो **अर्काट**ला पळून गेला. त्याच्याकडचे लोक बरेच मेले. फ्रेंचांचें एक देखील मनुष्य मेलें नाहीं.

याप्रमाणें आपण केलेला डाव पुरा साधल्याचें वर्तमान **ड्युप्ली**ला समजलें तेव्हां त्यानें **दोतय** याला पुढें लगट कशी काय करावयाची तो हुकूम पाठविला. त्यानें लागलीच **जिंजी**कडे **ब्यूसी**ची रवानगी केली. तो किल्ला तेथून ५० मैल दूर होता. दक्षिण अर्काट प्रांतांत ह्या किल्ल्यासारखा दुसरा कोणताच मजबूद व बळकट नाहीं अशी त्याची ख्याती होती आणि तो ज्याच्या हातीं असेल त्याचाच त्या प्रांतावर अम्मल चालेल असें सारे समजत असत. महापराक्रमी शिवाजी महाराजांनीं तो घेण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला परंतु त्यांची तेथें कांहीं डाळ शिजली नसल्यानें तो म्हणजे केवळ अजिंक्य आहे असा लोकांचा समज होता. असला तो दुर्गम, दुःसाध्य, दुर्ग घेण्याकरितां **ब्यूसी** तारीख ३ सप्टंबर रोजीं निघाला. त्याच्याबरोबर २५० फ्रेंच लोक आणि १५०० शिपाई होते. तेवढ्या फौजेनिशीं आठव्या दिवशीं म्हणजे तारीख ११ रोजीं तो **जिंजी** पासून तीन मैल अलीकडे थडकला आणि **महंमदअल्ली**च्या लष्करांतून पळून आलेले जे लोक शहराबाहेर तेथें होते त्यांचा तत्काळ पराभव करून जयजयकार करीत **जिंजी** शहरावर चालून जाऊन रात्र होण्यापूर्वींच त्यानें तें काबीज केलें. याप्रमाणें फत्ते झाली परंतु किल्ला अद्याप हातीं यावयाचाच होता. तीन डोंगर भिंतीसारखे समूर उभे गेलेले असून त्यांच्या माथ्यावर तटबंदी केलेली आणि तिकडे जाण्याच्या मार्गावर आसपास जागोजाग नाकीं रोखून तेथें तेथें कोट केलेले, अशा प्रकारचा तो मजबूद किल्ला होता. काळोख पडला म्हणजे मगच तो घेण्याचा प्रयत्न करावयाचा असा विचार करून चंद्रास्त होईपर्यंत **ब्यूस्सी** गप्प बसला. मग फौजेंतले अगदीं निवडक निवडक असामी वेंचून काढून त्यांच्या त्यानें तीन टोळ्या केल्या आणि शिड्या लावून तीनही डोंगरांवर एकाकाळींच चढून त्यानें ते तिन्ही एकदम काबीज केले. शेवटच्या तिसऱ्या गडावर गेलेली टोळी अशी वर जाऊन बसली आणि सूर्योदय झाला. तें काम सर्वोत्कृष्ट झालें. साऱ्या हिंदुस्थानांत असा पराक्रम केलेला पूर्वी कधीं कोणीं पाहिला नव्हता.

**ब्यूस्सीनें जिंजीचा** किल्ला याप्रमाणें घेतल्याचें वर्तमान ऐकून जिकडे तिकडे दहशत उत्पन्न झाली. **नादिरजंग** अगदीं निष्काळजीपणानें ऐषआरामांत, चैनींत गुंग होता तो सावध होऊन विचारांत पडला; **महंमद अल्ली** घाबरून गेला; आणि फ्रेंचांपुढें कोणाचें कांहीं चालावयाचें नाहीं, ते अजिंक्य आहेत अशी सर्व लोकांची खात्री होऊन गेली. **नादिरजंग** सुस्त पडलेला नुकतासा कोठें त्या वार्तेनें जागा होऊन आंग झाडीत होता इतक्यांत दुसरें वर्तमान असें आलें कीं, **दोतय** कूच करून **अर्काटवर** चालून जात आहे. तें ऐकून त्याला भीति उत्पन्न झाली. तशांत दुसऱ्या दिवशीं **ड्युप्ली**कडून त्याला एक पत्र येऊन पोहोंचलें. त्यांत त्यानें असें फर्मावलें होतें कीं, **मुजफरजंगाला** सोडून द्यावें आणि त्याच्या आजाच्या वेळेस त्याच्याकडे जो हुद्दा आणि जे अधिकार होते ते त्याला परत द्यावे; **चंदासाहेबा**ला कर्नाटकचा नबाब म्हणावें आणि **मच्छलीपट्टण** शहर फ्रेंचांच्या स्वाधीन करावें. तें पत्र वाचून **नादिरजंग** समजला कीं, पहिल्या कलमाप्रमाणें **मुजफरजंगाला** कैदेंतून मुक्त करावयाचा म्हणजे त्याच्या हातांत शस्त्र देऊन, ये मला मार, असें आपल्या तोंडानें सांगावयाचें आहे. तो मोकळा होऊन जाऊन फ्रेंचांच्या पाठीशीं पडून त्यांना घेऊन येऊन आपल्याशीं लढणारच त्यापेक्षां आपण आधीं त्यांच्याशींच गांठ घातलेली काय वाईट असा विचार करून त्यानें तोच निश्चयांत आणला. मग एक लाखापेक्षां जास्तच होईल एवढी फौज बरोबर घेऊन तो **जिंजी**च्या रोखानें कूच करून निघाला. परंतु त्या वर्षीं पर्जन्य नेहमीपेक्षां फार जास्त पडल्यानें त्या काळांत म्हणजे सुमारें दोन महिन्यांत कोणाला कांहीं करतां आलें नाहीं. उभय पक्षांच्या सैन्यांना बसून रहावें लागलें. एवढी सवड मिळाल्यानें तितक्या अवधींत **ड्युप्ली**नें दुसराच उद्योग केला. त्याला ती संधी चांगली मिळाली. **नादिरजंगा**च्या पदरीं मोठमोठे बलाढ्य सरदार होते तेच काय ते त्याच्या लष्करांत प्रबळ असून त्यांच्याच जिवावर त्याला लढावयाचें होतें; परंतु स्वतः त्याचें त्यांच्याशीं कांहीं रहस्य किंवा सख्य नव्हतें. ही गोष्ट **ड्युप्ली**ला चांगली माहीत असल्यानें त्यानें त्यांच्याशीं सूत्र लावून, संधान बांधून, गुप्तपणें पत्रव्यवहार सुरू केला. तो सारखा चालू राहून कारस्थान माजलें आणि शेवटीं पर्जन्यकाळ संपण्यापूर्वींच त्याचें त्यांचें असें ठरलें कीं, **ड्युप्ली**नें लिहिलेलीं सर्व कलमें **नादिर-**

**जंगा**नें मान्य केलीं तर बरें; तें न करतां तो जर आग्रहानें युद्धालाच उभा राहिला तर पहिल्याच प्रसंगीं, लढाई सुरू होऊन ऐन भरांत आली म्हणजे, त्यांनीं अकस्मात् एकदम उठून उलटून त्याच्यावरच पडावें. फितुरांतल्या अगदीं बारिक-सारिक गोष्टी, कोणी कोणत्या क्षणीं काय करावें, कसें उलटावें येथपर्यंत साऱ्या नीट जपून ठरून राहिल्या होत्या.

पर्जन्य जबर, आणि सतत पडत असल्यानें त्या काळांत कांहीं काम चालेना. छावणींत उगाच स्वस्थ पडून रहावें लागत होतें; आणि पुढें फ्रेंचांसारख्या जबरदस्त भयंकर शत्रूशीं प्रसंग असल्यानें मोहीम कांहीं लौकर आटोपणारी नव्हे, लांबेल आणि मेहेनतही फार पडेल असा अजमास दिसत होता. म्हणून **नादिरजंगा**चें मन द्विधा होऊं लागलें. जोंपर्यंत लढाईचें काम चालणार तोंपर्यंत त्याला लष्करांत छावणींत रहाणें जरूर होतें. त्याच्या सारख्या विलासी, चैनी स्वभावाच्या पुरुषाला तें कसें पुरवावें ? त्याला तर त्याचा अगदीं तिटकारा होता. म्हणून दिसेंबर महिन्याच्या अवेलीस त्यानें **ड्युप्ली**ला एक पत्र लिहिलें आणि तीन महिन्यांपूर्वीं त्यानें जीं कलमें लिहून पाठविलीं होतीं तीं मी मान्य करतों असें त्याला कळविलें. **ड्युप्ली**चा मुख्य हेतु एवढाच होता कीं, साऱ्या दक्षिण हिंदुस्थानांत फ्रेंचांचें वर्चस्व असावें,—आणि त्याचीं सारीं कारस्थानें तो हेतु साधण्याकरितां होतीं—तो सुभेदाराच्या ह्या उत्तरानें सफळ होण्याचा रंग दिसूं लागला; लढाईमध्यें यशापयश कांहीं स्वाधीनचें नसतें, आपल्याला जय येईलच अशी कांहीं त्याला पक्की खात्री नव्हती; म्हणून आपला मनोरथ सिद्धीस जातोसें दिसल्याबरोबर त्यानें **दोतय** याला असें पत्र लिहिलें कीं, माझा दुसरा हुकूम येईपर्यंत लढाईचें काम तहकूब ठेव. परंतु हा हुकूम येऊन लष्करांत दाखल होईतों इकडली स्थिति बदलली होती. **दोतय** ह्याला संधिवात ( Gout ) व्याधीनें फारच पीडल्यामुळें लष्कर सोडून जावें लागलें होतें आणि त्याचें मुख्य सेनापतीचें काम त्याच्या हाताखालचा तरुण हुशार अम्मलदार **द ला तूश** याजकडे आलें होतें. सुभेदाराच्या लष्करांतील फितुर झालेल्या सरदारांबरोबर **ड्युप्ली**नें जो गुप्त पत्रव्यवहार सुरू केला होता तो त्यानें अगदीं जपून तसाच चालू ठेवला होता. **नादिरजंगा**नें **पाँदीशेरी**स **ड्युप्ली**कडे जें पत्र पाठविलें त्यांतला मजकूर कशा स्वरूपाचा आहे हें त्या सरदारमंडळीकडून त्याला

समजलें होतें आणि शिवाय वर असेंही पक्कें समजलें होतें कीं, त्या पत्राप्रमाणें वागण्याचा त्याचा कांहीं उद्देश नाहीं, याजकरितां आपलें ठरलें आहे त्याप्रमाणें एकदम बार उडवावा हें चांगलें. असा दोहींकडून पेंच आला तेव्हां आतां काय करावें हा विचार पडला. अखेर **द ला तूशनें** असें ठरविलें कीं या प्रसंगीं आपल्याला जो पूर्वीचा हुकूम आहे त्याला धरून वागणें वाजवी आहे, तें कांहीं गैर ठरणार नाहीं. त्याप्रमाणें त्यानें लागलेंच उत्तर लिहिलें. तें असें कीं आपला हुकूम फार उशिरां आल्यानें आतां त्याप्रमाणें करण्याची कांहीं सोय उरली नाहीं. कारण सुभेदाराच्या छावणींतील आमच्या स्नेह्यांच्या विचारें सारी तयारी होऊन आज ( तारीख १५ डिसेंबर ) रात्रीं कार्य उरकून घेण्याचा बेत ठरलेला आहे. याप्रमाणें पत्रोत्तर रवाना करून तो लगेच ८०० फ्रेंच लोक ३००० शिपाई आणि १० तोफा बरोबर घेऊन **नादिरजंगा**च्या गोटावर चालून निघाला. पहाटे चार वाजतां तो त्याला दिसूं लागला. त्याबरोबर त्यानें त्यावर हल्ला केला. त्याच्या-पुढें कोणाच्यानें उभें राहवलें नाहीं. तो साऱ्यांना तुडवीत पुढें चालला. परंतु अशी ती मोठी मारामार अगदीं भरांत आली असतां त्याला आपल्या डाव्या बाजूकडून सुमारें २०००० फौज नीट आपल्याकडेच चाल करून येत आहे असें दिसलें. हे लोक शत्रु आहेत कीं मित्र आहेत हें कांहीं कळेना, त्यामुळें त्याचें काळीज चर्र झालें. आतां आपला सर्वस्वीं नाश होतो असें त्याला वाटलें; कारण त्यांच्या हातून सुटून जाण्याचें नांवच नको होतें; तें अगदीं अशक्य होतें. परंतु थोडक्याच काळांत त्याची भीति नाहींशी होऊन उलटा अधिक धीर आला. कारण जे सरदार फितूर होऊन त्याच्याकडे येणार होते त्यांनीं ज्या खुणा कर-ण्याचा संकेत ठरला होता त्या त्यांनीं केलेल्या त्याच्या दृष्टीस पडल्या. ते येऊन मिळतांच दोन्ही सैन्यें एक होऊन त्या रणांगणीं जिकडे **नादिरजंग** होता तिकडे त्यांनीं आपला मोर्चा फिरविला. आपण **ड्युप्ली**ला जो खलिता पाठविला आहे तो मान्य होऊन हें सारें काहूर उठलेलें आपोआप दबेल, थंड पडेल, अशा भरंवशावर सुभेदारसाहेबांची स्वारी असल्यानें, अहो हुजूर उठा, सावध व्हा, शत्रु चालून आले, अशी जी पहिली ओरड झाली ती त्यानें ऐकिली तरी आपल्यावर खरोखरच हल्ला येतो आहे असें त्याच्या मनाला कांहीं वाटेना. परंतु हल्ला आला खरा, आतां कांहीं संशय धरायाला नको असें जेव्हां पक्कें दिसलें,

तेव्हां त्याचा भ्रम गेला आणि मग तयार होऊन तो हत्तीवर बसून निघाला, आणि जेथें त्याचा तोफखाना होता तेथें जाऊन उभा राहिला. आपला भाचा **मुजफरजंग**, कैदी, ह्यास त्यानें एका हत्तीवर बसवून आपल्या बरोबरच चालविलें होतें; तोही हत्ती तेथें उभा केला. **नादिरजंगा**नें **मुजफरजंगा**च्या पाठीशीं एक असामी मारेकरी बसवून ठेविला होता. त्याला त्याची अशी ताकीद होती कीं, जर कोठें जरा कांहीं विश्वासघाताचें चिन्ह दिसलें तर आधीं तत्काळ **मुजफरजंगा**चें डोकें उडवावें. अशा तयारीनें स्वारी हत्तीवर बसून लढाई पहात असतां आपली फौज एकाएकीं कचकरून मागें हटली आणि तींत मोठा गोंधळ उडाला आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्याचें कारण काय याची चौकशी करतांना त्याला असें पक्कें समजलें कीं, आपल्या सरदारांपैकीं कांहीं असामी फितूर होऊन आपल्यावर उठले आहेत. त्याबरोबर **मुजफरजंगा**चा शिरश्छेद करण्याविषयीं त्याच्या मागें बसविलेल्या असामीस त्यानें खूण केली. परंतु त्याच्या हातून तें कर्म तत्काळ झालें नाहीं; जरा दिरंगाई झाली. इतक्यांत **कडप्याचा** नबाब, जो त्या फितुरी मंडळींतल्या प्रमुखांपैकींच होता, तो पुढें सरसावला. त्यानें **नादिरजंगा**च्या अगदीं जवळ जाऊन, त्याच्या छातींत गोळी घालून प्राण घेतला आणि आपल्या एका हुजऱ्याकडून त्याचें डोकें कापवून आणून तें **मुजफरजंगा**च्या चरणीं अर्पण केलें.

**ड्युप्ली**ला शरण जाऊन त्याच्या चरणांचा आश्रय करणारा, **चंदासाहेबा**चा मित्र, ज्याला क्षणोक्षणीं मरण डोळ्यांपुढें दिसत होतें, क्षणार्धापूर्वीं ज्याचा शिरश्छेद करण्यास हुकूमही झाला होता, परंतु ज्याचें नशीब मोठें बलवत्तर होतें, तो **मुजफरजंग** याप्रमाणें रंकाचा राव होऊन निमिषमात्रांत कैदेंतून सुटून सिंहासनारूढ झाला. हा दक्षिणेचा सुभेदार असा त्याच्या नांवाचा एकदम डंका वाजला. हा आमचा धनी कसचा, याला कां मुजरा करा असें म्हणणारा त्याच्या मामाच्या त्या अफाट लष्करांत एकही असामी नव्हता. आपण दक्षिणेचे सुभेदार झालेत, आपला हेतु पूर्ण झाला हें पाहून आम्हाला मोठा संतोष वाटतो, असा **द ला तूशाचा** निरोप घेऊन **ब्यूस्सी** तो कळवण्याकरितां त्याच्या भेटीस गेला तेव्हां तो जो थोड्या वेळापूर्वीं कैदेंत होता तो डामडौलानें सिंहासनावर बसलेला आहे आणि त्याच्या सभोंती अमीर उमरावांची गर्दी आहे असें त्याच्या

दृष्टीस- पडलें. सायंकाळीं **द ला तूश** स्वतः त्याच्या भेटीस गेला तेव्हां **मुजफरजंगा**नें त्याला सांगितलें कीं, आतां येथून एकदम निघून **पाँदीशरीस** जावें, तेथें असणाऱ्या त्या महाप्रतापी सूत्रधार **ड्युप्ली**साहेबास भेटावें आणि पुढें तो सांगेल त्याप्रमाणें वर्तावें अशी माझी इच्छा आहे.

लढाईमध्यें शत्रूचा संहार होऊन आपल्याला अगदीं अकल्पित पूर्ण जय आल्याचें वर्तमान **ड्युप्ली**ला अकस्मात येऊन पोहोंचलें तेव्हां तो आश्चर्यचकित होऊन गेला. युद्धाचा शेवट अशा प्रकारें होईल हें त्याच्या ध्यानीं मनींही नव्हतें. तसा त्याचा तर्क देखील नव्हता. त्यानें कधीं मनांतही आणली नसती असली ती अगदीं असंभाव्य गोष्ट घडून आली होती. परंतु वस्तुतः पाहिलें तर जें काय झालें तें सारें त्याच्याच कारस्थानांचें प्रत्यक्ष फळ होतें. दीन होऊन साहाय्य मागण्यास आलेल्या **मुजफरजंगा**ला धीर देऊन प्रथम हातीं धरणारा तो होता. **नादिरजंगा**सभोंते फंदफितुराचें जाळें पसरून त्याच्यावर पाश टाकून त्याला अगदीं हतवीर्य, निश्चेष्ट करून आंवळून टाकावें हा सारा बेत त्याचा आणि त्याप्रमाणें हरप्रयत्नानें कार्य घडवून आणणारा तोच. किंचित्काळपर्यंत **मुजफर-जंगा**ला विपरीत ग्रहदशा येऊन त्याची अगदीं निराशा झाली, कोठें कांहीं आधार उरला नाहीं, पहावें तिकडे शून्य दिसूं लागलें तेव्हां आपलें नशीबच खोटें असें म्हणून तो शत्रूच्या स्वाधीन होऊन बंदीखान्यांत पडला असतांही **ड्युप्ली**नें आशा सोडली नाहीं, धीर सोडला नाहीं; त्याला सोडून देऊन पूर्व-पदावर स्थापिलें पाहिजे असें **नादिरजंगा**ला दटावून सांगितलेलें त्यानें प्रथम ऐकिलें नाहीं, परंतु अखेर तें मान्य करतों म्हणाला तेव्हां त्याच्याशीं समेट करावा आणि युद्ध बंद करावें असें त्यानें जें मनांत आणलें होतें ती त्याची चूक होत होती, परंतु **द ला तूश**नें साहस करून ती होऊं दिली नाहीं, धैर्यानें त्याला तारलें; आणि आतां तर त्यानें जें म्हणावें तें सिद्ध व्हावें असा योग आला होता. त्यानें ज्यांनां हातीं धरलें होतें त्यांतला एक तर अखेर दक्षिणेचा सुभेदार होऊन बसलाच आणि दुसरा, त्याचाच मित्र, लौकरच कर्नाटकचा नवाब होऊन बसतो असें उघड दिसत होतें; त्यांत कांहीं शंका नव्हती. याप्रमाणें फ्रेंचांनां काल चांगला अनुकूल आला. इंग्लिशांनां तो प्रतिकूल झाला. त्यांच्यामध्यें कोणी पुढाकार घेण्यासारखा माणूसच नव्हता. कारण **लॉरेन्स**

विलायतेला निघून गेला होता. **क्लाइव्ह** अप्रतिम गुणी खरा, परंतु त्याचे गुण अद्याप दृग्गोचर होऊं लागले नव्हते, म्हणून ते **फोर्ट सेंट डेव्हिड**मध्यें कोपऱ्यांत पडून होते. त्यांचा दोस्त **नादिरजंग** तर प्राणास मुकला आणि त्यांनीं हातीं धरलेला **महंमदअली** अनेक संकटें भोगून कसाबसा जीव घेऊन **त्रिचनापल्ली** गांठून बसला होता, परंतु त्याच्याजळ माणूस नव्हतें. **ड्युप्लीनें** केलेलें कारस्थान जसें पूर्णपणें सिद्धीस गेलें तसें पूर्वी कधीं कोणाचें गेलें नव्हतें.

दक्षिणेचा नवीन सुभेदार **पाँदीशरीस** जाऊन **ड्युप्ली**ला भेटल्यानें त्याच्या शक्तीला चांगलाच कायमपणा आला. रणांगणीं **नादिरजंगा**चा वध होऊन फ्रेंचांचा जयजयकार झाला, त्यांच्याकडे विजयश्रीनें कृपावलोकन केलें त्याबरोबर **पाँदीशरीं**त संपत्तीचा पूर लोटला. त्यांनां जी लूट मिळाली ती अशी विलक्षणच होती. परंतु त्यांनां जय मिळाल्यानें जे मोठमोठे दुसरे लाभ झाले त्यांच्यापुढें ती लूट म्हणजे कांहींच नव्हे, ती त्यांच्या पासंगाला देखील पुरली नसती. **ड्युप्ली**चा सत्कार करण्याकरितां **मुजफरजंगानें** मोठ्या थाटानें दरबार भरून प्रथमतःच जेव्हां त्याची तेथें भेट घेतली तेव्हां भर दरबारांत त्यानें त्याच्यावर मानांचा आणि पदव्यांचा अगदीं वर्षाव केला. तो असा—जो **पाँदीशरी**चा गव्हर्नर तो कृष्णानदीपासून खालीं दक्षिणेस तहत कन्याकुमारीपर्यंत, म्हैसूर आणि सारा कर्नाटक प्रांतसुद्धां, एकंदर मुलखाचा नवाब अशी एक पदवी दिली. **व्हलडाव्हर** हा गांव आणि त्याच्याखालीं असलेल्या सर्व जमिनी ह्या **ड्युप्ली**ला त्याच्या खुद्द खासगीकडे बक्षीस म्हणून दिल्या; आणि त्याला सात हजार स्वारांचा मनसबदार केलें. मोंगलबादशहांच्या देणग्यांत ही मनसब म्हणजे अती उच्च मानांपैकीं एक होती. **मुजफरजंगानें** आणखी असा हुकूम फर्माविला कीं, दक्षिण हिंदुस्थानांत फ्रेंचांचीं जीं नाणीं असतील तीं सररहा चालावीं. **मछ्ली-पट्टण** आणि **यनावन** ( Yanaon ) हीं दोन बंदरें फ्रेंच कंपनीला त्यानें सर्व राजकीय हक्कांसुद्धां कायमचीं बहाल केलीं; आणि शेवटीं त्यानें **ड्युप्ली**ला असें सांगितलें कीं राजकीय प्रकरणीं सर्व कामांत मी तुझा सल्ला घेत जाईन हें अगदीं पक्कें समज.

**ड्युप्लीनें** या प्रसंगीं जें वर्तन केलें तें फार प्रशंसनीय होतें; त्यांत त्याच्या मनाचा थोरपणा, स्वदेशोत्कर्षाविषयींची आस्था, देशाभिमान, राजकारणी दृष्टि

आणि मन:संयमन हीं चांगलींच दिसून आलीं. तो स्वार्थपरायण नव्हता. त्याचा सारा हेतु कायतो फ्रान्साचा लौकिक व कीर्ति वाढावी आणि हित व्हावें हा होता. राजेरजवाड्यांशीं तो जे तहनामे, करारमदार करी त्यांत त्याची सारी नजर हें साध्य करण्याकडे असे. कोणाच्या स्तुतीला भुलून किंवा स्वहिताला गुंतून यांत कांहीं विघ्न येईल किंवा अंतर पडेल म्हणून तो फार जपत असे. त्यानें जो मार्ग एकदां रोखला त्यापासून तो कधींही चळला नाहीं. या प्रसंगीं **मुजफरजंगा**नें त्याला जे मोठे थोरले मानमरातब आणि उंच उंच पदव्या दिल्या त्यांचा स्वीकार करतांना त्यानें त्याचे फार फार आभार मानले. **मच्छ-लीपट्टण** आणि **यनावन** व त्यांच्या आसमंतांतला मुलुख सुभेदारानें दिला तो त्यानें फ्रान्स देशाच्या नांवानें घेतला. परंतु कर्नाटकचा नवाब हा हुद्दा त्यानें घेतला नाहीं. ही पदवी आपल्याला घेतां येणार नाहीं असें त्याला वाटलें. **चंदासाहेबा**ला हातांत धरून त्यानें त्या नव्या सुभेदारसाहेबापुढें त्याला नेलें आणि म्हटलें हा आपला पुरातन दोस्त, कसास उतरलेला, याला ही पदवी आपण मागेंच दिलेली आहे, तर ती या प्रसंगीं कायम करावी अशी माझी आपल्याला विनंती आहे. ती त्याची निर्लोभता पाहून त्याच्याविषयीं सर्वांच्या मनाचा ग्रह फार उत्तम झाला. त्याचा शब्द कांहीं खालीं पडला नाहीं. **चंदा-साहेबा**ला नवाबपदाचीं वस्त्रें तेथच्या तेथेंच तत्काळ मिळालीं. परंतु अखेर दरबार बरखास्त होऊन उठतांना पहावें तर तेथें भेटीकरितां जमलेल्या त्या मुख्य त्रिमूर्तींत **ड्युप्लीचें** प्रस्थ फारच वाढलें. त्याचें वजन आणि नांवलौकिक हीं अमर्याद वाढलीं.

**द ला तूश**यानें रणांगणीं संग्रामांत जो जय मिळविला त्यानें फ्रेंचांची शक्ति खरोखरच अमर्याद वाढली. **मुजफरजंगा**ला त्यांनीं आजपर्यंत वेळोवेळीं खर्चाला लागला तसतसा पैसा दिला होता त्याची फेड करण्याकरितां त्यानें एक-दम पांच लाख रुपये रोख दिले आणि त्याबरोबरच त्यांनां बक्षीस म्हणून आणखीं पांच लाख दिले. अशी दहा लाख रोकड रक्कम मिळाली. त्यानें त्यांनां जो मुलुख दिला त्याचें दरसालचें उत्पन्न जवळजवळ चार लाख रुपये होतें. सगळें झाल्यावर **मुजफरजंगा**कडून **ड्युप्ली**ला एक सूचना आली. ती मान्य करण्याला त्याला कांहीं हरकत नव्हती. ती अशी होती कीं तिचा अंगिकार केल्याच्या

योगानें **पाँदीशरी**च्या तिजोरीवर खर्चाचा मोठा बोजा पडत असल्यानें जी ताणाताण होत होती ती नाहींशी होऊन सुभेदाराच्या दरबारांत आणि राजधानींत चालणाऱ्या राजकारस्थानांत आणि सल्लामसलतींत वस्तुतः फ्रेंचांचें प्राबल्य होणार होतें.

ती सूचना विनंतीच्या रूपानें पुढें आली. ती अशी कीं, कांहीं फ्रेंच फौज सुभेदाराबरोबर त्याच्या राजधानीला जावी, तिच्यावर हुकूम चालवण्यास एक हुशार फ्रेंच अम्मलदार असावा, तिचा सारा खर्च सुभेदाराच्या तिजोरींतून चालावा आणि ती नेहेमीं त्याच्या पाहिजे त्या कामाला यावी. ही विनंती मान्य केली असतां सुभेदाराच्या दरबारांत आपलें वजन नेहेमीं कायम रहाण्याला हा एक आयताच मार्ग होईल हें लक्षांत आणून **ड्युप्ली**नें ती तत्काळ मान्य केली. त्या वेळीं **द ला तूश** आजारी पडून युरोपांत निघून गेला असल्यामुळें त्यानें त्या फौजेचें आधिपत्य **ब्यूस्सी**ला दिलें. ही योजना अगदीं यथायोग्य, उत्कृष्ट झाली, असें पुढील हकीगतीवरून दिसून येईल.

सर्व व्यवस्था लागल्यावर **मुजफरजंगा**नें **औरंगाबादे**ला जाण्यास निघण्याची तयारी केली. त्या काळीं तें शहर दक्षिणेच्या सुभेदारांचें आवडतें असून त्यांचें मुख्य ठाणें तेथेंच असे. **ब्यूस्सी** आपल्या हाताखालीं ३०० फ्रेंच लोक आणि १५०० कवाईत शिकलेले शिपाई घेऊन त्याच्याबरोबरच निघावयाचा होता, परंतु **मुजफरजंग** तारीख ७ जानेवारी १७५१ इसवी रोजीं निघाला आणि **ब्यूस्सी** दोन दिवसांनीं मागाहून निघाला. त्यानें त्याला तारीख १५ रोजीं जाऊन गांठलें. सुभेदार साहेब **औरंगाबादे**ला निघून जाण्यापूर्वीं **महमदअल्ली**कडून कांहीं अटींवर **त्रिचनापल्ली** स्वाधीन करतों असें बोलणें आलें होतें. त्या त्याच्या अटी मान्य झाल्या होत्या. तेव्हां आतां **चंदासाहेबा**लाही कोणी शत्रु किंवा प्रतिस्पर्धी राहिला नाहीं असें झाल्यासारखें दिसूं लागलें होतें.

**ड्युप्ली**चें राजकारण सिद्धीस गेलें. त्याचे डाव साधले. त्याचा हेतु पूर्ण झाला. दक्षिण हिंदुस्थानांत फ्रेंचांचें वजन चांगलें बसलें; इतकेंच नव्हे, त्यांचा सर्वांना दरारा वाटूं लागला. परंतु महिना दोन महिने लोटले नाहींत तों एक लहानसें अरिष्ट उद्भवलें. त्यापासून कदाचित् मोठेंच काहूर माजलें असतें, परंतु तें **ब्यूस्सी**नें फक्त आपल्या दक्षतेनें आणि तोफेनें तत्काळ समूळ नाहींसें केलें.

**नादिरजंगा**च्या पदरचे जे नबाब **ड्युप्ली**ला फितूर होऊन आपल्या यजमानावर उठले आणि त्याच्या नाशास प्रवृत्त झाले, तेच पुनः एक होऊन **मुजफरजंगा**चें उच्चाटण करण्याच्या विचारास लागले. परंतु त्यांचें कृष्ण कृत्य उघडकीस आलें. त्याबरोबर **ब्यूस्सी**ला आपल्या पाठोपाठ मदतीस येण्यास सांगून **मुजफरजंग** स्वतः आपले स्वार घेऊन त्या बंडखोरांचें पारिपत्य करण्याकरितां त्यांवर चालून गेला. लढाई सुरू झाली. ते नबाब **ब्यूस्सी** रणांगणीं येईपर्यंत आपल्या जागीं दम धरून राहिले, परंतु तो येतांच अगदीं थोड्या वेळांत त्यांचा मोड होऊन पळापळ सुरू झाली. त्यांच्यांतला एक प्रमुख असामी मरून पडला आणि दुसरा, **कडप्याचा** नबाब, जबर जखम लागून घायाळ झाला. बाकीचे असामी त्याला उचलून घेऊन जाण्याच्या खटपटींत होते, परंतु **मुजफरजंग** त्याला धरून आणण्याच्या इराद्यानें त्यांच्या पाठीस लागला. धांवतां धांवतां **करनूळच्या** नबाबाची आणि त्याची गांठ पडली. तो बंडखोर उलटून उभा राहिला. मग ते उभयतां आणि त्यांच्या बरोबर जे थोडेसे लोक होते ते अगदीं हातघाईवर येऊन निकरानें लढले. त्यांत **मुजफरजंगा**च्या कपाळांतून भाला पार जाऊन तो पडला आणि तलवारीच्या वारांनीं **कडप्याच्या नबाबाचे** तुकडे तुकडे उडून तो मेला. याप्रमाणें उभयतांचाही शेवट झाला.

याप्रमाणें हा जो एकाएकीं कठीण प्रसंग गुदरला तो फ्रेंचांनां फार अनिष्ट झाला असता. त्यांचें हित सर्वस्वीं बुडालें असतें. **मुजफरजंग** मरून गेला त्याबरोबर आतां दक्षिणेचा सुभेदार मी, मी वारस, हक्क माझा आहे, असें म्हणून ती गादी बळकावण्याला जर एकादा हुशार, कर्तृत्ववान्, आणि वजनदार मनुष्य तेथेंच उभा रहाता, किंवा **ड्युप्ली**च्या तर्फेचा त्या वेळीं तेथें असणारा मनुष्य पहिल्या प्रतीचा हुशार आणि कर्तृत्ववान् कार्यकर्ता नसता, तर गेल्या बारा महिन्यांत जीं काय कारस्थानें, उलाढाली आणि हाणामारी, लढाई वगैरे होऊन अखेर फळ आलें होतें, तें सारें एका तासाच्या आंत पार नाहींसें झालें असतें. परंतु **ब्यूस्सी** पहिल्या प्रतीचा हुशार मनुष्य होता. त्याची बुद्धि सतेजस्क, कुशाग्र, तीव्र असून हिंदुस्थानच्या लोकांनां कसें वागवावें तें त्याला चांगलें कळत होतें व त्याप्रमाणें करण्याची जातीचीच शक्ति त्याच्या अंगांत वसत होती. तत्क्षणीं विचार करावा, तत्क्षणीं काय तो निश्चय करावा आणि तत्क्षणीं त्या-

प्रमाणें क्रिया करावी, असें त्याचें अगदीं निश्चित मत, असा त्याचा सिद्धान्त ( maxims ) असे. या प्रसंगीं त्यानें तत्काळ असा विचार केला कीं, या वेळेस जर का मीं पुढें होऊन आपल्या शिरावर सारा भार घेतला नाहीं तर आजपर्यंत झालेलें सारें बहुधा फुकट जाईल, बुडेल. तो तत्काळ पुढें सरसावला. सन १७४८ मध्यें दक्षिणेचा सुभेदार **निजामउल्मुल्क** मेला तेव्हां त्याचे धाकटे चौघे मुलगे **सलाबतजंग, निजामअल्ली, बसालतजंग** आणि **मीरमोगल** हे जनानखान्यांत होते असें मागें सांगितलेलें आहे. जेव्हां **नादिरजंगा**नें बापाची गादी आणि सारा मुलुख बळकावला तेव्हां त्यानें आधीं ह्या चौघांनां धरून कैदेंत ठेविलें. **मुजफरजंग** ठार झाला तेव्हां हे कैदेंतच होते. **ब्यूस्सी**नें पुढाकार घेतला तेव्हां त्याला ज्या एका मुख्य गोष्टीचा आधीं निर्णय करणें आलें ती अशी होती कीं, आपल्याला फ्रान्साचें हित साधावयाचें आहे तर आतां **मुजफरजंगा**च्या अज्ञान मुलाला उचलून आणून गादीवर बसवावें कीं कैदेंत असलेल्या चौघां बंधूंपैकीं वडील मालक म्हणून त्याला सोडवून आणून हा दक्षिणेचा सुभेदार म्हणून मसनद त्याच्या स्वाधीन करावी, दोहोंत बरें कोणतें ? विचाराअंतीं त्याला असें दिसलें कीं, अज्ञान बाल मालक करून कांहीं उपयोग नाहीं. कारण हिंदुस्थानांत गादीवर बाल राजा असला म्हणजे अनेक प्रकारच्या खटपटी, उपद्व्यापी, मसलती लोकांचें चांगलें फावतें. म्हणून सज्ञान मनुष्यासच आणून बसवावें असा त्यानें निश्चय केला. मग लगेच तेथें हजर असलेल्या प्रमुख अमीर उमराव, सरदार, जहागीरदार वगैरे लोकांस बोलावून त्यांची सभा करून पुढें काय करावयाचें तो आपला बेत त्यानें त्यांस कळविला आणि त्याचीं कारणेंही उघड करून सांगितलीं. त्याचें बोलणें मान्य होऊन त्याला सर्वांची संमति मिळाली. त्याबरोबर त्याच दिवशीं त्यानें **सलाबतजंगा**ला कैदेंतून मुक्त करून आणून आतां हा दक्षिणेचा सुभेदार म्हणून त्याच्या नांवाची द्वाही फिरविली. याप्रमाणें याही प्रसंगीं दैवगति कशी विचित्र असते तें दक्षिण हिंदुस्थानांत पुनः एकवार दिसून आलें. एक असामी क्षणांत रंकाचा राव झाला. **सलाबतजंगा**च्या स्वप्नींही सुभेदारी आली नसेल अशा समयीं तो अकस्मात् कारागृहांतून सुटून सिंहासनारूढ झाला आणि निष्कंटक राज्य भोगूं लागला.

**ड्युप्लीनें मुजफरजंगा**चा पक्ष धरून जें कांहीं स्वदेशाचें आणि स्वतःचें हित साधलें होतें तें त्याच्या ध्यानीं मनीं नसणारी गोष्ट अकस्मात् घडून आल्यानें अल्पकाळांतच सर्व विलयास जाण्याचा प्रसंग आला होता; परंतु **ब्यूस्सी**च्या साहसानें, धैर्यानें आणि निश्चयानें तो टळला आणि सारें जसेंच्या तसें कायम राहिलें. इतकेंच नव्हे, **ब्यूस्सी**नें आपल्या शहाणपणानें फ्रान्साचें आणि **ड्युप्लीचें** आणखी हित साधलें. तें **ड्युप्ली**नें जें काय संपादन केलें होतें त्याच्याच तोडीचें होतें, कमी नव्हतें. **सलाबतजंगा**ला सुभेदारी मिळतांच त्यानें फ्रेंचांचे उपकार मानून प्रथम त्यांनां देहेनगी दिली. ती अशी—**निजामपट्टनं**, **कोंडवीर**, **आलमनावा** आणि **नरसापूर** हीं शहरें आणि त्यांच्या खालचा मुलुख त्यांस दिला. त्यांनां **मच्छलीपट्टन** आधींच मिळालें होतें, त्याला लागूनच हा मुलुख होता. **यनावन** येथील वखारी बांधून दिल्या; आणि **गंजम** प्रांतांतलें **माफुज** बंदर ( चिकाकोल ) खुद्द **ड्युप्ली**ला बक्षीस दिलें. थोडेसे दिवस गेल्यावर ह्या नवीन सुभेदार साहेबांची स्वारी सर्व सैन्यासह निघाली ती बंडखोर झालेल्या त्या सरदार जहागीरदारांच्या मुलखांतून जयजयकार करीत आस्ते आस्ते जात जात अखेर तारीख २९ जून रोजीं **औरंगाबाद** शहरीं दाखल झाली. त्याला दक्षिणेचा सुभेदार नेमल्याबद्दल दिल्लीच्या मोगल बादशहाकडून फरमान आणविण्याची तजवीज झाली होती. त्याप्रमाणें तो दाखल झाला. मग मोठा थोरला दरबार भरून **ब्यूस्सी** व आपल्या राज्यांतील अमीरउमराव, सरदार, जाहागीरदार, मानकरी वगैरे मंडळीस बोलावून **सलाबतजंगा**नें मोठ्या समारंभानें गादीवर बसून बादशाही फरमानाबरहुकूम दक्षिणेचा सुभेदार हें उच्च पद आणि त्याचे मानमरातब स्वीकारले. तेथून अगदीं शेवटपर्यंत म्हणजे तो जीवमान असेपर्यंत **ड्युप्ली**शीं अगदीं खऱ्या स्नेहभावानें वागत असे आणि त्याची प्रशंसा करी.

अशा प्रकारें ह्या भागांत वर्णिल्याप्रमाणें सन १७५१ वर्षाच्या आरंभीं **ड्युप्लीनें** फ्रेंच लोकांचें हिंदुस्थानांतलें राज्य वैभवाच्या आणि अधिकाराच्या अगदीं शिखराला नेऊन पोहोंचविलें. सांप्रत ज्याला निजामाचा मुलुख असें म्हणतात त्या सर्व प्रदेशांत तेथचा सुभेदार आणि **ब्यूस्सी** यांच्या द्वारें त्यांचें प्राबल्य फार मोठें झालें होतें. इंग्रजलोक ज्याला ‘ उत्तरसरकार ’ म्हणतात त्या म्हणजे **गंजाम**,

**विजागापट्टनम्**, **गोदावरी** आणि **कृष्णा** हे प्रांत ज्या मुलखांत मोडतात त्या मुलखांत फ्रेंच लोक लौकरच प्रबल होणार होते. पुढें ज्याला ( Ceded Districts ) म्हणजे सोडलेले प्रांत असें म्हणूं लागले त्या म्हणजे **कडपा**, **कर्नूल** आणि **बेल्लारी**, हे प्रांत ज्या मुलखांत मोडतात त्या—प्रदेशांत ते फ्रेंच प्रबळ झालेच होते. त्याचप्रमाणें ते **चंदासाहेबा**च्या द्वारानें कर्नाटकांत प्रबळ झाले होते. **महंमदअल्ली त्रिचनापल्ली** धरून होता तेथें, आणि **तंजावर**चा राजा आपलें राज्य संभाळून होता तेथें मात्र त्यांचें प्राबल्य नव्हतें. **मद्रास** आणि **फोर्ट सेंट डेव्हिड** ह्या इंग्रजांच्या दोन ठाण्यांतही तें नव्हतें, परंतु तेथें इंग्रज आहेत कीं नाहींत हें त्या वेळीं बाहेर कळत देखील नव्हतें. ते सरासरी जीव धरून होते. ते अगदीं निस्त्राण, निर्माल्यवत झालेले आणि त्यांचें वजन कांहीं नाहीं असें दिसत होतें. याप्रमाणें या वेळीं **पाँदीशरी**च्या त्या हुशार आणि दक्ष अधिपतीचा येथून तेथून सारीकडे वर्चष्मा आणि जयजयकार झाला. त्याच्या प्रतापरवीचा उज्वल प्रकाश मंद होण्याला क्षितिजप्रदेशावर कोठेंही किंचित अभ्र उठलेलें त्याच्या नजरेस पडत नव्हतें. त्याला शत्रु म्हणण्याला एक **महंमदअल्ली** काय तो उरलेला होता, परंतु तोही त्याला हात जोडूं लागला होता आणि तो सांगेल तें ऐकणार होता. इंग्रज लोक कांहीं हालचाल करीत नव्हते. त्याच्या बातबेतांत, डावांत, किंवा कारस्थानांत, कांहीं ढवळाढवळ करा-वयास संधी सांपडेल अशी त्यांनां अगदीं कांहीं आशा उरलेली नाहीं असें दिसत होतें. अशी जर एकंदर स्थिति होती तर मग त्यानें जे फार दूर नजर पुरवून बेत योजले होते ते सिद्धीस कां जाणार नाहींत ! मध्येंच एखादें विघ्न येईल असा काय संभव होता ? कांहीं नाहीं. त्याला तर कोठें कांहीं तसें दिसत नव्हतें. तसेंच इंग्लिशांच्याही नजरेस कोठें कांहीं येत नव्हतें. तथापि **फोर्ट सेंट डेव्हिड**च्या तटाच्या आंत, सामसूम असल्या ठिकाणीं एक पुरुष विचार करीत बसला होता, तें कांहीं कोणाला माहीत नव्हतें. त्यानें ती असंभाव्य दिसणारी गोष्ट प्रत्यक्ष करून दाखविली.

---

# भाग ७ वा.

## इंग्लिश लोक हातपाय हालवूं लागले.

कर्नाटकच्या गादीवर आपला हक्क सांगणारा, ज्याला इंग्रजांनीं हातीं धरलें होतें तो **महंमद अल्ली** समरांगणीं पराभव पावून अगदीं एकटा पळत सुटला. तो बिचारा कसाबसा जाऊन **त्रिचनापल्लीस** पोहोंचला हें मागें सांगितलें आहे. आपल्याला जय येण्याची त्याला अगदीं कांहीं आशा दिसेना तेव्हां तेथून त्यानें **ड्युप्ली**कडे वकील पाठवून बोलणें सुरू केलें आणि माझ्या गोष्टी तुम्ही कबूल करीत असाल तर तुमचें बोलणें मी मान्य करतों, **चंदासाहेबा**ला कर्नाटकचा नबाब म्हणतों आणि **त्रिचनापल्ली** व तिच्या खालचा मुलुख त्याच्या स्वाधीन करतों, असें कळविलें. त्याचें दोन गोष्टींचें मागणें होतें तें एवढेंच कीं, माझ्या बापाचा जो काय पैसा असेल तो माझ्या स्वाधीन करावा आणि कर्नाटकाबदला मला त्यांतच थोडासा मुलुख द्यावा. **ड्युप्लीनें** त्याचें बोलणें मान्य केलें होतें, आणि तें **मुजफरजंगा**ला कळवून त्याच्याकडूनही तसेंच वचन घेऊन ठेविलें होतें. परंतु पुढें **ब्यूस्सी** आणि **मुजफरजंग पाँदीशरीहून** निघून **औरंगाबादे**ला चालते झाल्यावर **ड्युप्ली** जेव्हां **महंमद अल्ली**ला कराराप्रमाणें **त्रिचनापल्ली** स्वाधीन कर आणि जें मागितलेंस तें घे असें म्हणूं लागला तेव्हां तो कांकूं करूं लागला; मग तुमच्या बोलण्याला कांहीं तरी आणखी प्रमाण द्या म्हणूं लागला. इकडे आंतून त्यानें इंग्रजांकडे वकील पाठवून त्यांचें साहाय्य मिळावें म्हणून विनवणी चालविलीच होती. त्यांचीं आर्जवें करतां करतां चार महिने व्यर्थ गेले.. परंतु त्यानंतर अखेर त्यांच्याकडून त्याला असें वचन मिळालें कीं, तुझ्यावर जर हल्ला येईल तर आम्ही तुला तो फिरवण्याला चांगली मदत करूं. एवढें आश्वासन मिळतांच त्याला धीर आला आणि मग नादीं लावण्याचें किंवा संदिग्ध भाषण करण्याचें सोडून देऊन त्यानें **ड्युप्ली**ला स्पष्टच सांगून सोडलें कीं, आतां कांहीं होवो, **त्रिचनापल्ली**चा किल्ला हातचा सोडावयाचा नाहीं, त्याचें आपल्या-हातून होईल तसें हर तऱ्हेनें रक्षण करावयाचें असा माझा संकल्प झाला आहे.

हें उत्तर कानीं पडतांच **ड्युप्लीच्या** मनाचा निश्चय झाला. आतां त्वरेला मोल नाहीं हें ध्यानांत आणून त्यानें सन १७५१ च्या मार्च महिन्यांत **दोतय** याच्या बरोबर ४०० फ्रेंच लोक, थोडेसे आफ्रिकन लोक आणि कांहीं तोफा देऊन त्याला **चंदासाहेबाच्या** मदतीला पाठवून दिलें. **चंदासाहेब** आपली सात आठ हजार फौज आणि ही साहाय्यास आलेली फौज बरोबर घेऊन **त्रिचनापल्ली** काबीज करून **महंमद अल्लीला** तेथून हांकलून लावावयाचें असा बेत करून तिकडे चाल करून निघाला.

परंतु ह्या वेळीं **फोर्ट सेंट डेव्हिडमध्यें मिस्टर सॉण्डर्स** म्हणून जो इंग्रजांचा मुख्य अधिकारी होता तो **ड्युप्लीच्याही** आधीं आपल्या तयारीस लागला होता. **महंमद अल्लीला** मदत करावयाची असा एकदां निश्चय झाला तर आतां आपली सारी फौज त्या कामावर पाठविणें भाग आहे असें त्यानें ठर-विलें. **त्रिचनापल्ली** जर **चंदासाहेबाच्या** हातीं लागली तर मग **ड्युप्लीचे** जे एक एक प्रचंड बेत आहेत ते अगदीं अमर्याद वाढतील असें त्याला भय पडलें होतें. म्हणून त्यानें फेब्रुआरी महिन्याच्या अवेलीसच **क्याप्टन कोप** याच्या हाताखालीं २८० इंग्रज आणि ३०० शिपाई देऊन त्याला **महंमद अल्लीला** मदत करण्याकरितां **त्रिचनापल्लीच्या** किल्ल्यांत पाठवून दिलें होतें; आणि आतां जसा प्रसंग दिसेल तसें करण्यास अवकाश लागूं नये, सिद्धता असावी म्हणून त्यानें ५०० इंग्लिश लोक १०० आफ्रिकन लोक आणि १०० शिपाई, एवढी फौज तयार केली. नंतर जेव्हां वर सांगितल्याप्रमाणें मार्च महिन्यांत **चंदासाहेब** आणि **दोतय** फौज घेऊन निघाले तेव्हां **सॉण्डर्सनें** आपण तयार ठेवि-लेली फौज बाहेर काढली आणि त्यांच्या पालथीवर रहाण्याकरितां तिची रवा-नगी केली. ह्या फौजेचें आधिपत्य **जिंजेन** नामक एका **स्विस** सैनिकाला दिलेलें होतें.

**सॉण्डर्सनें** **डी जिंजेनला** अशी अगदीं स्पष्ट ताकीद देऊन ठेविली होती कीं, तूं तूर्त फक्त पालथ राखण्याचें काम कर, शत्रूची हालचाल पहात रहा, पाठीवर ऐस, परंतु फ्रान्साशीं इंग्लंडचा तह आहे हें पक्कें ध्यानांत ठेव आणि कांहीं झालें तरी **महंमदअल्लीचें** सैन्य तुला येऊन मिळेपर्यंत त्यांच्यावर हात टाकूं नको. एकदां **महंमदअल्ली** येऊन मिळाला म्हणजे काम झालें; मग

पाहिजे तें कर. त्याच्या नांवाखालीं सारें खपेल. युरोपांत फ्रान्स आणि इंग्लंड हीं दोन्ही राष्ट्रें आमचा एकमेकांशीं तह आहे म्हणून स्वस्थ बसलीं असून इकडे दक्षिण हिंदुस्थानांत त्या दोघांच्याही प्रतिनिधींनीं परस्परांशीं एकसारखें घोर युद्ध सुरू ठेवून पुनः आपले नामानिराळे राहून आम्हीं कांहीं तहनामा मोडला नाहीं अशी शपथ देण्यास मोकळे रहाण्याला मोठ्या युक्तीनें ही खाशी पळवाट काढली होती.

**ड्युप्लीचें** धोरण ( policy ) डाव पेंच, कशाप्रकारचे होते तें ध्यानांत येण्याला उभयपक्षींच्या सैन्यांनीं रणांगणीं केलेल्या कृत्यांतील ज्या मुख्य मुख्य गोष्टी समजणें अगदीं अवश्य आहे तेवढ्याच येथें सांगाव्या असें आम्हीं योजिलें आहे. **ड्युप्लीचें** नशीब असें खोटें होतें कीं, समरभूमीवर त्यानें सांगितलेलें काम चांगल्या प्रकारें करण्याला त्याला हवे तसे चांगले अम्मलदार मिळत नसत. या समयीं असेंच झालें. आणि पुढें जे जे प्रसंग आले त्यांतही असेंच झालें. त्याचा उत्तम सेनापति होता तो **औरंगाबादेस** दक्षिणेच्या सुभेदाराजवळ अडकला होता; त्याला तेथून हालविण्याची सोय नव्हती. **दोतय** संधिवातग्रस्त दुखणाइत होता. मागें त्यानें त्याच्यावर जें काम सोंपविलें होतें तें त्यानें अगदीं बिघडून टाकलें होतें. **द ला तूश** हा तरुण आणि प्रतापी होता; त्याच्या अंगांत कर्तृत्वशक्ति उगाच साधारण म्हणण्यापैकीं नव्हे, चांगली, विशेष असल्याचें अनेक प्रसंगीं दिसून आलें होतें. तो ह्या वेळीं फ्रान्सांत होता. परंतु तेथून ७०० चांगले कसलेले लोक बरोबर घेऊन पर्जन्यकाळीं निघणार आहे अशी **ड्युप्लीला** आगाऊ सूचना आली होती, म्हणून तो १७५२ ह्या वर्षीं केव्हां तरी येईल असें अनुमान होतें. **लारिस्टनचा लॉ**, ज्यानें वेढ्याच्या वेळीं चांगलें काम करून दाखविलें होतें, तो वेढा उठल्यावर आपली बिघडलेली प्रकृति सुधारण्याकरितां घरीं निघून गेला होता तो मात्र अगदीं लौकर यावा असें होतें. परंतु तो येऊन दाखल होईपर्यंत कोणाला तरी नेमणें भाग होतें म्हणून **ड्युप्लीनें दोतय** ह्याला नेमलें. तो नुसता आपल्या हुकमाप्रमाणें वागला म्हणजे पुरे आहे; मग कांहीं सहसा चूक होणार नाहीं असें **ड्युप्लीला** वाटत होतें.

परंतु **दोतय** त्याच्या हुकमाप्रमाणें कांहीं वागला नाहीं. तो **चंदासाहेबा**-बरोबर **पाँदीशरीहून** निघून थोड्याशा मजला गेला नाहीं तों ते नबाबसाहेब

आपला हेतु साधण्याकरितां त्याचीं आर्जवें करूं लागले तसा तो भाळला आणि **त्रिचनापल्ली**चा रस्ता सोडून त्याच्याबरोबर उत्तर अर्काट प्रांतांत शिरला. **चंदासाहेबा**चा हेतु तिकडे जाऊन पैसा मिळवावा हा एक आणि आपली फौज वाढवावी हा दुसरा होता. ते दोन्ही साधले हें खरें, परंतु त्या नादाला लागल्यानें इकडे जें नुकसान झालें तें अपरिमित झालें. एकदां युद्धाला उभें राहिलें म्हणजे वेळेला फार जपलें पाहिजे, तिची किंमत कांहीं विलक्षण असते, हा जो अगदीं मुख्य सिद्धांत आहे, तो कांहीं त्याच्या ध्यानांत आला नाहीं; किंवा तिकडे त्याचें दुर्लक्ष झालें म्हणा. परंतु त्याचा परिणाम असा झाला कीं **महंमदअल्ली**ला आणि इंग्रजांनां दक्षिण **अर्काट**प्रांतांत निर्भयपणें यथेच्छ संचार करण्यास मोकळीक मिळाली. त्यांनीं ती संधी साधून त्या भागांतलीं पुष्कळ ठाणीं बळकावलीं. याप्रमाणें ते दिवसानुदिवस प्रबळ होत गेले आणि शत्रूशीं सामन्याला उभे रहाण्याला त्यांच्या अंगांत अधिकाधिक सामर्थ्य येत गेलें.

अखेर **चंदासाहेबा**च्या फौजेची वाढ होत होत ती १७००० भरली तेव्हां त्यानें **त्रिचनापल्ली**कडे मोर्चा फिरविला. **दोतय** नेहेमीं त्याच्याबरोबरच असे. ते **त्रिचनापल्ली**कडे वळेपर्यंत दिवस फार निघून गेले. **त्रिचनापल्ली**च्या ईशान्येस उत्तर बाजूस ( north-north-east ) **वोलकोंडा** म्हणून एक चांगलें मजबूद तटबंदी केलेलें शहर तेथून ३८ मैलांवर आहे, तें दुरून नजरेस पडे इतके जवळ ते येऊन ठेपेतोंपर्यंत जुलै महिना लागून त्याचे एक दोन दिवस गेले. त्या **वोलकोंडा** शहरापुढेंच, त्याच्या उत्तर बाजूस, **महंमद अल्ली** आणि **डी जिंजेन** यांच्या फौजांचा तळ पडला होता. त्या दोघांनीं त्या बाजूनें त्या शहराला वेढा दिल्यासारखेंच दिसत होतें.

इंग्लिश फौजेचा सेनानायक **डी जिंजेन** ह्याला **सॉण्डर्स**साहेबाच्या हेतूप्रमाणें काम करण्याला **महंमद अल्ली**ची फौज जवळ पाहिजे होती. तिला नांवाला पुढें केली म्हणजे बरें, नाहीं तर आपण जें करावें तें बेकायदा दिसणार म्हणून त्याला तिची वाट पहात रिकामें तिष्ठत रहावें लागलें. तिला यावयाला उशीर लागला. अखेर **महंमद अल्ली**नें आपल्या भावाबरोबर १६०० स्वार देऊन **त्रिचनापल्ली**हून त्याची एकदाची रवानगी केली. तो येऊन **डी जिंजेन**ला मिळाल्या-

बरोबर त्यानें पुढें पाऊल टाकलें. **वरदाचलम** नामक तटबंदी देवालय आहे तें आधीं घेऊन तेथून कूच करून त्यानें **वोलकोंड्यावर** चाल केली आणि तारीख २ जुलै रोजीं त्याच्या तटापुढें थडकून लगेच, त्याच दिवशीं, तेथच्या किल्लेदाराला शहर माझ्या स्वाधीन कर असें सांगून पाठविलें. आपण कोणत्या पक्षाला मिळावें हा त्या ठाणेदाराच्या मनाचा अद्याप कांहीं निश्चय झाला नव्हता. इतक्यांत **चंदासाहेबा**ची स्वारी येत आहे, जवळ आली आहे, असें समजलें तेव्हां त्याचा निश्चय ठरला आणि ठाणें सोडीत नाहीं असें त्यानें साफ सांगितलें. **डी जिंजेन**नें त्याला पुष्कळ लालुच दाखविली, आर्जवें केलीं, परंतु तो कांहीं वळला नाहीं. दोन दिवसांनीं **चंदासाहेब** आणि **दोतय** येऊन पोहोंचले त्यांनीं-ही त्याच्याकडे बोलणें लाविलें; परंतु त्यांनांही त्यानें तोच जबाब दिला. याप्रमाणें सारा एक पंधरवडाभर दोघेही त्याला वश करून घेऊन आपलें कार्य साधण्यास पहात होते. इंग्रजांची छावणी त्या शहरापासून सुमारें दीड मैलावर एका राईमध्यें नैर्ऋत्य बाजूस होती; फ्रेंचांची उत्तरेच्या बाजूस चार मैलांवर होती. त्या ठाणेदाराला वश करण्याला दोघेही एकमेकांवर सव्वाल टाकल्यासारखे अधिकाधिक लालुच दाखवीत होते. परंतु बळजबरीनें ठाणें घ्यावें असें एकाच्याही मनांत येईना; कारण दोघांनांही अशी भीति वाटत होती कीं, आपण निकरावर आलों असें दिसलें तर ठाणेदार आपल्या शत्रूला सामील होऊन चटकर त्याला आपल्या मदतीला बोलावील. परंतु अखेरीस **डी जिंजेन**ला कांहीं दम धरवेना. प्रथम त्यानें हातघाईवर प्रकरण आणावें असा निश्चय केला आणि तारीख १९ रोजीं हल्ल्याची सारी तयारी केली; रात्र पडल्यावर चालून जाऊन त्यानें बाहेरचे कोट घेतले आणि आंतल्या मुख्य किल्ल्यावर हल्ला केला, परंतु तो कांहीं घेतां आला नाहीं, तेव्हां तितकेंच थांबून आतां उजाडल्यावर सकाळीं पहातां येईल म्हटलें. परंतु तितक्यांत त्या किल्लेदाराचा निश्चय झाला. इतक्या पंथाला गोष्ट आली तेव्हां आतां आपल्याला लढणें भाग आहे असें पाहून संतापून जाऊन आणि सकाळीं पुनः हल्ला झाला म्हणजे न जाणो किल्ला जाईल अशी भीति उत्पन्न होऊन त्यानें **दोतय**ला बोलावणें पाठविलें, त्याबरोबर तो मान्य होऊन आनंदानें आपल्या लोकांनिशीं आंत शिरला. मग **डी जिंजेन**नें भल्या पहाटे उठून जेव्हां हल्ला केला तेव्हां शहराच्या तटावरील तोफांतून त्याच्यावर शिस्तवार निशाण

धरून मारलेले गोळे पडूं लागले. त्याच्या मागच्या बाजूस **चंदासाहेब** आणि त्याचे मदतगार मैदानांत उभे होतेच; त्यांनीं तिकडून तोफा लावून आधीचा वर्षाव चालविला. याप्रमाणें मागून पुढून जेव्हां अकस्मात् गोळ्यांचा भडिमार होऊं लागला तेव्हां **डी जिंजेन**चें सैन्य भयानें अगदीं घाबरें झालें आणि माघारें फिरून पळत सुटलें. आपल्यावर अकस्मात् असा दुहेरी मारा होईल असें त्याच्या स्वप्नींही आलें नव्हतें. आतां **महंमद अल्ली**च्या लोकांची काय वाट होईल हें त्यांनीं मनांतसुद्धां आणलें नाहीं. एक तोफ आणि पुष्कळ बंदुका त्यांनीं जागच्या जागींच टाकल्या होत्या त्या व त्यांच्या छावणींतलें सारें लवाजम्याचें सामान विजयी झालेल्या फ्रेंचांच्या हातीं लागलें.

फ्रेंचांचें नशीब उघडण्याची ही मोठी उत्तम संधी होती. **ड्युप्ली**चा महा बुद्धिमान् प्रतिस्पर्धी जो क्लाइव्ह त्याप्रमाणें त्याला जर उत्तमप्रकारें सेनापतित्व करण्यास लागणारी विशाल बुद्धि असती आणि ह्या समयास तो त्या रणांगणीं हजर असता, त्या वेळीं **ब्यूस्सी** किंवा **द ला तूश** तेथें हजर असता, निदान लढवय्या शिपायाच्या अंगांत साधारणतः असणारी बुद्धि ज्याला आहे असला मनुष्य जर त्या विजयी सेनापतीच्या ठिकाणीं असता, तर दक्षिण हिंदुस्थानांत आतां वर्चस्व कोणाचें व्हावयाचें ह्या प्रश्नाचा निकाल त्या दिवशीं, म्हणजे तारीख २० जुलै रोजीं, तेथें चटकर लागला असता. इंग्लिश कंपनीला रणांगणीं जेवढी म्हणून फौज पाठवितां आली असती तेवढी सारी तिची गोरी फौज तेथें हजर होती. ती तीनशांच्या आंत असून पराभूत होऊन भरधांव पळत सुटली होती. तोफा, लष्करचें सामानसुमान, डेरे, राहुट्या वगैरे, कोठीचे दाणागोटा वगैरे पोटाला लागणारे जिन्नस वगैरे कशाकडे न पहातां सारें जेथच्या तेथें टाकून ते लोक जीव घेऊन पळत सुटले होते. त्यांच्या साहाय्याला असलेली **महंमद अल्ली**ची गबाळी फौज त्यांची पिछाडी संभाळीत चालली होती. त्यांच्यावर मागून जरा हल्ला झाला असता म्हणजे त्या गबाळी फौजेची तत्काळ दाणादाण झाली असती. त्यांच्यापासून मैल दोन मैलांच्या आंतच फ्रेंचांचें विजयी सैन्य, विजयश्रीनें हर्षभरित झालेलें, उभें होतें. तें संख्येनें निदान त्यांच्या इतकें तरी होतें; आणि त्याच्या साहाय्याला १७००० घोडा घेऊन त्याचा सेनापति कर्नाटकचा नबाब स्वतः हजर होता. असा सर्व प्रकारें अनुकूल योग जमून आलेला असल्यानें दक्षिण

हिंदुस्थानांत वर्चस्व कोणाचें व्हावयाचें ह्या गोष्टीचा अखेरचा निकाल लावण्याला फ्रेंच सेनापतीनें तोंड उघडून फक्त एक शब्द उच्चारावयास पाहिजे होता—तो शब्द उच्चारण्याला कमी योग्यतेचे आणि भित्रे सेनापति नेहेमीं नाखुष असतात, त्यांनां तितका धीर होतच नाहीं.—परंतु त्या शब्दांत असें कांहीं विलक्षण सामर्थ्य भरलें आहे कीं, एशियेंतील लोकांबरोबरच्या युद्धप्रसंगांत तो उच्चारलेला फुकट गेला असें आजपर्यंत कधीं घडलेंच नाहीं. अशीं हीं मंत्राक्षरें कोणतीं म्हणाल तर ' Forward ' ' आगे बढो ' हीं होत. इंग्रज सोलजर्स ५००, हबशी लोक १००, आणि काळे शिपाई १००० असें १६०० माणूस रणांगणांतून जीव घेऊन दक्षिण हिंदुस्थानच्या ग्रीष्म ऋतूंतल्या प्रखर सूर्यतापानें त्रस्त होऊन, धापा देत, जवळची सारी चीजवस्त टाकून देऊन, निराश होऊन. घाबरून जाऊन, त्राहित्राहि भगवान् म्हणत पळत सुटलें आणि एकमेकांच्या पायांत अडखळून पडूं लागलें, तेव्हां त्याची स्थिति कशी झाली असेल ती उगाच मनांत आणावी. त्या वेळीं तर त्यांच्या अंगांत धैर्य किंवा दम याचा लवलेश उरला नव्हता. त्यांच्या सेनापतीची अवस्था तीच होती. त्या साऱ्यांनां क्षणोंक्षणीं असें वाटत होतें कीं, आतां आपल्यामागून धडाधड तोफांचे बार सुरू होतील. जर का त्यांचा तो अदमास खरा झाला असता आणि गोळ्यावर गोळा उडता तर काय विचारता ! ते सारे तेथच्या तेथें एकदम मृत्युमुखीं पडते; बहुधा त्यांतून कोणी एक सुटला नसता. मग फ्रेंच लोक जलदी करून **त्रिचनापल्लीवर** धांवून जाते तर त्यांनां तो किल्ला बहुतकरून कांहीं मेहेनत न पडतां, गोळी न वाजवितां, अनायासें मिळाला असता आणि दक्षिण हिंदुस्थानांत आपलें राज्य चिरस्थाई करतां येतें.

**दोतय** हा पुष्कळ अनुभवी, पोक्त शिपाई असल्यानें घाबरून भांबावून पळत सुटलेल्या, गळाठलेल्या शत्रुसैन्याचा पाठलाग केला म्हणजे केवढा नफा होत असतो, आपल्याला मिळालेला जय कसा पक्का होतो, हें चांगलें जाणत असावा. तर मग असला हा **दोतय** Forward ' धांवा, ठोका ' हा मंत्रोच्चार केल्याशिवाय कसा राहिला ? ह्या प्रश्नाचें उत्तर आम्हाला एवढेंच एक दिसतें कीं त्या वेळीं तो Gout संधिवातानें फार पीडलेला होता. हें एक कारण झालें, परंतु त्याला स्वस्थ बसण्याला ही कांहीं योग्य सबब नव्हती. त्याचे

हातपाय आंखडून जाऊन त्याला अत्यंत वेदना होत असल्या तरी त्यानें असा विचार करावयास पाहिजे होता कीं, सुदैव ही देवता मोठी लहरी आहे ती वरचेवर प्रसन्न होत नसते. तिनें एकदां कल्याण करून घेण्याचा सुयोग आणून दिलेला असून जर कोणी तो साधला नाहीं तर ती पुनः त्या मनुष्यावर कृपावलोकन करीलच असें घडणार नाहीं. परंतु त्यानें कांहीं असा विचार केला नाहीं. दक्षिण हिंदुस्थानांत फ्रेंचांचें दैव चांगलें फळफळण्याच्या ऐन संधीच्या वेळेस स्वस्थ बसून इंग्रजांनां **त्रिचनापल्ली**कडे खुशाल जाऊं देणें त्याला गैर वाटलें नाहीं. **त्रिचनापल्ली** घ्यावयाची हें तर आपलें मुख्य काम, ह्यासाठीं तर आपण आलों आहों, पराभूत होऊन पळत सुटलेल्या इंग्रजांचा समूळ नाश करण्याचें या वेळीं आपल्या हातांत असून तसें न केलें आणि त्यांनां **त्रिचनापल्ली** गांठूं दिली तर ते किल्ल्यांत शिरतील आणि आंतल्या शिबंदीला एवढी मदत जाऊन पोहोंचली म्हणजे ते चांगलेच बळावतील; हा विचार न करतां त्यानें पुढें चाल करण्याचा आळस केला. त्याचा परिणाम पुढें थोड्याच काळांत त्याच **त्रिचनापल्लीं**त फ्रेंचांनां भराभर गाडण्याचा प्रसंग आला तर त्यांत आश्चर्य काय ?

परंतु **दोतय**ला तसा व्याधिग्रस्त पाहून सुदैवाला त्याची दया आली आणि त्यानें पुनः एकवार त्याच्याकडे कृपादृष्टि फेंकली. एक अहोरात्र स्वस्थ पडून विश्रांति घेतल्यावर त्या फ्रेंच सेनापतीला बरें वाटून त्याच्या अंगांत हुशारी आली; आणि **चंदासाहेबा**ला बरोबर घेऊन तो इंग्रजांच्या पाठीवर जाण्यास निघाला. सुमारें २० मैलांची मजल मारून तो **उतातूर** येथें जाऊन पोहोंचला. तेथें त्याला इंग्रजांची आणि त्यांच्या दोस्तांची फौज आढळली. ते ज्या जागीं उतरले होते तेथें त्यांच्यावर हल्ला करणें अगदीं सोपें होतें. त्यांनीं उतरण्याला पसंत केलेली ती जागा खरोखर पहातां इतकी वाइट होती कीं त्यांवर हल्ला सहज करतां येता इतकेंच नव्हे, तर **चंदासाहेबा**चें जें मोठें सैन्य होतें त्याच्या साहाय्यानें त्यांचा **त्रिचनापल्ली**ला जाण्याचा मार्ग अगदीं बंद करून टाकतां आला असता. परंतु सुदैवानें त्याला अशी उत्कृष्ट संधी आणून दिली असूनही आपलें इष्ट कार्य चट्कर साधून घेण्याचें सोडून देऊन तो पुनः रेंगाळत बसला. इंग्रजांच्या छावणीपासून जवळच त्यानें तळ दिला आणि त्यांनां कसें तरी जागा

सोडायाला लावून तेथून उठवावें ह्या उद्योगाला लागला. तों त्याचा यत्न बराच सिद्धीस गेला. दुसऱ्या दिवशीं त्यांची एक टोळी तेथून निघाली. तिला अकस्मात् गांठण्याकरितां त्यानें आपली फौज छपवून बसविली होती तिच्या आटोक्यांत ती येतांच तिजवर तुटून पडून त्यानें तिचा बराच नाश केला. एवढ्या जयानें स्फुरण येऊन आतां उद्यां **चंदासाहेबा**च्या फौजेसह मोठा हल्ला करावयाचा असा त्यानें बेत ठरविला. मग उभयतांच्या विचारें असें ठरलें कीं, **चंदासाहेबा**नें आपले स्वार घेऊन पुढें व्हावें आणि हल्ला करावा इतक्यांत फ्रेंच पायदळानें मागोमाग यावें आणि दुजोरा देऊन शत्रूचा पुरा पराजय करावा. जय मिळवण्याची ही तजवीज कांहीं वाईट नव्हती. संधी उत्तम होती आणि साधारणतः जपावयाचें तेवढें जपून नीट वेळ साधली असती तर **बोलकों-ड्या**च्या प्रसंगानंतर आळसांत वेळ घालवल्यानें जें नुकसान झालें होतें तें सारें आतां भरून आलें असतें. परंतु नशिबाचा खेळ कांहीं विचित्र असतो. भवितव्य कांहीं चुकत नाहीं, एवढें खरें आहे. त्यामुळें असें झालें कीं, **चंदासाहेबा**नें हल्ला केला, तेव्हां त्याच्या पाठोपाठ फ्रेंच पायदळ जाऊन पोहोंचावयाचें तें कांहीं पोहोंचलें नाहीं. याचें कारण त्यानें घाई केली कीं त्यांनीं उशीर लावला हें समजत नाहीं. काय असेल तें असो. **डी. जिंजेन**नें **चंदासाहेबा**चा हल्ला परतवून त्याला धुडकावून उधळून लावलें. तरी पण एवढें झालें कीं, ही जागा कांहीं बरी नाहीं, येथें राहून आपला निभाव लागणार नाहीं, अशी त्याची खात्री झाली. येथून हाललें पाहिजे असें दिसतांच **डी. जिंजन**नें त्याच रात्रीं तळ उठवून कूच केलें. पुढें मध्यें कोठेंही न थांबतां बारा तास सारखी वाट चालून अखेर त्यानें **कोलरून** नदीचें तीर गांठलें. तेथून पलीकडच्या बाजूस समूरच **त्रिचनापल्ली** होती.

परंतु ह्या खेपेस **दोतय** हुशार होता. **डी जिंजेन उतातूर** येथील आपली छावणी उठवून निघून गेला हें पाहून त्याच्यामागून सहा तासांनीं फ्रेंच आणि त्यांचे स्नेही नवाब साहेब त्यांच्या पाठीवर निघाले. तेही त्याच्याच सारखी मोठी मजल मारून त्याच दिवशीं सायंकाळीं आठ वाजतां त्याच्यापासून तीन मैल आलीकडे उतरले. तेव्हां इंग्रजी सैन्यावर मोठें संकट आलें. **चंदासाहेबा**ची फौज दर पावलाला वाढत चालली आणि सभोंतालचा सारा मुलूख त्याला आपला

नबाब म्हणूं लागून सामील झाला. **डी जिंजेन** त्याच्यापासून सारा तीन मैलांवर होता. त्याच्याजवळची फौज त्याच्यापेक्षां फारच कमी असून तिचे हातपाय अगदीं गळले होते. तो नदीतीरावर होता खरा, परंतु चटकर नदी उतरून दक्षिणबाजूस पार होईन असें मात्र त्याला म्हणतां येण्यासारखें नव्हतें, कारण नदीला उतार नव्हता: शिवाय शत्रु मनांत आणतील तर जरासा वळसा घेऊन जाऊन त्यांनां किल्ल्याच्या आणि आपल्यामध्यें जाऊन बसून तिकडे जाण्याचा मार्ग अजून अडवून धरतां येईल ही भीति होती. अशा संकटावस्थेंत एक रात्रही रहावयाचें नाहीं असा त्यानें अगदीं निर्धार केला. आतां हल्ला आला असतां आपला निभाव लागणें कठीण हें तर खरेंच, परंतु **दोतय**च्या मागल्या वर्तनावरून पहातां तो बहुधा हल्ला करणार नाहीं असा आपल्या मनाला धीर देऊन त्यानें नावा जमा केल्या आणि सूर्योदय झाला नाहीं तों रातोरात नदी उतरून पलीकडे **श्रीरंगम** बेटावर जाऊन आतां सुटलों म्हटलें. **त्रिचनापल्ली**च्या पश्चिमेस सुमारें ११ मैलांवर **कोलरून** आणि **कावेरी** ह्या नद्यांच्या दोन शाखा दोहींकडून जाऊन त्यांच्यामध्यें १४ मैल लांब आणि २ मैल रुंद एवढा जो प्रदेश सांपडलेला आहे त्याला **श्रीरंगम** बेट म्हणतात. **डी जिंजेन** नदी उतरून ह्या बेटावर आला परंतु त्याला तेंही स्थान निर्भयसें वाटेना. कारण फ्रेंचांनीं त्याचा पाठलाग करीत मागोमाग येण्याकरितां निघण्याची तयारी चालविलेली त्याला दिसली होती. म्हणून दुसऱ्या दिवशीं रात्रीं तो **कावेरी** उतरून पलीकडे गेला आणि **त्रिचनापल्ली**च्या किल्ल्याच्या तटाखालीं छावणी देऊन बसला. **दोतय** त्याच्या मागोमाग आला तो लगेच तें बेट कबजांत घेऊन बसला आणि तेथून तोफा लावून किल्ल्यावर गोळे टाकूं लागला. परंतु मध्यें अंतर फार, अडीच मैलांहूनही अधिक, असल्यानें कांहीं कटाव चालेना म्हणून त्याला तो यत्न सोडून द्यावा लागला. मग तोही पुढें सरकून **कावेरी** उतरला आणि किल्ल्याच्या खडकाच्या पूर्वेस पावणेदोन मैलांवर जो खडक आहे त्याच्या पुढें तळ देऊन बसला ह्या खडकाला French Rock **फ्रेंच रॉक** असें म्हणतात. इंग्रज अगदीं हतवीर्य आणि निराश होऊन गेले होते, त्यांच्यांत कांहीं त्राण उरलें नव्हतें. **दोतय**नें किल्ला घेण्याची मोठी जारीची तयारी चालविली. आपल्याला जय टेवल्यासारखा आहे अशी त्याला अगदीं खात्री वाटत होती. परंतु मला

सोडवायाला कोणी तरी पाठवा अशी त्यानें **ड्युप्ली**कडे वारंवार विनंती केली होती, ती मनास आणून त्यानें **लॉ ऑफ लॉरिस्टन** याची रवानगी केली होती; तो त्याच समयास येऊन पोहोंचल्यानें त्याजकडे सर्व अधिकार सोंपवून **दोतय** मोकळा झाला. **पाँदीशरी**ला वेढा पडला होता तेव्हां **लॉनें** चांगला पराक्रम केला असल्यानें त्याचें नांव झालें होतें. तो प्रकृति सुधारण्याकरितां स्वदेशाला गेलेला नुकताच परत आला होता. प्रकृति उत्तम होऊन अंगांत शक्ति आणि उत्साह चांगला आलेला होता. त्यानें हा वेळपर्यंत रणांगणीं सेनापति म्हणून प्रमुखत्वानें काम केलेलें नव्हतें. त्याची ती परीक्षा व्हावयाची होती. परंतु सेना-पतीच्या हाताखालीं असतां त्यानें उत्तमप्रकारें काम केलेलें असल्यामुळें त्याचा लौकिक होऊन सेनाधीशपदाची प्राप्ति होऊन अंगावर जबाबदारी पडली तर तो ती चांगल्याप्रकारें संभाळील असा लोकांनां त्याचा मोठा भरंवसा वाटत होता. परंतु तो निवळ भ्रमाचा भोंपळा होता. मुख्य सेनापति आणि त्याच्या हाता-खालचा हुकूम बजावणारा अम्मलदार ह्या दोन मूर्ति अगदीं निराळ्या असतात, तसे त्यांच्या अंगीं त्या त्या कामाच्या निभावणीला अगदीं भिन्न भिन्न प्रकारचे गुण हवे लागत असतात. सेनाधीश म्हटला म्हणजे तो शांत, जबाबदारीला अगदीं न भिणारा आणि तत्काळ विचार करून त्याप्रमाणें हातानें कृत्य करणारा असला पाहिजे. त्याच्या हाताखालीं काम करणारा जो पुरुष असतो तो फक्त शूर, वरिष्ठाचे बेत, उद्देश ( designs ) सिद्धीस नेण्याला अगदीं तत्पर आणि आपल्याला जो हुकूम होत आहे याचा रोंख काय असावा हें ध्यानांत येण्यापुरता बुद्धिमान असला म्हणजे पुरे आहे. **लॉ** अशा प्रकारचा म्हणजे हाताखालीं काम करण्याच्या जागेवर नेमण्याला अगदीं लायक, उत्कृष्ट होता. परंतु वरिष्ठपदीं, म्हणजे मुख्य सेनापति म्हणून अधिकार चालविण्याला नेमण्याला **ड्युप्ली**च्या पदरीं जितके नोकर होऊन गेले त्या सर्वांत त्याच्या इतका नालायक दुसरा कोणीच नव्हता. तो संशयखोर, एकादें काम पुढें आलें तर हें करावें कीं न करावें म्हणत बसणारा, मनाचा निश्चयी नव्हे, डळमळणारा आणि अंगावर जबाबदारी घेण्याला भिणारा, असला मनुष्य होता. सेनापतिपदारूढ होतांच वेढा देऊन किल्ल्यावर हल्ला करण्याचें सोडून आधीं **त्रिचनापल्ली**चा वेढा भारी करून तो जिकडे तिकडे नाकेबंदी करून बसला.

**कॉरोमांडेल** किनाऱ्यापासून **त्रिचनापल्ली**ला येण्याचे जितके म्हणून मार्ग होते तितके सर्व त्याला अडवून धरतां येत असल्यानें ही युक्ति बरी आहे, शत्रूला किल्ल्यांतून हुसकून काढून हांकून लावीत बसण्यापेक्षां हिच्या योगानें त्याचा कोंडमारा करून अन्नान्नगत करणें पुष्कळ सुलभ आहे, असें त्याला वाटलें.

नित्याप्रमाणें सारे व्यवहार सुरळीत चाललेले असते म्हणजे **लॉ**ची ही विचारसरणी आणि हा कोटिक्रम चांगला लागू पडला असता. परंतु लढाईच्या प्रसंगीं सेनापतीनें कालाची गती ही मनांत आणली पाहिजे. **लॉ**नें समजून उमजून आतां जो मार्ग स्वीकारला त्यानें त्याचें इष्टकार्य साधलें असतें, नाहीं असें नाहीं; परंतु त्याला कितीएक महिने लागले असते; आणि तितक्या अवधींत दुसऱ्या अशा कांहीं गोष्टी घडल्या असत्या कीं त्यांमुळें त्याचा सारा अंदाज चुकून भलतेंच कांहीं तरी घडतें. हें कांहीं त्याच्या ध्यानांत आलें नाहीं, परंतु ह्या प्रसंगीं अखेर तसेंच झालें. **वोलकोंड्याला** जें इंग्रजांचें लष्कर गेलें होतें त्याच्याबरोबर एक तरुण अम्मलदार कोठनीस ( commissary ) म्हणून गेलेला होता. तो कंपनीच्या पदरीं कारकून असून आपण होऊन लष्करी खात्यांत शिरला होता. त्यानें आपल्या अंगांत पाणी आहे असें पूर्वींच दाखविलें होतें. **वोलकोंड्यावर** हल्ला झाला त्या प्रसंगीं **डी जिंजेन**चें सेनानायकत्व काय आहे तें पाहून त्याला त्याचा अगदीं वीट आला. लढाई कशाप्रकारें चालवावी याविषयीं त्याचे विचार अगदीं निराळे होते. आतां चालू आहे ह्याच प्रकारानें जर पुढेंही हें युद्ध चालेल तर ह्यांत पराजय हा हटकून ठेवल्यासारखा येणार असें भविष्य करून **कोलरुन** नदी गांठण्यापूर्वींच तो त्या लष्करांतून बाहेर पडला आणि आपले काय विचार आहेत ते **सॉण्डर्स** साहेबाला सांगावे, आपले बेत त्याला कळवावे म्हणून **फोर्ट सेंट डेव्हिड**कडे चालता झाला. ह्या तरुण कारकुनाचें, कोठनिसाचें, नांव **रॉबर्ट क्लाइव्ह**.



# भाग ८ वा.

## रॉबर्ट क्लाइव्ह.

**रॉबर्ट क्लाइव्ह** हा मध्यम वर्गांतील तरुण इंग्रज इसवी सन १७२५ मध्यें जन्मलेला होता. तो लहानपणापासून हूड असून मोठा होऊन वयांत आला तेव्हां कोणाच्याही कह्यांत न वागणारा, अगदीं अनावर आहे, असें पाहून त्याच्या आप्तइष्टांनीं त्याला **ईस्ट इंडिया कंपनी**च्या नोकरींत अडकवून टाकण्याचें मनांत आणलें आणि त्याच्याकरितां कारकुनाची जागा मिळवून सन १७४३ मध्यें त्याला गलबतावर चढवून मद्रासेकडे रवानगी करून दिली. मद्रासेस असतांना त्यानें जो काय लौकीक मिळविला तो एवढाच कीं, ही मूर्ति खिन्नवदन, उदास, कोणाशींही मिळून असणारी नव्हे, गर्विष्ठ आणि उद्धट अशी आहे. एकदां तर तो आपल्या वरिष्ठांशीं फारच उद्दामपणानें वागल्यामुळें त्याला त्यांनीं क्षमा मागावयाला लाविलें. दुसऱ्या एका प्रसंगीं तो आपल्या जिवावर उठून आत्महत्या करीत होता, परंतु नशीब बलवत्तर असल्यानें बार उडाला नाहीं. **द्ला बूर्दोननें मद्रासवर** हल्ला केला त्यापूर्वीं एक मनुष्य शिवाय करून कोणाशींही त्याचा स्नेह जमलेला असल्याचें आढळत नाहीं. तो एक स्नेही तेथचा गव्हरनर **मिस्टर मोर्स** हा होता. आपण पूर्ववयांत कांहीं विद्याभ्यास केला नाहीं ही चूक केली आहे असें **क्लाइव्ह**ला वाटून त्याच्या मनाला ती गोष्ट लागली असावी असें दिसतें. गव्हरनर साहेबाशीं सहवास झाल्यानें आपल्या अंगांतला तो दोष काढून टाकण्याचा यत्न करण्याचें त्यानें मनांत आणलें. त्या गृहस्थाजवळ पुस्तकसंग्रह मोठा होता त्याचा यथेच्छ उपयोग करण्यास त्यानें त्याला आनंदानें मोकळिक दिली.

जेव्हां **मद्रास** फ्रेंचांच्या स्वाधीन झाली तेव्हां **क्लाइव्ह** वेषांतर करून तेथून पळून **फोर्ट सेंट डेव्हिड**ला गेला होता. पुढें कांहीं दिवसांनीं **बोस्कावेन**नें **पाँदीशरी**ला वेढा घातला तेव्हां तो आपण होऊन लष्करी स्वयंसेवक ( volunteer ) म्हणून त्या वेढा घालणाऱ्या फौजेबरोबर गेला. त्या वेळीं

त्यानें काम कसें केलें तें पाहून एका असामीनें असें म्हटलें आहे—' त्यानें ह्या-समयीं जी कर्तबगारी दाखविली तीवरून त्याच्या अंगांत उत्तमप्रकारचें क्षात्रतेज ( military spirit ) चमकत असावें असें प्रथमतःच निदर्शनास आलें. पुढें त्यानें जे अनेक पराक्रम केले ते ह्याच तेजाचा प्रभाव होत. ' पुढें सन १७४९ मध्यें **देवीकोट** किल्ल्यावर हल्ला झाला तेव्हां तो **मेजर स्ट्रिंगर लॉरेन्स** ह्याच्याबरोबर स्वयंसेवक म्हणूनच गेला; आणि हल्ला करणाऱ्या टोळीचा नायक होऊन आपल्या शांतपणाबद्दल आणि निर्धास्तपणाबद्दल प्रसिद्धीस आला. **मेजर लॉरेन्स** हा स्वतः मोठा हुशार आणि नांवालौकिकाचा शिपाई म्हणून गाजलेला मनुष्य होता; त्यानें आपल्या त्या हाताखालच्या मनुष्याबद्दल असें लिहिलें आहे—हा अढळ निश्चयाचा, थंड स्वभावाचा आणि अतिशय मोठ्या संकटांत देखील न सुटणाऱ्या प्रसंगावधानाचा, असा मनुष्य आहे. हा उपजतःच शिपाई आहे असें म्हटलें पाहिजे. कारण कोणत्याही प्रकारचें कांहीं एक लष्करी शिक्षण नसतां, किंवा लष्करी पेशाच्या कोणा मनुष्याजवळ फारसें संभाषण केलें नसतां, केवळ आपल्या समजाच्या व अकलेच्या जोरावर त्यानें एखाद्या अनु-भवलेल्या अम्मलदाराप्रमाणें सैन्य चालविलें आणि तें अशा शहाणपणानें कीं, त्याला जयप्राप्ति झाल्याशिवाय रहाणारच नाहीं. **देवीकोट** किल्ल्याच्या वेढ्याच्या वेळीं आणि त्याचप्रमाणें त्यानंतरही ह्या तरुण मनुष्याची लहानपणींच जी विलक्षण बुद्धि ( early genius ) दिसली ती पाहून मला आश्चर्य वाटलें, आणि माझें लक्ष तिकडे वेधलें. त्या किल्ल्याच्या वेढ्याच्या वेळीं त्यानें जें धैर्य आणि शहाणपण दाखविलें तें खरोखर त्याच्या वयाच्या मानानें पहातां फार भलतीकडे होतें. पुढें त्याला जी जयप्राप्ति होत गेली तीवरून त्याच्याविषयीं मी पुष्कळ लोकांजवळ जें बोललों होतों तें खरें ठरलें.

**देवीकोट** येथें **क्लाइव्हनें** जें शौर्य दाखविलें त्याच्यायोगानें त्याची मुलकी खात्यांतून कंपनीच्या लष्करी खात्याकडे बदली झाली; आणि लष्करच्या कोठनिसाची जागा मिळाली. ह्या नेमणुकीनंतर अगदीं थोड्या दिवसांनीं त्याची प्रकृति बिघडल्यामुळें ती सुधारण्याकरितां त्याला जलपर्यटण करावें लागलें; तेव्हां तो **हुगळी**ला गेला. तेथून सन १७५१ च्या हिवाळ्यांत परत आल्यावर **डी जिंजेन**च्या हाताखालीं जी फौज **चंदासाहेबा**च्या आणि फ्रेंचांच्या

पालथीवर रहाण्याकरितां रवाना झाली तिजबरोबर कोठनीस म्हणून जाण्याचा त्याला हूकूम झाला. **जिंजेन**नें काय काय पराक्रम केले तें मागच्या भागांत सांगितलेंच आहे.

**क्लाइव्ह** हा **डी जिंजेन**च्या सैन्याबरोबर फक्त कोठनीस असल्यानें युद्ध कशाप्रकारें चालवावें ह्याविषयीं त्याला कांहीं कोणी विचारीत नव्हतें आणि त्याच्या शब्दाला कांहीं किंमतही नव्हती. परंतु चालू पद्धत सोडून देऊन अगदीं निराळ्या रीतीनें युद्ध चालविलें पाहिजे असें त्याला वाटत होतें म्हणून त्याचीं कारणें काय आहेत तें **फोर्ट सेंट डेव्हिड**च्या किल्लेदाराला सांगावें एवढ्या-करितां तो आपलें काम सोडून तेथून निघून गेला. ह्यावरून त्याला त्या सेनापतीचें करणें अगदीं नापसंत होतें हें उघड दिसतें.

**फोर्ट सेंट डेव्हिड**चा किल्लेदार ( Governor ) मिस्टर **सॉण्डर्स** हा **स्ट्रिंगर लॉरेन्स**चा योग्य जोडीदार होता. त्यानें **क्लाइव्ह**चें म्हणणें नीट ऐकून घेतलें. त्याला त्यानें जो आपला बेत सांगितला तो अगदीं पसंत पडला. सन १७५१ च्या वर्षाकाळीं जो तरुण कोठनीस आपण मनांत आणलेले डाव कसे आहेत आणि ते नीट जपून खेळलें असतां **ड्युप्ली**च्या सर्व मनोरथांचा कसा चुराडा होऊन जाईल हें समजाऊन देत होता त्याच्या कीर्तीच्या प्रकाशा-पुढें त्या किल्लेदाराचा नांवलौकिक अगदीं लोपून गेला हें खरें आहे; तथापि तो ज्या मध्यम वर्गांतल्या पहिल्या प्रतीच्या हुशार लोकांनीं इंग्लंडला हिंदुस्थानचें एवढें थोरलें राज्य संपादन करून दिलें त्यांपैकींच होता हें कांहीं खोटें नाहीं. त्याच्यापेक्षां कमी योग्यतेच्या दुसऱ्या कोणी मनुष्यानें तें कोठनिसाचें म्हणणें ऐकून घेऊन मान डोलविली नसती. शेंकडों लोक तर साफ असें बोलले आहेत कीं आम्ही त्याचे ते बेत कधीं मान्य केले नसते; कारण त्या कामीं तशाच जबर अडचणी होत्या. **सॉण्डर्स** साहेबाजवळ **फोर्ट सेंट डेव्हिड**मध्यें शिपाईही नव्हते आणि अम्मलदारही नव्हते. त्याची मुख्य फौज **त्रिचनापल्लीं**त कोंडून पडली होती. तिला मोठ्या प्रबळ शत्रूनें बाहेरून घेरून जखडून टाकलें होतें आणि तिची अन्नान्नगत करून तिला भयंकर उपासमारानें यमसदनाचा मार्ग पहावयास लाविलें असावें असें वाटत होतें; तसें अद्याप झालें नसल्यास लौ-करच होईल अशी त्यास धास्ती पडली होती. अशा समयीं इंग्लंडाहून जर

कांहीं थोडीबहुत फौज येऊन दाखल होईल तर ती त्या किल्ल्यांत कोंडून पडलेल्या, त्राहि त्राहि म्हणत असलेल्या लोकांच्या तोंडांत घांस घालण्याकरितां अन्नसामग्री बरोबर देऊन तिकडे पाठविणें अगदीं अवश्य, फार जरूर होतें. अशा ह्या ऐन समयास इंग्लंडहून थोडेसे लोक आले. तेवढेच म्हणजे सारे ८० आणि ३०० शिपाई यांच्याबरोबर सामानसुमान देऊन त्यांची **सॉण्डर्स** साहेबानें त्रिचनापल्लीस रवानगी केली; त्यांच्यामागून दुसरी एक टोळी **क्याप्टन क्लार्क** याचे हाताखालीं देऊन पाठविली. तिच्याबरोबर **क्लाइव्ह** ह्यालाही पाठविलें. त्या दोन्ही टोळ्या फ्रेंचांचा डोळा चुकवून त्रिचनापल्ली किल्ल्यांत शिरल्या. **क्लाइव्ह**च्या मनांत जे विचारतरंग उठत होते ते त्याचा किल्ल्यांत प्रवेश होऊन तेथची स्थिति प्रत्यक्ष पहावयास मिळाल्यानें ठाम होऊन बसले. किल्ल्यांतील शिबंदीचे लोकांची अगदीं निकृष्ट अवस्था झाली आहे, ते अगदीं निराश झालेले आहेत, आपल्याला सोडवावयाला कोणी येईल असें त्यांना मुळींच वाटत नाहीं आणि ते शत्रूच्या स्वाधीन होण्याला अगदीं सिद्ध झाले आहेत, असें त्याला दिसलें. **फोर्ट सेंट डेव्हिडहून त्रिचनापल्लीस** येण्यास निघण्यापूर्वीं नुक्तीच त्याची लष्करी खात्यांत नेमणूक होऊन त्याला **क्याप्टन** हा हुद्दा मिळाला होता. असल्या ह्या, मुलकी खात्यांतून काल बाहेर पडलेल्या आणि आज अम्मलदार झालेल्या माणसाचें तेथच्या सेनाध्यक्षांजवळ कांहींच वजन नव्हतें. त्याच्या शब्दाला कांहींच किम्मत नव्हती. आतां असा डाव करावा आणि तसा पेंच करावा इत्यादि लष्करी बातबेताच्या गोष्टी जेव्हां तो सांगूं लागला तेव्हां त्या कारकून गड्याला काय कळतें आहे म्हणून ते सारे शिपाईबहादर त्याला अगदीं तुच्छ करून त्याचा तिरस्कार करूं लागले. मग तेथें थोडेच दिवस मुक्काम करून तो निघाला आणि **फोर्ट सेंट डेव्हिड** येथें परत आला. आतां इंग्लिशांचा निभाव लागण्याला एकच तरणोपाय आहे, तो **सॉण्डर्स**साहेबाला पूर्वींपेक्षां अधिक खुलाशानें समजून सांगून त्याच्या मनांत चांगला भरून द्यावा ह्या उद्देशानें तो त्याला भेटण्याला गेला.

**सॉण्डर्स** साहेबानें आपल्या त्या तरुण सल्लागाराचा युक्तिवाद ऐकून त्यांत पुष्कळ तथ्यांश आहे असें पूर्वींच कबूल केलें होतें. **क्लाइव्ह** त्याला प्रथम भेटला तेव्हां त्याच्या म्हणण्याप्रमाणें करण्याला त्याच्याजवळ कांहीं साधन नव्हतें. परंतु

आतांच्या ह्या दुसऱ्या भेटीच्या वेळीं तसें नव्हतें; मनुष्यांची भरती झाली होती. तें पाहून **क्लाइव्हला** आनंद झाला. **मद्रासच्या** आणि तेथच्या ठाण्यांत जम लेले सारे गोरे शिपाई मोजले तर ३५० ची भरती होती. त्यांपैकीं कांहीं **सॉण्डर्सला** आपल्या किल्ल्याच्या बंदोबस्ताकरितां ठेवून घेतलेच पाहिजे होते. बाकीचे बाहेरच्या कामगिरीवर पाठविण्यास मोकळे होते. परंतु असे पाठवावे का हा मोठा कठीण प्रश्न त्याच्यापुढें येऊन पडला. कारण तो स्वतः लष्करी खात्यांतला अम्मलदार नव्हता. तो पडला मुलकी कामगार आणि ज्याच्या ताब्यांत आपले लोक देऊन १५ लक्ष लोकवस्तीच्या प्रांतावर हल्ला करण्याकरितां त्याला जा म्हणावयाचें तो मनुष्य अगदीं तरुण असून त्याला लढाईची कांहीं माहिती नाहीं, लष्करी शिक्षण नाहीं, असला होता. म्हणून त्या कृत्यास प्रवृत्त होणें म्हणजे आपल्या अंगावर फारच मोठी जबाबदारी घ्यावयाची होती. परंतु शाबास त्याची. ती घेण्यास तो कचरला नाहीं. तेणेंकरून त्याचें नांव चिरकाल राहील असें झालें आणि त्याच्या देशाला चिरकाल उपभोगतां येई असा लाभ झाला. मग त्याच्या हुकुमानें २०० गोरे इंग्रज आणि ३०० काळे एतद्देशीय शिपाई आणि ३ तीन लहान तोफा बरोबर घेऊन तारीख २६ आगस्ट सन १७५१ रोजीं **क्लाइव्ह** साहेबाची स्वारी **उत्तर अर्काट** प्रांतावर स्वारी करण्यांकरितां **मद्रासहून** निघाली.

**क्लाइव्हनें** जी आश्चर्य करण्यासारखी **अर्काटपर्यंत** मजल मारली तिचें येथें सविस्तर वर्णन करूं लागलें असतां अगदीं अप्रासंगिक होईल म्हणून तें सोडून देऊं. येथें येवढें सांगितलें म्हणजे पुरे आहे कीं त्यानें मोठ्या धाडसानें आपल्या मनाशीं जे एक एक बेत योजले होते ते सारे अगदीं अक्षरशः तडीस नेले कर्नाटकची राजधानी जें **अर्काट** शहर तें त्यानें एकदम घेतलें आणि त्याच्याजवळ जें गोरें काळें मिळून एवढेंसें सैन्य होतें त्याच्या कित्येकपट मोठ्या सैन्यानें जरी त्याला घेरलें होतें तरी पन्नास दिवसपर्यंत त्याचें रक्षण केलें. तेवढ्यानें कृतकार्य झालों असें मनांत न आणतां वेढा उठला असें दिसतांच तो किल्ल्यांतून अकस्मात बाहेर पडला आणि तेथून निघून गेलेल्या त्या शत्रूंच्या पाठीस लागला. त्यांना त्यानें **आर्नी** येथें गांठून त्यांच्यावर हल्ला करून त्यांचा अगदीं पराभव केला. हा जो त्यानें पराक्रम केला त्याचें फळ साऱ्या दक्षिण हिंदुस्थानांत दिसूं लागलें. याम-

माणें शत्रूंनां चांगलाच हात दाखवून तो **मद्रासवरून फोर्ट सेंट डेव्हिड** येथें परत गेला. आतां पुढें काय करावें हें **सॉण्डर्स**च्या विचारें त्याला ठरवावयाचें होतें.

त्या तरुण इंग्रज गड्यानें याप्रमाणें जो तडाका दिला तो किती जोराचा, अगदीं कंबर मोडेसा होता, हें जसें **ड्युप्ले**च्या तीव्र बुद्धीला दिसलें तसें दुसऱ्या कोणा एकाच्याही लक्षांत आलें नाहीं. परंतु त्या थोर कीर्तिमान पुरुषाचा हा तर मोठा विलक्षण गुण होता कीं, संकट प्राप्त झालें असतां तो कधीं घाबरत नसे, उलटें त्याला स्फुरण येत असे आणि कांहीं तरी हिमतीचें कृत्य तो करी. **क्लाइव्ह**प्रमाणें तोही पुढचें धोरण अगदीं बिनचूक बांधीत असे. **क्लाइव्ह**नें **अर्काट**वर मध्येंच हल्ला केला तेव्हां त्याचा खरा अंतस्थ हेतु काय असावा तें त्यानें पूर्णपणें ओळखून **चंदासाहेबा**नें अर्काट परत घेण्याकरितां जी फौज पाठविली तिच्या मदतीला शंभर फ्रेंच शिपाई पाठवून दिले; आणि इकडे **त्रिचनापल्ली**पुढें **लॉ** जाऊन बसलेला होता त्याच्या मदतीला त्याच वेळेस जेवढे फ्रेंच सोलजर्स मोकळे करून पाठवितां आले तेवढे सारे, नुकतेच नवीन ठेविलेले शिकणाउसुद्धां, आणि जेवढे कवाईत शिकलेले शिपाई त्याच्याजवळ होते तेवढे सारे पाठवून दिले. त्याला असें वाटत होतें कीं, **अर्काट**च्या वेढ्याला पाठविलेली फौज **क्लाइव्ह**ला आणि त्याच्याबरोबरच्या लोकांनां तेथेंच कोंडून धरून बसली राहील, बाहेर पडूं देणार नाहीं; तो तेथें अडकलेला आहे तों **लॉ त्रिचनापल्ली**वर निकराचा मारा करून तो किल्ला घेईल. त्याच्याजवळच्या फौजेंत भर पडून आतां गोरे फ्रेंच ९०० आणि कवाईत शिकलेले शिपाई २००० झाले होते. नवाबाच्या सैन्यांत ही भर पडून त्याच्याजवळ आतां ३०००० लोक झाले होते. इतकें मोठें मनुष्यबळ असल्यावर कोणाही निश्चयी शिपायाला तेवढा किल्ला घेणें कांहीं अशक्य नव्हतें. परंतु **लॉ**च्या हातून तें कांहीं होईना. तो हल्ला करण्याची तयारी वगैरे मोठा आविर्भाव आणून बाह्यात्कारीं मोठा डौल दाखवी, परंतु नुसती नाकेबंदी करून बसावयाचें हा जो त्यानें पहिल्यापासून एक उपाय योजला होता त्याच्यापलीकडे तो एका काडीइतका देखील सरकला नाहीं. तो मंत्रीसभेंत बोलण्यांत मोठा धीट होता परंतु जातीचा भित्रा, संशयखोर आणि धाडस न करणारा असून रणांगणीं दुसरा

कोणी धाडसानें पुढें सरसावूं लागला तर त्याला धरून मागें ओढणारा होता. तो असा कालक्षेप करीत आहे तों इतक्यांत **महंमद अल्ली**च्या मदतीला म्हैसूरची फौज आली, तेणेंकरून किल्ल्यांतील लोकांनां धीर आला. मग त्यांनीं जरा जरा बाहेर पडून फ्रेंचांच्या थोड्याशा चौक्या मारल्या. एवढी फत्ते होण्याबरोबर त्यांनां चांगलीच हिम्मत आली आणि ते आतां सारेमिळून फ्रेंचांवर एकदम हल्ला करावयाचा असल्या गोष्टी बोलूं लागले. परंतु **डी जिंजेन** कांहीं तसल्या भानगडींत पडला नाहीं. त्यानें एवढेंच केलें कीं, **क्याप्टन कोप**बरोबर एक टोळी देऊन **त्रिचनापल्ली**पासून सुमारें तीस मैलांवर **कृष्णावरम** म्हणून एक लहानसें ठाणें होतें तें आलीकडे फ्रेंचांनीं आणि नबाबाच्या लोकांनीं बळकावलें होतें तेवढें माघारें घ्यावें असा बेत करून त्याला तिकडे पाठविलें. परंतु त्याचा तो यत्न कांहीं सिद्धीस गेला नाहीं. त्या ठाण्यांतल्या लोकांनीं त्या चालून गेलेल्या इंग्रजांची आणि शिपायांची त्रेधा उडवून दिली. त्याचा नायक **कोप** असाध्य जखम लागून पडला.

असें झालें तेव्हां **लॉ**ला पुनः जरा ग्रह अनुकूल आले आहेत असें दिसलें. तो मनाचा निर्धार करून थोडेंसें साहस करण्याला सिद्ध झाला असता तर तेवढें पुरें होतें. त्याला मनुष्यबळ मोठें असल्यानें जय आल्यावांचून बहुधा राहिला नसता. हीच मुख्य गोष्ट मनांत आणून **ड्युप्ले**नें त्याला तसें करण्याविषयीं सांगून पाठविलें; प्रथम आर्जवाचे निरोप पाठविले, ते व्यर्थ दिसले तेव्हां हुकूम पाठविले. त्यानें त्याला असें सांगितलें कीं, लढाईच्या कामांत एकदा संधी आलेली घालविली असतां ती पुनः आली असें सहसा कधीं घडत नसतें; **कृष्णावरम** येथें शत्रूचा मोड होऊन धांदल उडाली होती तीच त्यांच्यावर तुटून पडण्याची खरी वेळ होती आणि जयप्राप्तीचा तेवढाच खरा मार्ग होता. **ड्युप्ले**नें हुकूम पाठविल्यावर देखील बराच वेळ हल्ला करावा कीं न करावा अशा संशयांत घालवून **लॉ** तो करण्याला कबूल झाला, अथवा झाल्यासारखा दिसला. त्यानें कांहीं लोक अघाडीस उभे केले आणि आतां हल्ला करणार असा आव घातला. परंतु त्या भित्र्या माणसाच्या हातून तो कसा व्हावा ! त्याला ती फार मोठी जबाबदारी वाटली आणि एवढें थोरलें अरिष्ट डोक्यावर घेणें बरें न वाटून त्यानें अगदीं ऐन प्रसंगीं पाऊल मागें घेतलें. मग **ड्युप्ले**कडून **पाँदीशरी**हून त्याला

पत्र आलें. त्यांत त्यानें असें लिहिलें होतें कीं, तूं **त्रिचनापल्ली**वर हल्ला कर, कशाला भिऊं नको; **क्लाइव्ह**ची धास्ती धरूं नको. त्याच्याकडून तुला कांहीं उपद्रव पोहोचूं नये म्हणून मी **उत्तर अर्काट** आणि **मद्रास** यांवर स्वारी करण्याचा घाट घालून त्याचें लक्ष इकडे वेधून ठेवीत आहें. त्या थोर गृहस्थानें लॉला हालवण्याकरितां आपल्याकडून इतकी खटपट केली परंतु व्यर्थ, तो जो बैठक मारून बसला होता तो कांहीं केल्या हालेना.

**डुप्लीनें लॉला** जें लिहिलें होतें तें सारें खरें होतें, त्यांत खोटें कांहीं नव्हतें. तो थोर मनुष्य मध्यस्थानीं बसून आसमंतात् चोहींकडे नजर फेंकून दूरवर नीट पहात होता. त्याच्या दृष्टीला कधीं भ्रम पडून भलतेंच दिसत नव्हतें. कोणत्या प्रसंगीं काय केलें पाहिजे हें अगदीं बिनचुक त्याच्या ध्यानांत येत असे. पण काय करील ! विचाऱ्याच्या हाताखालीं त्याच्या सांगण्याप्रमाणें काम करण्याला लायक असे मनुष्य अगदीं थोडे होते. **अर्काट** प्रांतांत **चंदासाहेबा**च्या सैन्याच्या मदतीला त्यानें ४०० फ्रेंच लोक पाठवून दिले. ते सारे मिळून यावेळीं मद्रासच्या आसपासच्या मुलखाला अतिशय उपद्रव देऊन तो अगदीं फस्त करून टाकीत होते. **त्रिचनापल्लीं**त अडकलेल्या लोकांनां सोडवण्याकरितां आपली तिकडे रवानगी होईल असें **क्लाइव्ह**ला वाटत होतें, परंतु तसें झालें नाहीं. ह्या नवीन उठलेल्या काहुरावर नजर ठेवण्याकरितां कांहीं लोक बरोबर घेऊन **मद्रास**ला जावें असा त्याला हुकूम झाला. त्याप्रमाणें निघून तो तेथें जाऊन दाखल झाल्यावर दोन दिवसांनीं बंगाल्यांतून कांहीं सैन्य मदतीला म्हणून येत होतें तेंही येऊन बंदरांत उतरलें. त्यासुद्धां त्याच्याजवळ ३८० गोरे आणि १३०० कवाईत शिकलेले शिपाई इतकी भरती झाली तेव्हां तेवढें सारें सैन्य घेऊन तो तारीख २२ फेब्रुआरी सन १७५२ रोजीं किल्ल्यांतून बाहेर पडून शत्रूंचा समाचार घेण्यास निघाला. त्यांचा जमाव त्याच्यापेक्षां फार मोठा होता. ते ४०० फ्रेंच लोक आणि ४००० एतद्देशीय असे ४४०० असून त्यांपैकीं २५०० घोडेस्वार होते. **क्लाइव्ह** मद्रासेस आला अशी बातमी लागतांच त्यांनीं तो आसपासचा प्रदेश सोडला आणि **अर्काटवर** अकस्मात् जाऊन हल्ला करून तो किल्ला घ्यावा असा बेत करून तिकडे कूच केलें. त्यांचा तो डाव कांहीं साधला नाहीं, यत्न निष्फळ झाला तेव्हां ते माघारे फिरले. **क्लाइव्ह** लौकरच आपला माग काढीत येईल

अशी त्यांची खात्री होती. त्याला हूल दाखवून चांगला फशीं पाडून कचाटांत आणावा असा बेत करून ते **कावेरीपाक** येथें दबा धरून बसले. ती जागा विकट अडचणीची असून **अर्काट**ला जाण्याच्या मार्गावरच असल्यानें **क्लाइव्ह**-ला तेथूनच गेलें पाहिजे होतें. त्यांनीं दुसरा असा अजमास केला होता कीं, **क्लाइव्ह** हा स्वभावतःच साहसी असल्यानें त्याजागीं काळोख पडल्यानंतर येऊन पोहोंचेल. तो त्यांचा अजमास आणि तें भविष्य अगदीं बरोबर उतरलें; त्यांत कांहीं चुकलें नाहीं. **क्लाइव्ह** सांपळ्यांत सांपडला. तो त्या जागीं जाऊन पोहों-चतो तों काळोख पडूं लागला होता. त्यांनीं त्याला अकस्मात् गांठून पुरी त्रेधा उडविली. त्याचा अगदीं पराभव झाल्यासारखाच होता तथापि तो गडबडला नाहीं. थंडपणा आणि धाडस हे जे त्याचे मुख्य गुण होते त्यांच्या जोरावर ज्या काळोखाच्या बळावर शत्रूंनीं आपल्यावर एवढा कठीण प्रसंग आणला त्यांतच त्यांनां हात दाखवावा, त्यांचीं बोटें त्यांच्याच डोळ्यांत घालावीं असें त्यानें मनांत आणलें. शत्रूंनीं जी अगदीं मोठी मजबूद म्हणून निर्धास्त मानलेली जागा, ती या गडबडींत त्यांनीं अगदीं मोकळी टाकली असावी, तेथें कांहीं बंदोबस्त नसावा, ती आपण साधल्यास घ्यावी असा विचार मनांत आणून तो त्या कामास लागला. त्याचा अदमास बरोबर ठरला आणि तें ठिकाण त्याच्या हातीं लागलें. मग काय विचारता ! लागलेंच पारडें फिरलें. तो जो अडचणींत सांपडून जमीनदोस्त होत होता तो उलटा त्या शत्रूंवर तुटून पडला. ह्या प्रसंगीं त्यानें जो जय मिळविला तो अगदीं नांवाजण्यासारखा होता. ह्या **कावेरीपाक**च्या प्रसंगाचा लौकिक झाला आणि तेथच्या जयानें दक्षिण हिंदुस्थानची स्थिति पालटली. **उत्तर अर्काट** प्रांतांतून शत्रु पार नाहींसे झाले. तो अगदीं निष्कंटक झाला आणि **क्लाइ-व्ह**ला **फोर्ट सेंट डेव्हिड**कडे खुशाल जातां आलें. तेथें **त्रिचनापल्ली**चा वेढा उठवण्याकरितां स्वारीची तयारी चालली होती. **स्ट्रिंगर लारेन्स** याची मुख्य सेनापतीच्या जागीं योजना होऊन त्याच्या हाताखालीं **क्लाइव्ह**ची नेमणूक झाली. त्या मोहिमेंत **त्रिचनापल्लीचा** वेढा उठून तो किल्ला इंग्रजांच्या हातीं गेला एवढेंच नव्हे, तर **ड्युप्ले**चे जे मोठमोठे मनोरथ होते ते सर्व भग्न होऊन त्यांत आणि त्याच्या सभोंतालच्या प्रदेशांत त्या मनोरथांचा शेवटच लागला.

**लॉ**च्या ह्या भित्रेपणाचा अखेर परिणाम काय होणार हें त्या दूरदर्शी थोर पुरुषानें अगदीं बरोबर ताडलें होतें. **त्रिचनापल्ली**पुढें बसलेल्या त्या सेनापतीला

त्या किल्ल्यावर हल्ला करून तो घेण्याला पुष्कळ वेळ मिळावा, मागची कांहीं काळजी नसावी, म्हणून त्यानें **उत्तर अर्काट** प्रांतांत धामधूम मांडली. त्याचा डाव उत्तम होता. तो फसला त्याचा त्याच्याकडे कांहीं दोष नव्हता. **कावेरी-पाक**चा प्रसंग म्हणजे केवळ अपघात असें त्याला मानण्याला अगदीं हरकत नव्हती.—नव्हे हक्क होता.—बाबा लढ रे म्हणून **लॉ** ह्यास त्याला समजून सांगतां येत होतें, त्याची विनवणी करतां येत होती, त्याला हुकूम करतां येत होता, परंतु उठवून लढायाला लावतां येत नव्हतें. **लॉ** म्हणजे नामर्द मनुष्य होता असें नाहीं. रणांगणीं पुष्कळ प्रसंगीं त्याचें धैर्य दिसून आलेलें होतें. असें असतां येथें त्याचे हात पाय जे अगदीं गळाठले त्याचें कारण त्याच्या मनानें कच्चर खाल्ली. आपल्या शिरावर जबाबदारी मोठी आहे, हें मोठें भयंकर ओझें आहे असें त्याच्या मनानें घेतलें होतें. रणांगणीं उभा राहून युद्धप्रसंगांत शौर्य दाखवून धैर्याविषयीं खात्री करून दाखवीपर्यंत कोणाही मनुष्याला वीर हें नांव मिळत नाहीं. लढण्यास योग्य आहे एवढेंही कोणी फुकट म्हणत नाहीं. **लॉ** त्या कसोटीस उतरला नव्हता असें नाहीं. परंतु वरिष्ठाच्या हाताखालीं कामें करून दाखवून ज्यानें मोठें नांव मिळविलें होतें तोच हा **लॉ**. आतां एकाद्या पोरापेक्षांही निरुपयोगी इतका नादान ठरला. **डुप्ली**नें मोठ्या भरंवशानें सेना-पति नेमून पाठविलेला हा मनुष्य, तो त्याचा इतका पाठपुरावा करीत असतांही, जेव्हां असा कमकुवत दिसला, तेव्हां त्याला अतिशय दुःख होऊन हृद्रोग लागला. परंतु तो मोठा दमदार पुरुष म्हणून गडबडला नाहीं. दुसरा कोणी तर हातपाय गाळून अगदीं निराश होऊनच बसला असता. **कावेरीपाक**ची लढाई चालली असतांना जो अगदीं स्वस्थ, थंडपणें बसला होता, आणि आतां जो **त्रिचना-पल्ली**कडे तोंड करून सरसा बसलेला असून त्याच्या पाठीशीं इंग्लिशांकडचे जे दोन अगदीं उत्तम सेनापति ते नवी फौज घेऊन येऊन त्याच्यावर हल्ला करणार होते, अशा मनुष्यांशीं गांठ पडल्यावर त्यानें काय करावें ? त्याला **लॉ**ला काढून टाकतां येईना, कारण त्याच्या जागीं दुसरा आणून उभा करायाला कोणी मोकळा नव्हता, **ब्यूस्सी** औरंगाबादेस होता; **दोतय** अजून आजारीच होता. **द ला तूश** समुद्रावर होता. असें होतें तरी अजून देखील **लॉ** हातपाय हालवील तर त्याला जय येईल अशी आशा होती. कारण तो मध्यस्थानीं बसलेला होता;

किनाऱ्याकडून येणाऱ्या रस्त्याचें तें नाक होतें; एतद्देशीय स्नेही मंडळींचें त्याला साहाय्य चांगलें होतें आणि मनुष्यबळ मोठेंच होतें. इतक्या गोष्टी **लॉ**ला अनुकूल होत्या म्हणून असें वाटत होतें कीं अजून जरी तो त्यांचा यथायोग्य उपयोग करून घेईल तरी आजपर्यंत काळ फुकट घालविल्यानें त्याला जो डाग लागला आहे तो धुपून जाईल. **ड्युप्लीनें** त्याला अगदीं तपशीलवार सारी बारीकसारीक माहिती लिहून पाठवून इंग्लिशांचें सैन्य किती, तें कोणत्या मार्गानें जाणार, कधीं जाण्याला निघणार तें कळवून पुढें असें म्हटलें कीं, त्यांना बरोबर सामानसुमान फार घ्यावें लागणार असल्यानें आणि तें संभाळून न्यावें लागणार असल्यानें लहान लहान मजला कराव्या लागतील, मोठा पल्ला झेपणार नाहीं. इतकें सारें सांगून झाल्यावर पुढें त्यानें आणखी असें लिहिलें कीं आतां सांगतों असें कर. ' **त्रिचनापल्ली**च्या किल्ल्यापुढें उगाच बाऊ दिसण्यापुरती थोडी फौज ठेव, बाकीची सारी एका ठिकाणीं गोळा कर आणि ती घेऊन पूर्वेकडे कूच कर; तिकडून इंग्रजांची फौज येत असतांना तिला गांठ, ती तुझ्या फौजेपेक्षां थोडी आहे, तिच्याशीं सामना करून तिचा संहार उडवून दे आणि माघारा फिरून पुनः पूर्वस्थळाला येऊन किल्ल्यावर नेटानें हल्ला करून तो काबीज कर. ' याप्रमाणें **ड्युप्लीनें** लिहिल्याबरहुकूम कामगिरी अगदीं होण्यासारखी होती; मात्र ती करण्यास दुसरा कोणी लायक मनुष्य पाहिजे होता. तो असें असें कर एवढें लिहून स्वस्थ राहिला नाहीं. **कृष्णे**च्या दक्षिणेस असलेले जेवढे म्हणून फ्रेंच शिपाई मिळण्यासारखे होते तेवढे सारे **पॉंडीशरी**स गोळा करून तेथून त्यानें ते **लॉ**च्या मदतीस पाठवून दिले.

**ड्युप्लीनें** **लॉ**ला जें पत्र पाठविलें त्यांतील मजकूर पाहिला म्हणजे त्यावरून त्याचें मुत्सद्दीपणाचें धोरण आणि खऱ्या शिपाईगिरीचें, सेनापतित्वाचें दूरदर्शित्व, हे दोनही गुण चांगलेच दिसून येतात. परंतु उपयोग काय ! उत्तमोत्तम बेत केले आणि ते तडीस नेण्याचें काम जर अयोग्य मनुष्याच्या हातांत दिलें तर तें व्यर्थ जाणारच. या प्रसंगीं तसेंच झालें. **ड्युप्लीनें** **लॉ**ला **त्रिचनापल्ली**पुढें उगाच दर्शनीं थोडेसे लोक ठेवून बाकी सारे घेऊन जाऊन **लॉरेन्स** जें सैन्य घेऊन येत होता त्याचा फडशा पाड असें स्पष्ट लिहिलें होतें. पण त्यानें तें कोठें ऐकिलें ! त्यानें त्याच्या अगदीं उलट केलें. बहुतेक सैन्य किल्ल्यापुढें बसवून

ठेवून उगाच थोडेसें बाहेर पाठविलें. **लॉरेन्स**शीं गांठ घालण्याला त्याचें सारें सैन्य गेलें असतें तरी त्याला देखील जें कर्म दुर्घटसें वाटलें असतें, आणि असा प्रसंग कधीं पाहिला नव्हता असें म्हणावें लागतें तें कर्म त्या मूठभर लोकांच्या हातून होईल असें मनांत तरी कसें यावें ? परंतु तसें त्याच्या मनांत आलें आणि त्याचें फळ ठरल्यासारखें यावयाचें तेंच आलें. तें योग्यच झालें. परंतु पुढें आणखी एक दोन दिवसांनीं आपली फौज जागेवर उभी करून त्यानें **लॉरेन्स**वर हल्ला केला तेव्हांही तसेंच झालें. त्याला कांहीं जय आला नाहीं. त्यानें हल्ला करण्याला जी वेळ काढली ती अयोग्य होती, जी जागा पाहिली ती सोईची नव्हती आणि जी संधी पाहिली तीही भलतीच; असें सारेंच विपरीत होतें. लढाई ही कांहीं चांगल्या प्रकारें झाली नाहीं. अखेर फ्रेंचांनां पराजित होऊन, माघारें फिरून आपल्या खडकावर जावें लागलें. **लॉरेन्स** आणि त्याचें विजयी झालेलें सैन्य आनंदानें ललकारत किल्ल्यांत घुसलें.

**डुप्ले** कशा प्रकारचा मनुष्य होता, दक्षिण हिंदुस्थानांत फ्रेंच लोकांकरितां साम्राज्य स्थापन करावें ह्या इच्छेनें प्रेरित होऊन त्याला तोच एक निदिध्यास कसा लागला होता, तो हेतु सिद्धीस जावा म्हणून स्वतः रणांगणीं शस्त्र घेऊन उभें रहाण्याचें तेवढें खेरीज करून बाकी तो आपल्या हातून होईल तेवढी जिवापाड मेहेनत करून हरएक उपाय योजून काय काय कृत्यें करीत होता आणि कशा कशा तजविजी करीत होता, हें ज्यानें ध्यानांत आणलें असेल त्याला, त्या थोर पुरुषाला त्या दिवशीं घडलेलें वर्तमान समजलें तेव्हां आपल्या सर्व मनोरथराजीचा केवळ **लॉ**च्या अकर्तृत्वामुळें आणि नेभळेपणामुळें भंग झाला असें दिसून आलें तेव्हां केवढा राग आला असेल, त्याच्या अंगाचा किती संताप झाला असेल आणि त्याला किती दुःख झालें असेल, याचें अनुमान करतां येईल. त्यानें **लॉ**ला धैर्य धरून हल्ला कर, पराक्रम गाजव, म्हणून सांगितलें, तेव्हां तर तो वाजवीपेक्षां फाजीलच जपून, भिऊन, वागला. शत्रु ज्या ठिकाणीं अतिशय निर्बल, सहज पराजित होण्यासारखे होते, तें स्थळ दाखवून देऊन, अरे ह्या जागीं आपलें बहुतेक सैन्य घेऊन जाऊन मारा कर म्हणजे त्यांचा फडशा पडून तुला यशोदुंदुभि वाजवितां येईल असें बजावलें, तें ठिकाण सोडून देऊन ज्या अती मजबूद स्थळाचा आश्रय मिळाल्यानें ते त्याच्याहून फार प्रबल झाले होते

तेथें त्यानें त्यांच्यावर आपले थोडेसे लोक पाठविले. अशा त्याच्या विपरीत वर्तनानें **ड्युप्ली**चे सर्व बेत त्या वेळीं तर फुकट गेले. त्यांची अगदीं माती झाली. परंतु **ड्युप्ली**च्या स्वभावांत असा एक विलक्षण धर्म होता कीं, जोंपर्यंत उगाच थोडासा कोठें आशातंतु दिसतो आहे तोंपर्यंत तरी नैराश्याचा म्हणून आपल्या मनांत प्रवेश होऊं द्यावयाचा नाहीं. **त्रिचनापल्ली**चा ग्रंथ आटोपला, आतां त्याचें नांव नको; परंतु सध्या आपली अन्यत्र स्थिति कशी आहे तें पहावें असें मनांत आणून त्यानें चोहींकडे नजर फिरविली तेव्हां त्याला असें दिसून आलें कीं दक्षिणेच्या सुभदाराजवळ आपलें वजन मोठें आहे तोंपर्यंत आपण प्रबळच आहों. **ब्यूस्सी** त्याला आपल्या तंत्रानें वागवीत आहे तें ठीक आहे. **लारेन्स** आणि **क्लाइव्ह** यांनीं जरी **त्रिचनापल्ली**चा किल्ला आपल्या हातून सोडविला तरी कांहीं हरकत नाहीं; ते फार तर तेवढा घेऊन बसतील, त्याच्यापलीकडे त्यांच्या हातून कांहीं होणार नाहीं. अजून देखील तेथें सुद्धां फ्रेंच आणि त्यांचे स्नेही ह्यांचेंच सैन्य शत्रुसैन्यापेक्षां अधिक होतें. **ड्युप्ली**ला जें काय पाहिजे होतें तें एक सेनापति. त्यावांचून त्याचें अतिशय अडलेलें होतें. इतउत्तर **लॉ**वर भरंवसा ठेवून बसणें म्हणजे मोठा अन्याय आहे असें त्याला अगदीं स्पष्ट दिसत होतें. परंतु **दोतय** शिवाय त्याच्या जवळ दुसरा कोणी मनुष्य नव्हता. तो संधिवाताच्या दुखण्यांतून नुकताच उठून आला होता. त्यानें देखील मागें एका प्रसंगीं सुस्ती केली होती आणि फार फाजील सावधपणा ( भित्रेपणा ) दाखविला होता हें खरें आहे, तो कांहीं तें विसरला नव्हता; परंतु आतां **लॉ**नें जो सुस्तपणा आणि सावधपणा दाखविला त्याच्यापुढें त्याचा म्हणजे कांहींच नव्हे अशांतला होता. अशा स्थितींत आतां आपण करावें तरी काय म्हणून **ड्युप्ली** अगदीं चिंताग्रस्त होऊन विचारांत गढून गेला आहे इतक्यांत **लॉ** कडून एक पत्र आलें तें वाचून तो अगदीं घाबरून गेला आणि त्याचे हातपाय गळाले. **लॉ**नें त्याला असें लिहिलें होतें कीं, **त्रिचनापल्ली** घेतां येण्याची आतां मला कांहीं आशा उरली नाहीं म्हणून मीं माघारा फिरण्याचा निश्चय केला आहे, आतां मी **श्रीरंगम** बेटांत जातों. हा भित्रा मनुष्य जर त्या बेटांत जाऊन बसला तर नदीच्या दोन्ही बाजूंनीं शत्रु त्याच्यावर हल्ला करतील, मग त्याची दशा काय होईल असा विचार मनांत येऊन **ड्युप्ली**ला मोठी काळजी उत्पन्न झाली आणि तो अगदीं घाबरून

गेला. **लॉरेन्स** आणि **क्लाइव्ह** असले दोन वीर पुढें येऊन उभे राहिले म्हणजे त्याची अवस्था सांपळ्यांत सांपडलेल्या उंदराप्रमाणें होईल हें त्याला कळून चुकलें. त्याच्यावर दुसरा कोणताही प्रसंग आलेला त्याला पुरवता परंतु हा कसा सहन व्हावा म्हणून तीं अक्षरें वांचतांच तत्क्षणीं त्यानें **लॉ**ला असा सक्त हुकूम पाठविला कीं, **श्रीरंगम** बेटावर पाऊल ठेवूं नको. तुला मागें फिरलेंच पाहिजे असें जर वाटत असेल तर इकडे **पाँदीशरी**ला निघून ये. त्याला मदत करावी म्हणून, त्याच्या साहाय्यार्थ, फौज जमवण्याला त्यानें हरप्रयत्न केला. कोणाला खरें वाटणार नाहीं इतके श्रम करून त्यानें १२० युरोपियन जमविले आणि त्यांच्याबरोबर ५०० शिपाई व ४ तोफा देऊन त्यांनां **दोतय**च्या हाताखालीं देऊन एकदां **त्रिचनापल्ली**च्या वाटेला लावलें. त्याला त्यानें असें सांगितलें कीं तूं जाऊन **लॉ**ला गांठ, साऱ्या सैन्याचें आधिपत्य आपल्याकडे घे आणि त्याला **पाँदीशरी**ला आण.

परंतु हा आपला सेनापति किती नालायक मनुष्य आहे हें त्याला अजून खरें कळलेंच नव्हतें. तो **त्रिचनापल्लीस** ज्या जागेवर तळ देऊन बसला होता ती अशी कांहीं मजबूद होती कीं तेथें त्यावर उघडपणें हल्ला करण्याची **लॉरेन्स** आणि **क्लाइव्ह** ह्या दोघांनांही छाती होईना; तें कर्म त्यांनांही मोठें कठीण वाटलें. परंतु आपला इष्ट हेतु सिद्धीस नेण्याकरितां त्यांनीं एक युक्ति योजण्याचें मनांत आणलें. ती त्यांची युक्ति अशी होती कीं, फ्रेंचांचा स्नेही जो **चंदासाहेब** त्याच्या लष्करावर छापा घालण्याची हूल दाखवावी म्हणजे त्या आवईनें गडबड उडून जाईल तितक्यांत आपलें कार्य साधलें तर साधून घ्यावें. ती कामगिरी **क्याप्टन डाल्टन** याजवर संपवून त्यांनीं त्याची रवानगी केली. त्याचा जो वाटाड्या होता त्यानें वाट चुकून त्याला भलतीकडेच नेलें. जातजात पहांट झाली तेव्हां तो **चंदासाहेबा**च्या गोटापासून सुमारें दोन मैल दूर, **लॉ**च्या गोटापुढें, त्याची जी अगदीं अत्यंत मजबूद जागा तिच्या समोरच येऊन ठेपला. त्याला जिंकण्याची ती सोन्यासारखी उत्तम संधी अनायासानें प्राप्त झाली होती. **लॉ** शिवाय दुसरा कोणी जर तेथें सेनापति असता तर त्यानें ती कधींही फुकट घालविली नसती. **डाल्टन** आतां आपल्या दाढेंत चांगला सांपडला आहे त्याच्यावर ह्या वेळीं मोठें संकट आहे हें **लॉनें** ओळखलें, त्याला कळलें नाहीं असें नाहीं.

परंतु त्याच्या मनानें असें घेतलें कीं, आतां आपली अवस्था ठीक नाहीं. आपल्यावर कठीण प्रसंग आला आहे असें मानून तो घाबरला आणि त्यानें **डाल्टन**ला काडीइतका उपद्रव न करतां खुशाल माघारें जाऊं दिलें. मग **ड्युप्ली**चे अगदीं सक्त हुकूम बाजूस ठेवून, **चंदासाहेब** विनवणी करून नको नको म्हणत होता तरी तें न ऐकतां, त्याच्या हाताखालचे सारे सैनिक समजून सांगत होते ते कोणाचें कांहीं एक न ऐकतां, आपल्या युरोपीयन लोकांकरितां जें सामान सुमान जमवलेलें होतें त्यांतल्या बहुतेकाचा नाश करून टाकून आणि बाकीचें जागच्या जागीं सोडून देऊन तो निघाला आणि **श्रीरंगम** बेटांत जाऊन पडला.

**लॉ**नें एवढी मोठी चूक केल्यावर मग संकटांनां काय कमी ! मग एकावर एक दुर्धर प्रसंग येऊन कोसळले. **दोतय**नें त्याला एक पत्र पाठविलें होतें त्यांत आपले मुक्काम कोठें कोठें केव्हां होणार तें सर्व लिहिलें होतें. परंतु तें पत्र त्याला पोहोंचलें नाहीं, इंग्रजांच्या हातीं लागलें आणि त्यांनां आयतेंच सारें कळलें. तो **कोलरून** नदीच्या पश्चिम तीरास येणार त्या सुमारास त्याला वाटेंत गांठून अडवावें म्हणून **लॉरेन्स**नें **क्लाइव्ह**ची रवानगी केली. परंतु **चंदासाहेबानें** हेर पाठवून बातमी काढण्याचें काम चागलें चालविलें होतें, त्याला तें वर्तमान कळतांच त्यानें **लॉ**ला सांगून पाठविलें कीं क्लाइव्हची हालचाल अशी आहे. तो **दोतय**ला अडवण्याला निघाला आहे तर तुला त्याच्यावर तुटून पडून त्याचा नाश करण्याला संधी उत्तम आहे. जर नीट शहाणपणानें, चांगली पुरेशी फौज बरोबर घेऊन, सावधगिरीनें काम केलेंस तर फत्ते होण्याची कांहीं शंका नको, डाव चांगला साधण्यासारखा आहे. **लॉ**ला त्याचें सांगणें मानवलें आणि आपणावर आलेल्या सर्व संकटांतून मुक्त होण्याचा खचित योग आला आहेसें दिसतें, युक्ति वरी आहे असें वाटलें. **कावेरी** आणि तिच्या शाखा मध्यें असल्यानें त्या उतरून **क्लाइव्ह**ला कोणी येऊन मदत करील असा संभव नव्हता. **लॉ** आपली सारी फौज घेऊन निघून जाता तरी हरकत नव्हती. कोणी शत्रु येऊन **श्रीरंगम** घेण्याचा यत्न करील ही भीति नव्हती. या वेळीं त्याला अगदीं खात्रीनें जय मिळण्यासारखा होता, कांहीं शंका नव्हती; परंतु पुनः त्याच्या सावधपणानें ( caution ) सारा बेत बिघडून गेला आणि डाव फसला. **क्लाइव्ह**ला गांठून त्याला अगदीं जमीनदोस्त करून टाकण्याला आपण स्वतः सारी फौज

घेऊन जावें तें सोडून देऊन त्यानें फक्त ७०० शिपाई आणि ८० युरोपियन पाठविले. त्यांपैकीं ४० इंग्रज होते. ते तिकडून पळून आलेले होते. ही एवढीशी फौज होती तरी तिला सुद्धां जय मिळण्याची चांगली संधी आली होती. तिनें **सिमिआवरम** येथें **क्लाइव्ह** निजलेला आहे अशा वेळीं अकस्मात जाऊन त्याच्यावर छापा घातला. त्या प्रसंगीं तो कैद झाला असता किंवा मारलाही जाता. परंतु त्या वेळीं त्या थोर वीरानें आपल्या आंगचा विलक्षण शांतपणा, साहस, आणि प्रसंगावधान प्रकट केल्यानें तो त्यांतून निभावला. त्या मनुष्याची केवढी थोर योग्यता, किती किम्मत होती हें त्या चिरस्मरणीय छाप्याच्या रात्रीं चांगलेंच दिसून आलें आणि अगदीं पुरी खात्री झाली; त्याची परीक्षा होण्याची सीमा झाली. हरएक प्रकारें मृत्यूच्या मुखांत सांपडलेला असून त्याला लथाडून देऊन तो बाहेर पडला आणि विजयी झाला. मग **लॉ**ची निराशा काय विचारावी ! तिला अंतच नाहींसा झाला.

**दोतय लॉ**ला सोडवण्याकरितां येत होता त्याचीही दशा तीच झाली. तो आपल्या बरोबर दारूगोळा, शिधासामग्री वगैरे सामान घेऊन येत येत मागें सांगितलेल्या **उतातूर** ठाण्यापर्यंत येऊन पोहोंचला. त्याच्या पाठीवर **डाल्टन** गेला होता त्याच्याबरोबर सरासरी त्याच्या इतकीच फौज होती. **दोतय** जितका भित्रा होता तितका **डाल्टन** धाडशी होता. त्यानें शत्रु **उतातूर**जवळ येऊन ठेपला असें दिसलें तेव्हां आपल्या सेनेचा व्यूह असा रचला कीं, तो पाहून **दोतय** घाबरून गेला. त्याला असा भास झाला कीं, इंग्रजांचें जितकें सैन्य आहे तितकें सारें माझ्यावर चालून येत असून मी आतां सांपळ्यांत सांपडतों. मला चोहींकडून घेरतात ह्या भीतीनें ग्रस्त होऊन बरोबर आणलेला दारूगोळा वगैरे सारें सामान तेथेंच टाकून तो बंदुकीचा एक देखील बार न काढतां माघारा फिरला आणि **वोलकोंड्या**ला गेला. **डाल्टन**चा डाव चांगला साधला. सहज फुकट जय मिळून शत्रूनें टाकलेला दारूगोळा वगैरे सर्व सामान त्याच्या हातीं लागलें.

ही गोष्ट घडल्यावर पुढें लौकरच शेवटचा दुर्धर प्रसंग गुदरला. **लॉ**चें इतकें नुकसान झालें, माणूस खपलें, तरी अजून देखील त्याच्याजवळ ८०० फ्रेंच लोक २००० कवाइती शिपाई आणि **चंदासाहेबा**जवळ अजून इमानानें राहिलेले

३००० किंवा ४००० स्वार, इतकी फौज होती. एवढ्या बळावर तो हाणामार करीत जाता तरी फारसें जड न जातां त्याला समुद्रतीर गांठतां आलें असतें. परंतु त्याच्या अंगांत हिमतीचें नांवसुद्धां उरलें नाहीं. त्याच्याबरोबरचे लोक लढूं या म्हणत असून तो त्यांचें न ऐकतां शत्रूला शरण जाण्याच्या विचारांत गढून गेला होता. अखेर तारीख १३ जून रोजीं त्यानें आपलाच बेत खरा केला. **चंदासाहेबा**च्या जीवाला धक्का लागूं नये असा त्यानें करार करून घेतला परंतु तो व्यर्थ गेला. अखेर परिणाम असा झाला कीं, **चंदासाहेबा**च्या उरांत शस्त्रप्रहार होऊन त्याचा प्राण * गेला आणि ३५ फ्रेंच अम्मलदार ७८५ फ्रेंच सोल्जर्स ( गोरे शिपाई ) आणि २००० कवाइती शिपाई कैदी म्हणून इंग्रजांच्या स्वाधीन झाले.

असा हा भयंकर प्रसंग गुदरल्याचें वर्तमान **ड्युप्ली**ला समजलें तेव्हां त्याची काय स्थिति झाली आणि त्यापासून ओढवणारे अनिष्ट परिणाम होतील तितके थोडे बाधावे म्हणून त्यानें कोणते उपाय योजले तें आतां पाहिलें पाहिजे, म्हणून तिकडे वळूं.



---

* तंजावरचा राजा प्रतापसिंह यानें महंमदअल्लीच्या मदतीस आपला शूर सेनापति मानाजीराव यास पाठविलें होतें. त्याच्या हातीं चंदासाहेब सांपडला आणि त्यानें त्याचा प्राण घेतला.

# भाग ९ वा.

## एका थोर मनुष्याचा दुर्दैवाशीं झगडा.

**सिमीआवरम** येथें **क्लाइव्हवर** छापा पडला ती हकीगत सांगतांना मागच्या भागांत असें लिहिलें आहे कीं, ' त्या मनुष्याची केवढी योग्यता होती हें त्या चिरस्मरणीय छाप्याच्या रात्रीं चांगलेंच दिसून आलें. ' **ब्यूस्सी** आणि **दोतय** यांच्याजवळ जेवढी होती तेवढी शिवाय करून बाकीची आपली सारी युरोपियन फौज **लॉनें** मोठ्या लाजिरवाण्या प्रकारानें **श्रीरंगम** येथें **लॉरेन्सला** शरण जाऊन कैदी म्हणून त्याच्या स्वाधीन केली असें वर्तमान **ड्युप्लेला** समजलें तेव्हां त्यानें जें वर्तन केलें त्याला वरचे तेच शब्द योग्य तेवढा फेरफार करून लावतां येतील.

**ड्युप्लेला** बसलेला हा धक्का फारच जबर होता यांत कांहीं संदेह नाहीं. त्याच्या योगानें इंग्रज विजयी आणि निःकाळजी झाले; त्यांचा स्नेही **महंमद-अली** कर्नाटकचा नबाब झाला. **फ्रेंचांचा** नांवलौकिक—ज्याच्या इतकें हिंदुस्थानांत दुसऱ्या कोणत्याही शब्दाला महत्व नाहीं तो—बुडाला. इतकें झालें म्हणून **ड्युप्ले** कांहीं निराश झाला नाहीं. त्याची प्रतिभा नित्य निर्मल असे तशीच राहिली. त्यानें न गडबडतां आतां आपली एकंदर स्थिति कशी आहे हें आधीं पाहिलें. तेव्हां **श्रीरंगम** येथें घडलेल्या अनिष्ट, अत्यंत भयंकर, प्रसंगाचे परिणाम काय काय होतील आणि ते किती दूरवर जाऊन कसकसे भोंवतील हें सर्व त्याच्या अगदीं पूर्ण ध्यानांत आलें. आतां **कृष्णेच्या** दक्षिणेस आपल्या जवळ फारसें सैन्य उरलें नाहीं, **दोतय** जवळ काय आहे तेवढेंच, पण तें चौकी-पहाऱ्याला देखील पुरेसें नाहीं, हें ही त्याच्या लक्षांत आलें. तरीपण त्याला अजून दक्षिणेच्या सुभेदाराचा आधार होता; त्याचें पाठबळ होतें. **ब्यूस्सी** अपराजित असून तो **औरंगाबादेस पाँदीशरीचें** वजन पहिल्याप्रमाणें राखून होता. साऱ्या कर्नाटकांत **जिंजीचा** किल्ला म्हणजे फार बळकट, त्याच्या

तोडीचा दुसरा नाहीं असें म्हणत असत तो फ्रेंचांच्या ताब्यांत होता, आणि समुद्रकिनाऱ्यावरचीं जीं ठाणीं दक्षिणेच्या सुभेदारापासून **ड्युप्लीनें** मिळविलीं होतीं तीं ही त्यांच्या हातांत होतीं. एवढ्या ह्या गोष्टी **ड्युप्लीच्या** मनाला धीर देणाऱ्या होत्या; परंतु दुसऱ्या पक्षीं पाहूं गेलें तर वर सांगितल्याप्रमाणें त्याच्याजवळची सारी फौज ह्या ठाण्यांच्या संरक्षणाला चौकी पहाऱ्याला सुद्धां पुरेशी नसून त्याच्या-पुढें विजयश्रीनें स्फुरण पावणारा शत्रु उभा होता, एतद्देशीय पुष्कळ राजेरजवाडे इंग्रजांचे स्नेही म्हणून त्यांनां साहाय्य करण्यास सिद्ध होते आणि **लॉरेन्स** व **क्लाइव्हसारखे** पराक्रमी वीर त्यांचे सेनापति होते. अशा त्या प्रबळ शत्रूला फ्रेंचांचें अतोनात नुकसान करतां येण्यासारखें होतें. सुभेदाराजवळ जें त्यांचें वजन होतें तें नाहींसें करण्याचें देखील त्याला सामर्थ्य होतें. म्हणून अशा प्रसंगांतून निभावण्याला आतां काय करावें हा **ड्युप्लीला** विचार पडला.

एतद्देशीय लोकांचा स्वभाव कशा प्रकारचा आहे त्याचें **ड्युप्लीला** जें चांगलें पूर्ण ज्ञान झालेलें होतें तें ह्या प्रसंगीं त्याच्या फार उपयोगीं पडलें. त्यानें पूर्वीं जें निरीक्षण केलेलें होतें त्यावरून त्याला एवढें माहीत होतें कीं कांहीं एक विशिष्ट कार्य साधण्याच्या उद्देशानें कितीएक सरदार एक झाले असले तर ज्या दिवशीं त्यांनां जय येऊन त्यांचा मुख्य उद्देश सिद्धीस जातो त्याच दिवशीं त्यांच्या स्नेहाच्या परीक्षेची वेळ येत असते. येथें आतां तोच समय येऊन ठेपला होता. **महंमदअल्लीनें चंदासाहेबाच्या** नाशार्थ आपल्या मदतीला **तंजावरच्या** राजाचें, **म्हैसूरच्या** राजाचें, आणि मराठ्यांचें सैन्य मागून आणलेलें होतें. त्यांच्या साहाय्यानें त्याचें इष्ट कार्य होऊन गेलें; तेव्हां आतां ते त्यानें आपल्या कार्याकरितां जरुरीच्या वेळीं त्यांनां त्यांच्या मागण्याप्रमाणें जें पाहिजे तें देतों म्हणून कबूल केलें होतें तें मागूं लागतील. परंतु त्याच्या खजिन्यांत शिल्लक कांहीं एक नसल्यानें बोलल्याप्रमाणें हातून कांहीं घडणार नाहीं, तेव्हां त्याच्या विषयीं त्यांच्या मनांत रोष उत्पन्न झाल्यावांचून रहाणार नाहीं. तर ही संधी साधून त्यांच्यांत जो विशेष बलाढ्य असेल त्याचे कान फुंकून त्याच्या मनांत **महंमदअल्लीविषयीं** अविश्वास उत्पन्न करून द्वेषाचें बीजारोपण करावें आणि त्याला त्वेष आणावा आणि त्याच्या द्वारें सर्वांमध्यें कलहाग्नि पेटवून द्यावा अशी **ड्युप्लीनें** आपल्या मनाशीं त्यांच्या नाशाची नामी युक्ति योजली. मग तो मुख्य-

त्वें त्याच कार्याच्या मागें लागला. हें काम कांहीं सोपें नव्हतें, त्यांत खरोखर फार अडचणी होत्या, तरी एतद्देशीय लोकांच्या विचारसरणीचा तो पुरा माहितगार असल्यानें त्या साऱ्यांतून पार पडून आपला हेतु उत्कृष्ट प्रकारें सिद्धीस नेण्यास तो समर्थ होता. तें त्याच्यासारखें दुसऱ्या कोणाच्या हातून मात्र होणारें नव्हतें.

त्याचे श्रम कांहीं फुकट गेले नाहींत. आपल्याला जय आला, शत्रूचा विध्वंस झाला, साऱ्या कर्नाटकाचें राज्य निष्कंटक होऊन हातीं आलें म्हणून **महंमदअल्ली** आनंदसागरांत पोहूं लागला तें ठीकच होतें. परंतु तो हर्षभर कांहीं सतत सारखा रहाणारा नव्हता; कांहीं वेळानें त्याला ओहोटी लागून तो आपोआप कमी झाला. मग तो विचार करून पाहूं लागला तेव्हां त्याला असें दिसून आलें कीं, एवढा खटाटोप होऊन इतके दिवस श्रम केल्यासारखा आपल्याला जय आला हें खरें, परंतु त्यापासून फलप्राप्ति कोणती झाली, तर आपला शत्रु **चंदासाहेब** मेला त्याच्यापलीकडे कांहीं नाहीं. **तंजावरचें** सैन्य कुरकुरूं लागून आतां आम्हाला निरोप द्या, तुमचें काम झालें आम्ही आपल्या घराला जातों म्हणूं लागलें होतें, मराठे सरदार आले होते ते आम्ही कांहीं **म्हैसूरकरांशीं** मिळून काम करणार नाहीं म्हणूं लागले; आणि **म्हैसूरकर** तर आम्ही इतःपर **महंमदअल्लीचें** आणखी हित साधून देण्यासाठीं म्हणून कांहीं करणार नाहीं असें म्हणूं लागले. होतां होतां ते तंटे इतक्या विकोपास गेले कीं, मराठे आणि **म्हैसूरवाले** हे दोघेही रुसून बसले आणि त्यांचा इंग्रजांवर उठण्याचा बेत दिसूं लागला. कलह सुरू झाल्यापासून काम बंद पडलें त्यामुळें **महंमदअल्लीला** आणि इंग्रजांनां तारीख ९ जुलैपर्यंत **त्रिचनापल्ली** सोडून हालतां येईना. मग ते तेथून बाहेर पडले खरे, परंतु मदतीकरितां बोलावून आणलेल्या ह्या उभयतांनींच आतां किल्ला बळकावला तर काय करा ह्या भीतीनें त्यांनां त्याच्या रक्षणाकरितां २०० इंग्रज लोक आणि १५०० कवाइती शिपाई तेथें ठेवावे लागले.

ह्याप्रमाणें जो अवसर मिळाला तो **ड्युप्लीच्या** फार पथ्यावर पडला. **फ्रान्समधून** त्याच्याकडे वर्षास जी नव्या लोकांची रवानगी होत असे तींतला पहिला भाग ह्याच महिन्यांत येऊन दाखल झाला होता. ते लोक थोडेच असून अगदीं कुचकामाचे होते. परंतु **ड्युप्लीनें** त्यांतल्या त्यांत कशी तरी गुजराण

करून घेतली. त्यानें गलबतांवरील लोक खालीं उतरून घेतले आणि त्यांच्या जागीं Lascars लष्कर म्हणजे इकडील खलाशी ठेवून तिकडचें काम भागवलें. याप्रमाणें अदलावदल करून त्यानें आणखी ५०० मनुष्य लढण्याला उभें केलें. या वेळीं त्याला नशीबानें अनुकूल होऊन दुसरीकडून हात दिला. **मेजर लॉरेन्स** आणि **क्लाइव्ह** ह्या दोघांचीही प्रकृति बिघडून त्यांना **मद्रासेस** निघून जावें लागलें; त्यामुळें इंग्रजी फौजेचें तेथचें सेनापतित्व **डी जिंजेन**कडे गेलें. तो कांहीं त्या कामालायक, मोठा हुशार असा मनुष्य नव्हता. इंग्रजांची फौज फ्रेंचांकडून घेतलेल्या **तिरुवाडी** ठाण्यांत बसलेली होती. तेव्हां गव्हरनर **सॉण्डर्स** यानें **डी जिंजेन** याला **जिंजी**च्या मजबूद किल्ल्यावर हल्ला करण्याविषयीं हुकूम पाठविला. **मेजर लॉरेन्स** हा हल्ला करवूं नका असें सांगत होता, परंतु **सॉण्डर्स**नें त्याचें ऐकिलें नाहीं. **जिंजेन**च्या हातांत हुकूम पडतांच त्यानें लागलेच २०० इंग्रजी सोल्जर्स, ५०० कवाईत शिकलेले शिपाई आणि **महंमदअल्ली**कडचे ६०० स्वार, एवढी फौज त्या कामगिरीवर पाठवून दिली.

ही संधी येण्याची **ड्युप्ली** अगदीं नवस करून वाट पहात होता. ती येतांच जसा एकादा मोठा सेनाध्यक्ष टपून बसलेला असतो आणि ती अगदीं उतावळा होऊन साधतो तसें त्यानें केलें. **जिंजी**च्या किल्लेदाराला त्यानें सावध रहाण्याविषयीं हुकूम पाठविला आणि आपला पुतण्या द **केर्झां** ( De Kerjean ) याजबरोबर त्या नवीन आलेल्या लोकांपैकीं ३०० आणि ५०० शिपाई देऊन त्याची तिकडे रवानगी केली. त्याला त्याची ताकीद अशी होती कीं इंग्रज **जिंजी** पुढें तळ देऊन बसले आहेत तोंपर्यंत त्यांच्या आणि समुद्र किनाऱ्याच्या मध्येंच सोईचेंसें ठिकाण पाहून तेथें बसावें आणि त्यांचा समुद्रकिनाऱ्याशीं संबंध अगदीं होऊं देऊं नये; तिकडलें इकडे कीं, इकडलें तिकडे माणूस फिरकूं नये असा बंदोबस्त करावा.

हा **ड्युप्ली**चा डाव चांगला साधलाच पाहिजे होता आणि त्याप्रमाणें तो साधला. **जिंजी** हें ठिकाण फार मजबूद होतें. इंग्रजी फौजेवरचा मुख्य सरदार **किनीर** त्याच्यापुढें येऊन दाखल झाला आणि त्यानें त्याच्याकडे नीट नजर फेंकून पाहिलें त्याबरोबर त्याला असें दिसून आलें कीं आपल्याला सांगित-

लेली कामगिरी फार कठीण, निदान आपल्या हातून तडीस जाणारी नव्हे, अशी जबर आहे. हें काम होणें अशक्य असें तो म्हणत आहे इतक्यांत त्याला असें वर्तमान येऊन पोहोंचलें कीं आपल्या पिछाडीस फ्रेंचांच्या फौजेनें येऊन तळ दिला आहे आणि तिनें आतां आपल्याला रसद येऊन पोहोंचण्याचें अगदीं बंद केलें आहे. याप्रमाणें शत्रूचा आपल्याला पेंचांत धरण्याचा डाव ओळखून तो **द केझों**वर हल्ला करण्याकरितां तसाच माघारा फिरला. मनांत आणल्याप्रमाणें तो त्याच्यावर जाऊन पडला, परंतु त्यांत त्याचाच पराभव होऊन परत जातां जातां जेमतेम **तिरूवाडी** गांठतां आली. त्याच्या बरोबरच्या इंग्रजी सोल्जरांपैकीं ४० ठार झाले. **जिंजी**च्या हल्ल्याचा असा शेवट झाला तों तिकडे समुद्रांत इंग्रजांच्या मदतीकरितां नोकरीस ठेवलेल्या **स्विस** लोकांची एक तुकडी ( Company ) एका गलबतांतून येत होती; तें गलबत फ्रेंचांच्या एका गलबतानें गांठून पाडाव करून धरलें.

याप्रमाणें **लॉ** इंग्रजांनां शरण जाऊन त्यांच्या स्वाधीन झाला तेव्हांपासून दोन महिने लोटले नाहींत तोंच **ड्युप्लीनें** आपल्या हिमतीनें, कारस्थानानें आणि धैर्यानें इंग्रजांनीं **त्रिचनापल्ली**स जो जय मिळविला होता तो न मिळाल्यासारखाच करण्याला आणि तो अगदीं निष्फळ करून टाकण्याला पुष्कळ यत्न केले. ह्या एका कठीण प्रसंगीं त्यानें जें कृत्य केलें तेवढ्यावरून देखील त्याला आपल्या देशाचा फार थोर हितकर्ता सेवक असें म्हणण्याला कांहीं हरकत नाहीं. त्याला जी जागा आणि अधिकार मिळालेला होता तो त्याच्या आंगच्या बुद्धिवैभवाला अगदीं योग्य होता. फ्रान्सला हिंदुस्थानांत मिळालेल्या राज्याची दुर्दशा होऊन अगदीं आशा सोडून देण्याची पाळी आली अशा समयीं अगदीं कच्चीं माणसें हातीं धरून त्यांच्याकडून जय मिळविण्याची तजवीज केली आणि **लॉ**च्या भित्रेपणानें फ्रेंचांच्या कीर्तीला जी काळोखी आली होती ती नाहींशी करून त्यांचा नांवलौकिक पुनः पूर्ववत् स्थापन केला.

याचें प्रत्यंतर **द केझों**ची मोहिम चांगल्या प्रकारें होऊन त्याला जय येण्याबरोबर दिसूं लागलें. तें असें कीं, दक्षिणेच्या सुभेदारानें त्याला कर्नाटकचा नबाब हें पद मिळालेलें होतें त्या जागीं त्याची नेमणूक रीतीप्रमाणें समारंभानें केली. मराठे आणि म्हैसूरवाले थोड्याच दिवसांपूर्वीं **महंमदअल्ली**च्या साहाय्यास येऊन

त्याचे शत्रु होऊन त्याच्याशीं लढत होते, ते आतां त्याचीं आर्जवें करून असें म्हणूं लागले कीं, आम्हांला **त्रिचनापल्लीचें** काय पाहिजे तें करण्यास तूं जर आडवा येणार नाहींस तर आम्ही तुला चांगली मदत करूं असें वचन देतों. फ्रान्सचा राजा पंधरावा लुई यानें त्याला **मार्किस** ही थोर पदवी देऊन त्या मानाची सनद दिली.

फ्रेंच सरदार **लॉ** हा आपल्या सर्व सैन्यासह इंग्रजांनां शरण जाऊन त्यांच्या स्वाधीन झाला तेव्हां त्यांची कीर्ति होऊन फ्रेंचांत कांहीं अर्थ उरला नाहीं असें दिसूं लागलें होतें. परंतु एकाएकीं तें मान फिरून पुनः फ्रेंचांचें पारडें अकस्मात् जड होऊन बसलें असें दिसूं लागलें. **ड्युप्लो**नें मराठे वगैरे आपल्या साहाय्य-कर्त्या लोकांनां **त्रिचनापल्ली**ला वेढा घालण्याला उत्तेजन दिलें आणि आतां पुनः आपल्या अंगांत **फोर्ट सेंट डेव्हिड** घेण्याचा प्रयत्न करण्यासारखें सामर्थ्य आलें आहे असें समजून त्याला वेढा घालण्याची तयारी चालविली. फ्रेंच सोल्जर्स ४००, शिपाई १५०० आणि स्वार ५०० अशी फौज सिद्ध करून तिचें आधिपत्य **द केर्झां** याला देऊन त्यानें त्याची रवानगी केली. हें वर्तमान **स्ट्रिंगर लॉरेन्स**ला कळलें तेव्हां तो नरसिंह चवताळला. तो दुखणेकरी असतां बिछान्यावरून चटकर उठून उभा राहिला आणि **मद्रासे**हून निघून **फोर्ट सेंट डेव्हिड**मध्यें गेला. तेथें चालून येणाऱ्या शत्रु सैन्याइतकें सैन्य सिद्ध करून त्याच्याशीं गांठ घालण्याकरितां तो लागलाच बाहेर पडला आणि त्यानें **केर्झां**ला मागें हटवून **पाँदिशरी**पासून तीन मैलांच्या आंत जाऊन उभें रहाणें भाग पाडलें. तेथें त्याच्यावर हात टाकण्याची **लॉरेन्स**ची छाती नव्हती; कारण तो मुलुख फ्रेंचांच्या हद्दींतला पडला. इंग्रजांचा आणि फ्रेंचांचा जो तह झालेला होता त्यांत त्यांनीं एकमेकांच्या हद्दींत पाऊल घालूं नये असें कलम होतें. म्हणून त्याचा नाइलाज झाला. त्याला तह मोडतां येईना. **फ्रेंचांनां**ही पुनः **इंग्रजां**वर चालून जातां येईना. कारण आपली शक्ति कमी आहे असें दिसून आलें होतें म्हणून त्यांनांही थोडे दिवस स्वस्थ बसणेंच भाग होतें. **ड्युप्ली**ची त्या कामीं कांहीं निराशा झालेली नव्हती; उलट आपला हेतु लौकरच सिद्धीस जाईल असें त्याला दिसत होतें. तें असें कीं त्याच्या भरंवशाचा, खात्रीचा, तरुण, आणि हुशार सरदार **द ला तूश** फ्रान्सांतून चांगले कवाइती तयार, असे ७००

लोक बरोबर घेऊन निघालेला होता तो आतां येतो आहे, आज, उद्यां येईल अशी त्याची तो अगदीं वाट पहात होता. तो येऊन दाखल झाला म्हणजे आपल्या मनाप्रमाणें सर्व कांहीं घडून येईल असा त्याला मोठा भरंवसा होता. **लॉरेन्स**ला **ड्युप्ली**चा डाव कळला होता, म्हणून तोही त्याला एवढें मोठें नवें सैन्य मदतीला येऊन पोहोंचलें नाहीं तों चांगला हात दाखवावा म्हणून धडपडत होता. परंतु **केझीं** जेथें जाऊन बसला होता तेथें त्याच्यावर हल्ला करतां येईना म्हणून युक्ति प्रयुक्तीनें त्याला तेथून हालवून कसा तरी आपल्याजवळ आलीकडे आणावा म्हणून खटपट करीत होता. त्याला हुलकावणी दाखवून आंगावर घ्यावें म्हणून तो आपला तळ सोडून **फोर्ट सेंट डेव्हिड**पासून दोन मैलांवर **बाहुर** म्हणून गांव आहे तेथपर्यंत मागें हटला. **द केझीं** हा तरुण असून आपली कीर्ति व्हावी ही त्याला मोठी इच्छा होती. **द ला तूश** आला म्हणजे तो लागलाच सेनाधिपत्य स्वीकारून बसेल आणि आपण मागें पडूं; तो चटकर केव्हां येईल याचा कांहीं नेम नाहीं, याजकरितां पराक्रम करून दाखविण्याची संधी आलेली फुकट घालवूं नये असें त्याला वाटत होतें. म्हणून शत्रु मागें हटला, आतां पळणार, त्याला जिंकण्याला ही वेळ चांगली आहे असें समजून तारीख ६ सप्टेंबर रोजीं सकाळीं त्यानें चालून जाऊन **लॉरेन्स**वर हल्ला केला. मग जें युद्ध झालें तें फार निकराचें, मोठें भयंकर होतें. साऱ्या लढाईत तसा दुसरा कोणताच प्रसंग झाला नाहीं. दोन्ही बाजूंचे युरोपियन वीर फार निकरानें लढले. लढाई अगदीं ऐन रंगांत आली असतां फ्रेंच सैन्याच्या रांगेंत अगदीं मध्यभागीं जे शिपाई ( काळे ) उभे होते ते ऐन प्रसंगीं कचरले आणि मागें हटले. त्याबरोबर निकालच झाला. **लॉरेन्स** त्यांनां दडपीत पुढें घुसला तसा त्यांचा अगदीं मोड होऊन त्याला पूर्ण जय आला. त्याच्या हाताखालचे अम्मलदार व इतर मिळून ८३ लोक मेले व जखमी झाले. फ्रेंचांचा मुख्य सरदार **द केझीं** स्वतः, त्याच्या हाताखालचे १५ अम्मलदार आणि १०० लोक कैद झाले. त्याच्याकडचे मेले किती आणि जखमी झाले किती ही संख्या पक्की कळली नाहीं. *

* **लॉरेन्स**नें आणि त्यालाच अनुसरून **ओर्मे**नें असें लिहिलें आहे कीं **केझीं** कैदेंत असतांना असें म्हणत होता कीं, **ड्युप्ली**नें लढण्याविषयीं पुनः पुनः हुकूम

**डुप्लीला** हा तडाखा बसल्यानें फार वाईट वाटलें. इतकें विशेष वाईट वाटण्याचें कारण असें कीं, असा प्रसंग येण्याचें कांहीं प्रयोजन नव्हतें. **केझींला** थोडेंसें शहाणपण असतें तर असा प्रसंग खचीत आला नसता. तो होता तेथें स्वस्थ बसून रहाता म्हणजे पुरे होतें. फ्रेंचांच्या ह्या पराजयाचा अनिष्ट परिणाम लागलाच दिसून आला; तो असा कीं, मराठ्यांच्या आणि म्हैसूरच्या सरदारांत त्यांनां साहाय्य करावें अशी थोड्याच दिवसांपूर्वीं जी बुद्धि उत्पन्न झाली होती ती थंडावली. परंतु **डुप्लीच्या** डावपेंचांपुढें तिचा तो थंडपणा फार वेळ टिकला नाहीं, लौकरच नष्ट झाला. त्या दोन्ही सैन्यांच्या सरदारांनीं जेव्हां असें पाहिलें कीं, **लॉरेन्सला** एवढा मोठा जय मिळाला असून तो आपला तेथेंच स्वस्थ वसला आहे, पुढें चाल करून जाण्याचा किंवा दुसरा कांहीं विचार करून आणखी जय मिळविण्याचा वगैरे तत्काळ उद्योग करावयाचा तो करीत नाहीं, तेव्हां, त्यांचें मन सारांकित झालें आणि किंचित्कालपर्यंत तटस्थ राहून मग ते उघडपणें जाऊन फ्रेंचांनां मिळाले.

याच वेळीं **क्लाइव्हला** स्वदेशीं निघून जावें लागलें. तेंही **डुप्लीच्या** मोठें पथ्यावर पडलें. तो शूर सरदार तापानें आजारी पडल्यामुळें त्याला **मद्रासेस** निघून जावें लागलें होतें. परंतु ज्वरमुक्त होऊन तेथून परत येतांच त्यानें रणांगणीं उभें राहून बहुतेक **उत्तर अर्काट** प्रांत शत्रूकडून जिंकून माघारा घेऊन **महंमदअल्लीच्या** स्वाधीन केला. **कोविलांग** किल्ल्याचा वेढा उठवण्याकरितां **डुप्लीनें** जी फौज पाठविली होती तिची दाणादाण उडवून देऊन तो घेतला, आणि **जिंजीच्या** खालोखाल दक्षिण हिंदुस्थानांतला मोठा मजबूद असा जो **चिंगलपटचा** किल्ला तोही घेतला. याप्रमाणें एकावर एक पराक्रम करून मग तो **विलायतेस** गेला. परंतु **लॉरेन्स** अद्याप जागेवरच होता, आणि तो कांहीं सामान्य मनुष्य नव्हता; त्याची खरोखरच दहशत वाटलीच पाहिजे असला वीर होता.

---

पाठविल्यामुळें आपल्याला लढणें भाग पडलें. आपली चूक दुसऱ्यावर ढकलून आपण मोकळा होऊं पहाणाऱ्या मनुष्याच्या पोकळ शब्दाशिवाय ह्या लेखाला दुसरें प्रमाण कांहीं नाहीं. उलटपक्षीं पाहिलें तर **द ला तूश** येईपर्यंत लढाईचा प्रसंग टाळावा अशीच **डुप्लीची** इच्छा असावी असें मानणें सयुक्तिक दिसतें.

असें जरी होतें तरी अजून जर **द ला तूश** आणि त्याच्याबरोबर असलेले ७०० लोक येऊन दाखल होतील तर **लॉरेन्स**ची कांहीं भीति वाळगायाला नको ह्या आशेवर **ड्युप्ली** होता. **द ला तूश** केव्हांच पराभव पावला नव्हता. एका मनुष्यानें दुसऱ्या मनुष्यावर हुकमत चालविण्याची योग्यता त्याला येण्यास त्याचे अंगीं जे गुण हवे लागतात ते सर्व त्याच्या ठायीं वसत असल्याचें दिसून आलें होतें. त्याला अंगावर जबाबदारी घेण्याची भीति वाटत नसे. तो चलाख, धाडशी, आणि बुद्धिमान होता. त्याच्या हातून महत्कार्यें घडतील अशी आशा होती. म्हणून असला हा सेनापति आणि त्याच्याबरोबर येत असलेले लोक केव्हां एकदां येऊन हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर पाय ठेवतील असें **ड्युप्ली**ला होऊन तो त्यांची क्षणोक्षण वाट पहात असतां आतां त्यांचें नांव घ्यावयास नको अशी भयंकर दुर्वार्ता जेव्हां त्याच्या कानावर येऊन पडली तेव्हां त्याची काय स्थिति झाली असेल, केवढी निराशा झाली असेल, त्याला किती दुःख झालें असेल आणि त्याचें काळीज कसें फाटलें असेल, याची कल्पनाच केली पाहिजे. ज्या ‘ **प्रिन्स** ’ नांवाच्या गलबतांत बसून **द ला तूश** वगैरे मंडळी हिंदुस्थानांत येत होती त्याला आग लागून तें पेटलें आणि त्यावर बसलेले सर्व लोक जळून खाक झाले. असा भयंकर प्रसंग गुदरला.

केवढ्याही मोठ्या धैर्याचा कोणी पुरुष असला तरी त्याचे देखील हातपाय गळावे आणि धीर सुटावा अशी ही मोठी अनिष्ट गोष्ट घडून आली होती. **लॉ** आपल्या सैन्यासह शत्रूंच्या स्वाधीन झाल्यानें त्यांचें जें प्रस्थ वाढलें आणि त्यांनां महत्व आलें होतें तें नाहींसें करावें म्हणून सन १७५२ च्या दुसऱ्या सहामाहींत **ड्युप्लीनें** नानाउपायांनीं त्यांच्याशीं सामन्याला उभें रहातां येईल अशी चांगली तयारी केली होती. पुढच्या वर्षीं इंग्रजांनां कमकुवत करून आपलें पारडें पुनः जड होऊन बसेल अशी त्याला अगदीं खात्री वाटूं लागली होती अशा प्रकारची त्यानें सर्व सिद्धता केली होती. त्या आशेनें त्यानें भेद करून इंग्रजांकडे मिळालेले जे राजेरजवाडे त्यांचे स्नेही झालेले होते त्यांपैकीं जे अत्यंत बलाढ्य होते, त्यांनां फोडून आपल्याकडे वळवून घेतलें होतें; व्यापारी गलबतांवरच्या खलाशांनां शिपाई ( soldiers ) बनविलें होतें; आपल्या खासगींतला पुष्कळ पैसा स्वदेशकार्यासाठीं ओतला होता आणि **द केझींनें** उतावळेपणा करून जो अनिष्ट

प्रसंग आणला तो जर आला नसता तर **श्रीरंगम** येथें त्याच्या सैन्यानें हात जोडून शरण गेल्यानें जो परिणाम घडला आणि डाग लागला होता तो त्यानें बहुतेक धुऊन टाकला असता. **द ला तूश** बरोबर येत असलेले ७०० लोक **पाँदीशरीस** येऊन पोहोंचते म्हणजे ते आणि तेथें जागेवर जे ३६० होते ते मिळून १००० वर शत्रूवर पाठवतां आले असते; आणि त्यांच्यावंर जो सेनाधीश व्हावयाचा होता तो चांगला पराक्रम गाजवील असें मानण्याला कांहीं हरकत नव्हती. त्याचा तसा भरंवसा वाटण्यासारखाच तो मनुष्य होता. एवढी थोरली खटपट करून, इतकी तयारी करून मोठी थोरली आशा धरून **ड्युप्ली** ती पूर्ण होण्याची वाट पहात बसला होता अशा समयीं त्याच्या ध्यानीं मनींही न येणारा, आणि येता तरी त्यापुढें त्याचा कांहीं एक इलाज चालला नसता, असला भयंकर अपघात घडून त्याच्या मनोरथाचा सारा पायाच ढांसळून पडला तेथें तो काय करणार ! सर्व स्वप्नवत झालें आणि पुढें नवें वर्ष लागून नवा डाव मांडावयाचा होता तेव्हां **ड्युप्ली**जवळ सारे ३६० युरोपियन शिपाई असून इंग्रजांजवळ समरांगणीं उभे रहाण्यासारखे त्याच्या दुप्पट ७०० होते; आणि मोठा पराक्रम गाजविलेला वीर **स्ट्रिंगर लॉरेन्स** त्यांचा सेनापति होता. **ड्युप्ली**च्या त्या एवढ्याशा फौजेवर सेनाध्यक्ष नेमण्यास योग्य असा मनुष्यही नव्हता. त्याला स्वदेशाकडून मदत होईल ही आशा मुळींच धरावयास नको होती. आतां तुझें तूं पाहून घे, काय पाहिजे तें कर, इकडून कांहीं मदत व्हावयाची नाहीं हा तिकडचा ठरलेला जवाब त्याला पक्का कळून चुकला होता. **ड्युप्ली**सारख्या अत्यंत महत्वाकांक्षी पुरुषावर असला प्रसंग येऊन पडला तर तो अगदीं निराश होऊन बसेना तर काय करील ! कोठें कांहीं आशा धरण्याला थोडी देखील जागा दिसेना, असा मोठा कठीण प्रसंग त्याच्यावर येऊन पडला होता. परंतु कितीही कठीण वेळ आली, कसाही दुर्धर प्रसंग पडला तरी डगमगावयाचें नाहीं, निराश होऊन हात टेंकावयाचे नाहींत, हा तर **ड्युप्ली**चा बाणा पडला. त्याच्या सर्व गुणांत हा प्रधान, फार आश्चर्य मानण्यासारखा गुण होता. त्याची हिम्मत कांहीं विलक्षण होती, बुद्धिवैभव अपार होतें, दक्षिण हिंदुस्थानांतले लोक कशा प्रकारचे आहेत ही माहिती इतरांपेक्षां त्याला अधिक होती, त्यांची परीक्षा त्यानें खरी केलेली होती, इतक्या गोष्टी त्याला अनुकूल होत्या म्हणून त्या बळावर त्यानें धीर धरून

पुनः लढण्याची तयारी करण्याला सुरवात केली. त्याला नशिबानें जरा हात दिला असता तर त्याच्या शत्रूजवळ जरी त्याच्या दुप्पट गोरी फौज होती तरी आपल्या बुद्धिप्रभावानें त्यानें तिला हटविलें असतें. त्याचा पराभव झाला म्हणून आनंद मानणारांनां देखील त्याच्या त्या युद्धाच्या तयारीच्या वेळचा उत्साह आणि निश्चय पाहून आश्चर्यचकित होऊन मान डोलवावी लागते.



# भाग १० वा.

## बिचारा अगदीं नाडला गेला! गहजप झाला!

कोणी थोर पुरुष दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडला असून त्यांतून मुक्त होण्याविषयीं हर प्रयत्न करीत आहे, परंतु त्याचा कांहीं इलाज चालत नाहीं असें दृष्टीस पडलें म्हणजे प्रेक्षकाचें मन जसें हळहळतें तसें दुसऱ्या कशाच्या दर्शनानें हळहळत नाहीं. मूर्तिमंत दुर्दैव पुढें उभें राहून, डोळे वटारून, भोंवया वर चढवून पहात असलें तरी त्याच्या दटावणीस न जुमानतां धीरानें छाती वर करून जो चालतो आहे, एकावर एक संकट येऊन पडलें तरी त्यांतून डोकें वर काढतो आहे आणि युक्ति प्रयुक्ति योजतो आहे, जेवढी म्हणून कांहीं अनुकूल गोष्ट दिसेल तेवढी हस्तगत करून घेऊन तीवर असा कांहीं व्यूह रचतो आहे कीं, तो पाहून त्याच्या प्रत्यक्ष शत्रूंनां त्याच्या व्यक्ती इतकी दुसऱ्या कशाचीच भीति वाटत नाहीं—असा प्रकार दृग्गोचर झाला असतां मन थक्क झालें नाहीं असे पुरुष क्वचित असतील. असा प्रकार सन १८१४ मध्यें साऱ्या युरोपानें एक होऊन अर्वाचीन काळच्या महावीराला चोहींकडून घेरून कोंडून धरलें असतां तो जेव्हां चवताळून उलटला आणि त्यानें नशीबालाही बहुतेक आपल्या इच्छेप्रमाणें वर्तावयास लावलें तेव्हां दिसून आला. त्या विलक्षण मोहिमेचा वृत्तांत श्रवण करून त्या महापराक्रमी पुरुषाचा द्वेष करणाऱ्या राष्ट्रांचीं मनें हळहळून द्रवल्यावांचून राहिलीं नाहींत. **नेपोलियन** आणि **डुप्ली** ह्या दोन पुरुषांच्या स्वरूपांत आणि बुद्धींत पहाण्यासारखें साम्य होतें. दोघांचीही महात्वाकांक्षा अमर्याद होती. दोघांनीं ही फार मोठ्या फलावर दृष्टि ठेवून तें हस्तगत करून घेण्याविषयीं दीर्घप्रयत्न चालविले होते. दोघांनींही अखेरच्या संग्रामांत अशी कांहीं विलक्षण शक्ति, उत्साह, जोर, साधनसंपत्ति आणि बुद्धिवैभव प्रकट केलें कीं, तें पाहणारांनां भीति आणि आश्चर्य वाटलें. आणि अखेर पहावें तर, अरेरे! त्या दोघांनांही त्यांच्या देशबांधवांनीं हातचें सोडून दिलें. परंतु त्यांचा लौकिक अद्याप गाजत आहे आणि असाच चिरकाल गाजत राहील. आपल्या देशबांधवांपैकीं दोन मोठे सत्ताधारी पुरुष

आपद्ग्रस्त झाले असतां न डगमगतां त्या प्रतिकूल कालाचें निवारण करण्याकरितां बुद्धीचा दृढ निश्चय करून कसे झगडले तें पाहून आपल्यावर तसाच संकटसमय आला असतां कसें वागावें याविषयीं त्यांचीं नांवें पुढच्या पिढीच्या लोकांस फार मौल्यवान उदाहरणें होऊन रहातील.

'**प्रिन्स**' जहाजाला अपघात झाल्यानें **ड्युप्ली**ला जी कठीण वेळ आली आणि त्याच्यावर जो दुर्धर प्रसंग गुदरला तो दुसऱ्या एकाद्या सामान्य मनुष्यावर गुदरता तर त्याला असें वाटलें असतें कीं, आतां दुसरा तिसरा कांहीं विचार न करतां आपल्या संरक्षणाचा मार्ग आधीं पहावा आणि तेवढें करतां आलें म्हणजे कृतकृत्य झालों, सर्व कांहीं मिळालें असें समजावें. परंतु **ड्युप्ली** कांहीं अशा भित्र्या स्वभावाचा नव्हता. त्यानें चोहींकडे नजर फेंकली आणि शत्रूंजवळ आपल्यापेक्षां गोरी फौज अधिक आहे म्हणून त्यांचें यावेळीं प्राबल्य आहे तें नाहींसें करण्याचा उत्तम मार्ग कोणता, काय उपाय योजावा, ह्या विचारास तो लागला. अशी कांहीं तरी युक्ति काढणें फार कठीण काम होतें. असा मोठा बिकट प्रश्न त्याच्या पुढें दुसरा कोणताच येऊन पडला नव्हता. **पराडिस**नें **आडियार**-वरच्या लढाईत जय मिळवला त्या दिवसापासून सर्वत्र असा समज होऊन राहिला होता कीं, हिंदुस्थानांतल्या सैन्यांत खरें सार म्हटलें म्हणजे त्यांतले गोरे शिपाई. **विंध्याचला**च्या दक्षिणेकडील सर्व प्रदेशांत त्यांचें श्रेष्ठत्व याप्रमाणें मानीत असत.—आणि आजपर्यंत तें तसेंच चालत आलें आहे.—दक्षिणेच्या सुभेदाराच्या दरबारीं **ब्यूस्सी** होता, त्याच्याजवळ थोडेच गोरे लोक होते, परंतु तेवढ्यांवर त्यानें तेथें आपलें श्रेष्ठत्व कायम राखलें होतें. त्या श्रेष्ठत्वाची गोष्ट काय सांगावी! सन १७५३ च्या अवलीस इंग्रजांनीं कर्नाटकांत आपलें वर्चस्व पहाण्यासारखें राखलें तें त्याच्याच जोरावर. परंतु **ड्युप्ली**ला असें वाटलें कीं आपण शहाणपणानें सूत्रचालकपणा केला तर ह्या गोऱ्या श्रेष्ठत्वावर कडी करून मात करतां येईल आणि आपला डाव साधतां येईल. झालें, ठरलें. मग त्याच उद्योगास लागून त्यानें आपलें तनमनधन सर्व तिकडेच वाहिलें.

युक्तियुक्तीनें कोणाकोणाशीं स्नेह जमवून थोडक्याच अवकाशांत त्याला ६००० सैन्य समरांगणीं उभें करण्याची शक्ति आली. त्यांपैकीं २००० शिपाई कवाईत शिकवून तयार केलेलें पायदळ होतें आणि ४००० घोडेस्वार होते. ते

**मुरारराव घोरपडे** म्हणून जो मोठा हुशार, नामांकित मराठा सरदार होता त्याच्या हाताखालीं होते. **महंमदअल्ली**ला सारे १५०० स्वार गोळा करतां आले होते, आणि ते सर्व प्रकारें **मुराररावा**च्या स्वारांपेक्षां कमी योग्यतेचे होते. **घोरपड्या**शीं स्नेह झाल्यानें **ड्युप्ली**जवळ शत्रूपेक्षां स्वार अधिक होऊन त्याला चांगला जोर आला. **म्हैसूर**च्या राजाचा पालनकर्ता ( Regent ) ही फ्रेंचांनां अनुकूल होऊन त्यांनां साहाय्य करण्याला सिद्ध आहे असें दिसूं लागलें; इतकेंच नव्हे, स्वतः आपलें सैन्य घेऊन येईल असें ही दिसलें. याप्रमाणें सैन्याची जुळवाजुळव होण्याचा योग आला तेव्हां मग **ड्युप्ली**ला असें वाटूं लागलें कीं, आतां एवढ्या थोरल्या ह्या बलाची व्यवस्था आणि वांटणी नीट शहाणपणानें केली तर आपल्या शत्रूजवळ जरी गोरी फौज अधिक असली तरी आपल्यास कांहीं त्याची धास्ती बाळगावयास नको; आपल्याजवळ स्वार आणि कवाइती शिपाई अधिक असल्यानें आतांच्या मोहिमेंत आपण शत्रूला कांहीं हार जाणार नाहीं. याप्रमाणें विचार करून आपल्या स्नेह्यांचा अभिप्राय घेऊन त्यानें असें ठरविलें कीं, **म्हैसूर**च्या सैन्यानें **त्रिचनापल्ली**ला वेढा घालावा आणि **मुरार-रावा**च्या फौजेनें व फ्रेंचाच्या फौजेनें त्याच्या मदतीला बाहेर फिरत राहून तो वेढा उठवण्याकरितां **लारेन्स** जर कांहीं खटपट करील तर त्याचें कांहीं एक चालूं देऊं नये; सारांश त्यांनीं त्याला हुलकावण्या दाखवीत, त्याच्या भोंवत्या घिरट्या घालीत राहून त्याला चैन पडूं देऊं नये आणि **त्रिचनापल्ली**कडे फिरकूं देऊं नये. **ड्युप्ली**जवळ स्वारांचा भरणा मोठा झाला असल्याकारणानें त्यानें ह्या मोहिमेची जी योजना आणि मांडणावळ केली ती खरोखर मोठ्या चातुर्याची होती असें म्हणावें लागतें. यावेळीं त्याचें आणि त्याच्या मित्रांचें मिळून जें त्रिकूट जमलें होतें तें तसेंच टिकल्यास **त्रिचनापल्ली**च्या वेढ्यांत सांपडलेल्या लोकांची उपासमार होऊन त्यांनां अखेरीस किल्ला शत्रूच्या स्वाधीन करावा लागेल असें चिन्ह दिसूं लागलें.

प्रथम डावाला सुरवात तर चांगली झाली. **म्हैसूर**च्या सैन्यानें **त्रिचना-पल्ली**ला वेढा घालून अगदीं नाकेबंदी केली. फ्रेंच सैन्याचा मुख्य सरदार **मेसें** ( Maisin ) आणि **मुरारराव घोरपडे** इंग्रजांपासून जवळच **पुनर** नदी-वर एका ठिकाणीं सभोंता कोट व खंदक करून बंदोबस्तानें राहिले. इंग्रजांनीं

**फोर्ट सेंट डेव्हिड**पासून सात मैलांवर **तिरूवाडी** येथें तळ दिला होता, त्यांच्या राशीस ते लागले. त्यांचें सामानसुमान येऊं लागलें कीं, तें वाटेंत लुटावें, कहीला गेलेले लोक धरून न्यावे आणि **तिरूवाडी**च्या ठाण्यांतील लोकांची **फोर्ट सेंड डेव्हिड** मधील लोकांशीं रहदारी, दळणवळण होणें दुरापास्त करावें, असा त्यांनीं मोठा उपद्रव देण्यास सुरवात केली. त्यांनां एकदां कसें तरी लढाईला उभें रहाणें भाग पाडावें म्हणून **लारेन्स**नें आपली होती तितकी शिकस्त केली, परंतु व्यर्थ, ते कांहीं लढाईला तोंड देतना. तो जवळ जवळ आला म्हणजे ते पाय काढून आपल्या कोटांत शिरून स्वस्थ बसत. अशा प्रकारें त्रास देऊन त्याला त्यांनीं इतकें बेजार केलें कीं अखेर निर्वाहाकरितां सामानसुमान तर आलें पाहिजे म्हणून तें येऊं लागलेलें सुरक्षित येऊन पोहोंचावें म्हणून त्याच्या बंदोबस्ताकरितां त्याला आपली सारी फौज त्या कामावर पाठवावी लागे. ह्या कामगिरीला त्याचे लोक किती त्रासले आणि त्यांचे किती हाल झाले तें कांहीं सांगण्याची जरूर नाहीं.

**म्हैसूर**वाल्यांनीं आणि मराठ्यांनीं तीन महिनेपर्यंत इंग्रजांनां त्रास देण्याचा हा आपला क्रम एकसारखा चालविला होता. ते येणारें सामान आणि त्याच्या रक्षणाकरितां बरोबर असणारें सैन्य या दोहोंचाही फडशा उडवून देण्याची संधी त्यांनां एकदोन वेळां चांगली आली होती, परंतु तेव्हां त्यांनीं त्यांवर हात टाकला नाहीं. तिकडे **त्रिचनापल्ली**ला म्हैसूरच्या सैन्याचा वेढा पडलेला, आंतले लोक आम्हाला सोडवण्याला लौकर या म्हणून ओरडत आहेत; इकडे **फोर्ट सेंट डेव्हिड**च्या शेजारीं अगदीं नजीक, शत्रु असें ठाणें देऊन बसून त्रास देत सुटलेले, हें कांहीं बरें नव्हे, ह्यापासून आपल्या देशाचें मोठें नुकसान होईल असें वाटून ती गोष्ट **लारेन्स**च्या मनाला अगदीं लागून राहिली असल्यानें मद्रासेहून २०० इंग्रजशिपाई यावयाचे होते ते येतांच शत्रूंच्या ह्या ठाण्यावर हल्ला करावयाचा असा त्यानें अगदीं निश्चय केला होता. त्याप्रमाणें ते येतांच त्यानें हल्ल्याची तयारी केली आणि तोफांतून २४ पौंड वजनाचे गोळे भराभर उडवण्यास सुरवात केली. त्यांचा सारखा वर्षाव होत होता तरी त्या तटाला कांहीं भंग होईना. त्यानें आपल्या फौजेचा जमाव करून शत्रूला भय दाखविण्याचाही यत्न केला, परंतु तोही व्यर्थ गेला. तेव्हां त्याला असें वाटलें कीं आतां यांत कांहीं अर्थ नाहीं. आपले सारे प्रयत्न व्यर्थ गेलेले पाहून तो खूप संतापला आणि काळजींत

पडला. आज नाहीं उद्यां, केव्हांतरी एकादी चांगली संधी येईल अशी आपल्या मनाची समजूत करीत त्या आशेवर तो तसाच आणखी तीन आठवडे तेथें वाट पहात बसला; परंतु तितक्या अवधींत तशी एकदां ही संधी आली नाहीं. अखेर **त्रिचनापल्ली**हून पत्रें आलीं त्यांतला मजकूर पहातो तर फारच काळजी वाटण्यासारखा. तेथें **डाल्टन** सेनापति होता, त्यानें असें लिहिलें होतें कीं, आतां आमच्या जवळ सारी तीन आठवड्यांची अन्नसामुग्री उरली आहे आणि बाहेरून सर्व बाजूंनीं नाकेबंदी झालेली आहे. हा मजकूर वाचल्यावर **लॉरेन्स**नें क्षणैक विलंब केला नाहीं. आतां येथें बसून चालणार नाहीं असें पाहून **तिरूवाडी**च्या संरक्षणाचें काम त्यानें **क्याप्टन चेस** याजवर सोंपविलें. त्याच्या हाताखालीं १५० युरोपीयन आणि ५०० शिपाई ठेवून बाकीचे ५०० युरोपीयन आणि १५०० शिपाई आपल्याबरोबर घेऊन तो तडक **त्रिचनापल्ली**स जाण्यास निघाला.

**लॉरेन्स**च्या हालचालीवर **डुप्ली**ची सारखी नजर असे, त्यामुळें तो एकाएकीं **तिरूवाडी**हून निघून बहुतेक फौज घेऊन गेला तें त्याला समजल्याशिवाय राहिलें नाहीं. त्यानें त्या वर्षाच्या आरंभींच कांहीं बंगाल्यांतून आणून आणि कांहीं बंदरांतल्या गलबतांवरले काढून घेऊन असे १०० फ्रेंच शिपाई इकडून तिकडून जमवून त्यांनां म्हैसूरच्या फौजेच्या मदतीला पाठवून दिलें होतें आणि ते **श्रीरंगम**बेटावर जाऊन तें घेऊन बसले होते. **लॉरेन्स**चा मोर्चा **त्रिचनापल्ली**कडे फिरला असला पाहिजे असा बिनचूक तर्क करून त्यानें लागलेच **मेसें**च्या फौजेपैकीं २०० फ्रेंच आणि ५०० शिपाई काढून ते **मस्य आस्टूक**च्या स्वाधीन करून त्याला **श्रीरंगम**च्या सैन्याच्या मदतीला पाठवून दिलें. **आस्टूक** चांगला हुशार असल्याचीं चिन्हें दिसून आलीं होतीं. तो **श्रीरंगम**कडे निघून गेल्यावर मागें **पुनर**नदीवरच्या तटबंदी ठाण्यांत **मेसें**जवळ १६० युरोपियन आणि १५०० शिपाई राहिले. त्यांनां घेऊन तो काय करीत राहिला तें आतां आपण पाहूं.

**लॉरेन्स**नें इंग्रजांच्या नशीबाचा सारा हवाला आतां **त्रिचनापल्ली**च्या रक्षणावर ठेविला आहे, तेथें काय तो सोक्ष मोक्ष होणार, किल्ल्याचें रक्षण नीट झालें आणि वेढा उठला म्हणजे त्यांचें नशीब खुलणार, हें **डुप्ली**च्या तेव्हांच

ध्यानांत आलें आणि त्यानें असा निश्चय केला कीं, आपण आपल्याजवळ जे लोक व सामानसुमान आहे त्याच्या बळावर आपली अगदीं पराकाष्ठा करून या वेळीं जितका हात चालेल तितका चालवून साधेल तेवढा फायदा करून घ्यावा. त्यानें **फोर्ट सेंट डेव्हिड**वर हल्ला केला असता; परंतु तो इंग्रजांच्या हद्दींतला पडल्यानें त्याच्या वाटेस जावें तर तहनामा मोडतो ही अडचण मोठी होती; म्हणून त्यानें त्याचें नांव काढण्याचें सोडलें, परंतु **तिरूवाडी** आणि **त्रिचनापल्ली**च्या वाटेवर असलेलें मोठें मजबूद ठाणें **चिदंबरम्** ह्या ठिकाणीं शिबंदी थोडी होती म्हणून तीं दोन्ही आणि उत्तर व दक्षिण अर्काट प्रांतांत इंग्रजी फौज मुळींच शिल्लक उरली नव्हती म्हणून ते दोन्ही त्याला परत घेतां येण्यासारखे होते. दक्षिणेच्या सुभेदारानें त्याला जो अधिकार दिलेला होता त्याच्या आधारानें त्यानें **मूर्तिजाअल्ली** म्हणून मरहूम **चंदासाहेबा**चा एक आप्त होता त्याला कर्नाटकचा नवाब नेमलें होतें, त्याच्या नांवानें एवढा मुलुख **लॉरेन्स** **त्रिचनापल्ली**कडे गुंतलेला आहे तोंपर्यंत सोडवून घेतां येईल असें त्याला वाटलें. मग त्याप्रमाणें करण्याचा निश्चय करून त्यानें **मेसें**ला असा सक्त हुकूम पाठविला कीं, **तिरूवाडी**वर एकदम हल्ला कर. त्याप्रमाणें **मेसेंनें** तारीख ३ मे रोजीं हल्ला केला, परंतु कार्य झालें नाहीं. आंतल्या लोकांनीं त्याला हटवून लावलें. थोडे दिवस जाऊं देऊन त्यानें पुनः हल्ला केला, परंतु तेव्हांही पहिल्याप्रमाणें त्याला माघारें रडत यावें लागलें. परंतु ह्या प्रसंगीं इंग्रजांच्या शिबंदीनें त्याला हांकून लावला एवढ्यांत संतोष मानून स्वस्थ न रहातां त्याचा पाठलाग केला; तेव्हां त्यांनां चांगलें मोकळ्या मैदानांत येऊं देऊन मराठे स्वारांनीं चोहींकडून घेरलें आणि अशी कत्तल उडविली कीं, त्यांपैकीं एक असामी देखील जिवंत सुटला नाहीं. मग **तिरूवाडी** आणि तिच्यामागून **चिदंबर** हीं फ्रेंचांच्या स्वाधीन झालीं. मग **मूर्तिजाअल्ली** ५० फ्रेंच सोल्जर्स आणि आपली बरीचशी देशी फौज बरोबर घेऊन उत्तर व दक्षिण अर्काट प्रांतांतलीं मजबूद व बळकट ठाणीं असतील तीं सर करण्यास निघाला. त्याचा हेतु पुष्कळ चांगला सिद्धीस गेला. **महंमदअल्ली**च्या साहाय्यकर्त्यांस रणांगणीं समोरासमोर उभें राहून लढाई देऊन त्यानें जिंकलें आणि ते दोन्ही प्रांत बहुतेक सोडविले. **त्रिचनापल्ली**च्या आसपासच्या मुलखांत मात्र खरे शत्रु राहिले.

आतां इकडे **लॉरेन्स**कडील वृत्तांत काय आहे तो पाहूं. तो जो घाईघाईनें मोठाल्या मजला मारीत निघाला तों तारीख ६ मे रोजीं **त्रिचनापल्लीस** पोहोंचला, परंतु त्याच्या सैन्यांत आजार शिरल्यानें आणि कांहीं लोक चाकरी सोडून पळून गेल्यानें पुष्कळ पातळाई झाली. मुक्कामास पोहोंचल्यावर त्यानें जेव्हां हजिरी घेतली तेव्हां असें दिसून आलें कीं, किल्ल्याच्या शिबंदींतील जेवढे शिपाई आपल्याकडे घेतां येतील तेवढे घेतले तरी आपल्याला रणांगणीं उभे करतां येतील असे सारे ५०० युरोपियन, ८० गोलंदाज, २००० शिपाई आणि **महंमदअल्ली**च्या पदरीं असलेले भिकार ३००० स्वार, एवढी कायती आपली फौज. तेवढी बरोबर घेऊन **श्रीरंगम** मधून फ्रेंचांनां हांकून लावण्यास तो निघाला. परंतु **ड्युप्ले**नें तेथच्या सैन्याच्यामदतीस जे लोक पाठविले होते ते **लॉरेन्स** **त्रिचनापल्ली**स पोहोंचला त्याच्या दुसऱ्या दिवशीं त्या बेटांत येऊन दाखल झाले होते. मग एकंदर फौजेची टेहेळणी करून पहातांना **लॉरेन्स**ची अशी खात्री झाली कीं हें बेट फार बळकट असल्यानें आपल्या हातून घेणें होणार नाहीं. त्यानें खरोखर असें म्हटलें आहे कीं, ' शत्रूचे स्वार आमच्या आजूबाजूस घिरट्या घालून आम्हाला घेरून, आम्ही जरा हाललों कीं, आमच्यावर येऊन पडण्यास टपलेले असून प्रतिक्षणीं संधी पहात होते. त्यांच्यावर तोफांचा अगदीं भडिमार करून त्यांनां आम्ही अगदीं दूर रहायाला लाविलें, जवळ येऊं दिलें नाहीं. तेही आपल्या तोफा आमच्यावर चालवीत होते. ते कांहीं गप्प बसले नव्हते. * याप्रमाणें सारा दिवस झटापट चालतां चालतां अगदीं थकून जाऊन **लॉरेन्सला** मध्यरात्रीस नदी उतरून पार व्हावें लागलें. त्या झटापटींत त्याच्या हाताखालील दोन ऑफीसर पडले आणि तीन जखमी झाले. परंतु तो म्हणतो हें अगदीं थोडें असें समजलें पाहिजे. या वेळीं **कर्नल लॉरेन्स**ची प्रकृति बिघडली; त्यामुळें तो किल्ल्यांत जाऊन राहिला. तेथें त्याची स्थिति कठीण झाली, तो अगदीं अडचणींत पडला. कारण त्याला हवी लागणारी अन्नसामुग्री त्याचे साहाय्यकर्ते जे एतद्देशीय लोक होते त्यांच्या हातून मिळणारी असून **चिदंबरम्** फ्रेंचांनीं काबीज

---

* केंब्रीजकृत ' हिंदुस्थानांतील युद्ध ' पुस्तक पहावें. त्यांतील ५९ वे पृष्ठावर युद्धाच्या आरंभापासून १७५४ पर्यंतची हकीगत **कर्नल लॉरेन्स** यानें कारोमँडेल किनाऱ्यावरील युद्धाची हकीकत या नांवानें दिलेली आहे.

केल्यापासून आंत येण्याचा मार्ग शत्रूंच्या हातांत सांपडला होता. तिकडे **डुप्ली** कांहीं स्वस्थ बसला नव्हता. त्यानें अगदीं जिवापाड मेहेनत करून **ऑस्टूक**च्या हाताखालच्या फौजेंत भर घालण्याचें काम चालविलें होतें. या वेळेला तों त्यानें इतकी भरती केली कीं, **लॉरेन्स**पेक्षां **ऑस्टूक**जवळ युरोपियन गोरे शिपाई थोडेतरी अधिक झाले.

हा सर्व प्रकार ध्यानांत घेतांना **ऑस्टूक**ला मोठी हिम्मत आली. तो जातीचा धाडशी होता. **पाँदीशरी**हून त्याला जो हुकूम आला त्याला अनुसरून तो कावेरी उतरून पलीकडे गेला आणि पांच खडक ( FiveRocks ) नांवाचें जें मजबूद ठिकाण तें ताब्यांत घेऊन बसला. ती जागा मोठी नाक्याची असून जर नीट संभाळली तर किल्ला स्वाधीन झालाच पाहिजे अशी होती. कारण ' तोंडेमनचा प्रदेश ' ( Tondeman's country ) † म्हणावयाचा तो त्याच्या माऱ्यांत होता. इंग्रजांनां देशीमालाचा पुरवठा होत होता तो कायतो ह्या मुलखांतून.

येथून पुढें जें मोठें स्फुरण आणणारें दारुण युद्ध झालें त्याचा सविस्तर वृत्तांत **कर्नल म्यालेसन** यानें आपल्या दुसऱ्या एका ग्रंथांत * दिलेला आहे. त्या युद्धाचा अखेर परिणाम काय झाला तेवढेंच येथें सांगावयाचें आहे. अंगांतील गेलेलें बळ पुनः मिळवण्याची **डुप्ली**ची आश्चर्य करण्यासारखी शक्ति, एकदां जो बेत योजला तो कायम ठेवून तो तडीस नेण्याविषयीं त्याचे सतत परिश्रम, परिणामीं आपल्यास जय येणार हा त्याच्या मनाचा अढळ विश्वास आणि जय-प्राप्तीस्तव आकाशपाताळ एक करून सोडल्याशिवाय रहावयाचें नाहीं असा त्याचा निश्चय, हे त्याचे गुण वाचकांच्या नजरेपुढें जितके स्पष्टपणें मांडतां येतील तितके आरशासारखे मांडावे एवढा या ग्रंथकाराचा हेतु आहे. फ्रान्सांतून येत असलेले ७०० लोक अकस्मात् मृत्युमुखीं पडून नाहींसे झाले आणि त्यांच्या-बरोबर त्यांचा सेनापति **द ला तूश** हा होतकरू सरदार नाहींसा झाला तेव्हां

† तोंडेमन हा पाळेगार होता. सन १७५२ मध्यें तो महंमदअल्लीस सामील झाला. त्याचा मुलुख तंजावरच्या पश्चिमेस आणि त्रिचनापल्लीच्या दक्षिणेस होता.

* हिंदुस्थानांतील फ्रेंचांचा इतिहास. लॉंगमन्स १८६६.

जवळ असलेल्या थोड्या व कमकुवत फौजेच्या जिवावरच राज्य स्थापण्याकरितां **स्ट्रिंगर लॉरेन्स** आणि इंग्रज यांच्याशीं संग्राम करीत रहाण्याचा सन १७५३ च्या अव्वलीस त्याच्यावर जो प्रसंग होता तेव्हांची त्याची स्थिति आणि त्याचें बुद्धिबल, परिश्रम आणि अविश्रांत चालू असलेली युक्तिप्रयुक्ति यांच्यायोगानें त्याच वर्षाच्या जून महिन्यांत त्याला प्राप्त झालेली स्थिति, यांची वाचकांनीं तुलना करून पहावी. ती स्थिति म्हणजे खरोखर मुत्सद्देगिरीचा उत्कर्ष होय. सांप्रत निजामाकडे जो मुलुख आहे तो सुभेदाराच्यातर्फे म्हणून **ब्यूस्सी** आणि त्याच्या हाताखालची फौज व्यापून बसली होती; **ब्यूस्सी**च्या दक्षतेनें आणि हुशारीनें ' उत्तर सरकार ' नांवाचा मुलुख फ्रान्सला बक्षीस म्हणून मिळाला होता; **ड्युप्लीनें** ज्याला अर्काटचा नबाब म्हणून तेथच्या गादीवर बसविलें होतें त्याला उत्तर आणि दक्षिण अर्काटप्रांत पुनः मिळवून दिला होता, इंग्रजांनां **तिरूवाडी** आणि **चिदंबरम्** हीं दोन्ही ठाणीं सोडून देऊन जावयाला आणि **सेंट डेव्हिड** किल्ल्यांत शिरून तेथच्या थोड्याशा शिबंदीच्या जिवावर आपला बचाव करण्याला भाग पाडलें; त्यानें त्यांनां पुनः एकदां **त्रिचनापल्लीं**त कोंडून टाकून स्वसंरक्षण करण्याला लावलें आणि समुद्राकिनाऱ्यास जाण्याचा मार्ग अडवून धरून तिकडचा त्यांचा संबंध तोडून टाकला. इतकेंच नव्हे, फक्त एका वर्षापूर्वीं ७०० गोऱ्या फौजेसह दुर्दैवी **लॉ**ला ज्या जागीं इंग्रजांच्या स्वाधीन व्हावें लागलें होतें तिच्याच जवळ **ड्युप्लीनें** आपल्या करामतीनें असा कांहीं व्यूह रचला कीं, त्याच्यायोगानें त्याची फौज इंग्रजी फौजेपेक्षां अधिक झाली. फ्रेंच फौज फार अधिक होती असें कांहीं नाहीं खरें, परंतु नुकता वर्षापूर्वींच **ड्युप्लीवर** जो कठीण प्रसंग गुदरला होता त्यांतून निभावून एवढी तयारी करणें म्हणजे कांहीं सामान्य गोष्ट नव्हती. तें त्याचें कृत्य खरोखर आश्चर्य मानण्यासारखें होतें. खरोखर मोठ्या बुद्धिमान मनुष्याच्या हातून जेवढें कांहीं होणें शक्य होतें तेवढें त्यानें सारें केलें. दक्षिण हिंदुस्थानांत इंग्रजांची आणि फ्रेंचांची जी स्थिति झाली होती ती **ड्युप्लीनें** केवळ आपल्या बुद्धिसामर्थ्यानें पालटून खालचें पारडें वर आणि वरचें खालीं करून टाकलें. सन १७५२ च्या जून महिन्यांत **लॉ** आणि सारें फ्रेंच सैन्य **श्रीरंगम्** येथें इंग्रजांना शरण गेलें. सन १७५३ च्या जून महिन्यांत **ॲस्ट्रुक त्रिचनापल्लीपुढें** येऊन ठाणें देऊन बसला असून इंग्रज

आतां आपल्या हातून एवढ्या ह्या किल्ल्याचा बचाव झाला म्हणजें मोठें मिळ-वलें असें म्हणत होते. अशी ही चमत्कारिक व्युत्क्रम स्थिति होण्याचें कारण पाहूं गेलें तर एवढें एकच दिसतें कीं युरोपांतून जी सैन्याची भर व्हावयाची ती इंग्रजांची झाली होती आणि **ड्युप्ली**ची झाली नव्हती. आतां केवळ आपल्या शहाणपणानें काय घडेल तें पहावें असा **ड्युप्लीवर** प्रसंग येऊन पडला होता. तेव्हां त्यानें अनेक युक्तिप्रयुक्ति योजून जे डाव केले ते साधत गेल्यानें असें दिसूं लागलें कीं, नशिबानें त्याला हात दिला आहे, तो त्याला खेंचून आणतो आहे, परंतु त्याची पूर्ण कृपा होण्याला सैन्यानें ही आपली अगदीं पराकाष्ठा करून दाखविली पाहिजे.

**ड्युप्ली**च्या मोठ्या दुर्दैवाची, म्हणजे अर्थातच त्याच्या शत्रूंच्या सुदैवाची, आणखी एक गोष्ट अशी झाली होती कीं, या वेळीं इंग्रजांकडे **स्ट्रिंगर लॉरेन्स** हा जो सेनापति आला होता तो ईस्ट इंडिया कंपनीच्या पदरीं जे नामांकित नोकर होऊन गेले त्यांतल्या उत्कृष्टांतला होता. हें त्यांचें विशेष सुदैव. **लॉरेन्स** हा मोठा योद्धा असून जसा धारिष्टवान होता तसाच अगदीं निरभिमानी होता. त्यानें ह्या लढाईचा जो वृत्तांत लिहून ठेविला आहे तो वाचला म्हणजे त्याचा थोरपणा, निर्लोभता, सेनानायकत्व करण्यास लागणारी मोठी बुद्धि, सर्व प्रसंगीं राहणारी मनाची शांतता आणि समयसूचकता हे गुण पाहून मन थक्क झाल्या-शिवाय रहातच नाहीं. त्याच्या हाताखालीं असलेला **कपतान डाल्टन** हा अतिशय हुशार मनुष्य होता. त्यानें लिहिलेली बखर ( Memoirs ) थोड्या वर्षांखालीं छापून प्रसिद्ध झाली आहे. ती वाचली म्हणजे इंग्रजलोक परदेशांत येऊन येथच्या लोकांनां वश करून घेऊन ते मनापासून द्यावी तशी मदत देत नसतां त्यांच्या त्या अर्धवट साहाय्यावर लढत असतांना त्यांनां किती स्फुरण येत होतें आणि त्यांनीं केवढी हिम्मत धरली होती तें चांगलें दिसून येतें. त्या वेळच्या त्या मंडळीमध्यें ज्याच्या अंगांत शौर्य आणि वीर्य नाहीं असा क्वचित् एकादाच होता. अशा त्या आपल्या देशबांधवांचें—ज्यांनीं दक्षिण हिंदु-स्थानांत उत्तरोत्तर विस्तार पावत जाणाऱ्या राज्याचा पाया घातला आणि ज्याचा उपभोग आज त्यांचे वंशज सुखानें घेत आहेत त्यांचें—स्मरण इंग्रज लोकांत अगदीं ताजें असावें आणि नेहेमीं वारंवार होत असावें हें विहितच आहे.

कारण एकंदरींत पहातां **ड्युप्लीचे** सारे बेत उलथून पाडून त्याला हात दाखविला तो **क्लाइव्ह, लॉरेन्स,** आणि **डाल्टन,** आणि त्यांचे सोबती, यांनींच. **ड्युप्लीनें** त्यांच्याशीं लढण्याला जे फ्रेंच सरदार ( Officers ) पाठविले त्यांच्याहून ते जर कांकणभर अधिक कर्तबगार नसते तर **ड्युप्लीचा** डाव साधला असता आणि त्याला जय मिळाला असता. त्याला एतद्देशीय लोकांच्या स्वभावाचें ज्ञान आणि त्यांवर त्याचें वजन त्यांच्याहून अधिक होतें आणि आपल्या मदतीस लोक जमवून त्यांचें एकीकरण करण्याची त्याची शक्ति त्यांच्यापेक्षां अधिक होती. परंतु त्याच्या अंगांत शिपाईगिरीचा अत्यंत अभाव असल्यानें सर्व व्यर्थ होत होतें. एकाद्या मोहिमेचा बेत त्याला चांगला करतां येई आणि तीवर तो ज्यांची योजना करी त्या सरदारांनीं काय काम करावें तें त्यांनां चांगलें पढवतां येई. परंतु बंदुकांचे बार आणि तोफांचे आवाज होऊं लागले म्हणजे मग त्यांत त्याला कांहीं सुचत नसे, कसेंसेंच होई. **क्लाइव्ह** आणि **लॉरेन्स** हे तसे नव्हते. ते त्याच्याहूनसे काय, तो आपले हुकूम बजावण्याला त्यांच्यावर ज्या आपल्या सरदारांनां नेमून पाठवीत असे त्यांच्याहूनही वरचढ होते. रणांगणांतल्या त्यांच्या ह्या वर्चस्वामुळेंच **ड्युप्लीचे** बेत फसत. सन १७५२ मध्यें **लॉला** शरण जावें लागलें आणि सन १७५३ मध्यें **ऑस्ट्रुकची** आणि त्याच्यामागून त्याच्या जागेवर येणाऱ्या सरदारांची जी अगदीं गाळण झाली ती त्यामुळेंच.

**ऑस्ट्रुक** आणि **लॉरेन्स** यांची जेव्हां समोरासमोर गांठ पडली तेव्हां **लॉरेन्सची** योग्यता त्याच्याहून थोर हें अगदीं निर्विवाद ठरलें. **ऑस्ट्रुकनें** एक चांगला डाव अगदीं अकस्मात् करून सुवर्णखडक ( Golden rock ) हें ठाणें बळकावून इंग्रजांनां तेथून हांकून लावलें होतें, तसेंच पुढें जर त्याला त्या ठाण्याचें संरक्षण करतां आलें असतें तर इंग्रजांचा सारा ग्रंथच आटोपला असता. ही गोष्ट **लॉरेन्सच्या** ध्यानांत तत्क्षणीं आली आणि तो लागलाच तिचा प्रतिकार करण्याच्या उद्योगास लागला. त्यानें आपली सारी फौज घेऊन निघून ती फ्रेंचांच्या अघाडीला आणि बाजूला एकाएकीं नेऊन उभी करून त्यांच्यावर मारा सुरू केला आणि त्यांनां त्या खडकावरून घाईघाईनें पळायाला लावलें. त्या धांदलींत त्यांच्या दोन तोफा त्याच्या हातीं लागल्या.

याप्रमाणें विजय संपादून तो माघारा जाऊं लागला तेव्हां त्याच्या सैन्यावर तुटून पडून त्याचा मोड करावा म्हणून मराठ्यांच्या घोडेस्वारांनीं पुष्कळ प्रयत्न केला, परंतु त्यानें त्यांचें कांहीं चालूं दिलें नाही. याप्रमाणें आपला पराभव झालेला पाहून **ऑस्टुक**च्या मनाला ती गोष्ट फार लागली. त्याला अतिशय लज्जा वाटून त्यानें त्यावेळीं सेनापतित्वाचा राजीनामा दिला आणि **पाँदीशरी**ची वाट धरली. त्याच्या जागेवर **मस्य ब्रान्ये** ( M. Brennier ) आला.

**ब्रान्ये** सेनापति झाला परंतु त्याला दैव कांहीं **ऑस्टुक**पेक्षां अधिक अनुकूल झालें नाहीं. **त्रिचनापल्ली**च्या किल्ल्यांत अन्नसामुग्रीचा तोटा पडला होता म्हणून तिची भरती करण्याकरितां रसद आणण्याला **लॉरेन्स** पूर्वेकडे निघून गेला तेव्हां किल्ल्यावर हल्ला करण्याला ही संधी बरी आहे असें वाटून **ब्रान्ये** त्या विचारास लागला. हल्ला करण्याला कोणतें ठिकाण सोईचें, कोठें मारा चांगला होईल, तें पाहून, तटाचा नकाशा काढून आणण्याला त्यानें De Cattans **द कातां** नामक एका फ्रेंच मनुष्याला सांगितलें. तो वेषांतर करून किल्ल्यांत जाऊन टेहेळणी करीत असतांना **डाल्टन**ची त्याजवर नजर गेली आणि त्यानें त्याला लागलेंच कैद केलें. मग विचारपूस करतांना त्यानें खरें सांगितलें तेव्हां आतां तूं प्राणास मुकणार, परंतु मी सांगतों असें करशील तर **लॉरेन्स**जवळ रदबदली करून तुला जीवदान देववितों असें **डाल्टन**नें त्याला वचन दिलें. त्यानें तें मान्य केलें तेव्हां अमुक अमुक जागा हल्ला करण्यास सोईच्या आहेत असें मी सांगतों त्या प्रमाणें लिही असें म्हटलें. त्यानें त्याप्रमाणें नमूद करून **ब्रान्ये**च्या नांवानें पत्र लिहून दिलें. हा डाव अनायासें चांगला साधला म्हणून खुशाल्न **डाल्टन**नें तें पत्र **ब्रान्ये**च्या हातीं जाऊन पडण्याची तजवीज केली. परंतु त्यापासून त्याला वाटलें होतें तसें कांहीं फळ आलें नाहीं. पत्र पोहोंचण्यापूर्वींच **ब्रान्ये**नें हल्ल्याचा विचार सोडून देऊन दुसरा बेत चालविला होता. **लॉरेन्स** पूर्वेकडून येणारी रसद आणण्यास गेला होता, त्याला गांठून त्याचा पराभव करून रसद लुटावी ह्या विचारांत तो होता.

परंतु **ब्रान्ये**चा हाही हेतु सिद्धीस गेला नाहीं. **त्रिचनापल्ली**सभोंवारचा मुलुख अगदीं सपाट, अफाट मैदान असून त्यावर मध्येंच १८७८ फूट उंच

गेलेला एक मोठा थोरला काळ्या दगडाचा भव्य खडक आहे. **डाल्टनला** त्याच्या माथ्यावर बसून फ्रेंच फौज कोठें कोठें आहे तें **लॉरेन्सला** खुणांनीं कळवितां येत होतें. **ब्रान्ये लॉरेन्सवर** चालून गेला तेव्हां त्या दोघांचें जें युद्ध झालें तें मोठें तुमुल झालें. दोघेही फार निकरानें लढले. त्यांत अखेर **ब्रान्येचा** पुरा पराजय झाला, आणि तो धीर सुटून निराश होऊन पळत निघाला तो कावेरी तीराला गेला. तेथें **ऑस्टुक** मोठी फौज घेऊन येऊन त्याला मिळाला तें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. **ऑस्टुक पाँदीशरी**ला गेला होता तो ४०० युरोपियन, ६ तोफा आणि २००० शिपाई आणि ३००० मराठे स्वार, एवढी फौज घेऊन आला होता. **ब्रान्ये**च्यासुद्धां त्या साऱ्या फौजेचें आधिपत्य आतां त्यानें आपल्याकडे घेतलें.

**ऑस्टुक ब्रान्ये**पेक्षां अधिक हुशार असून आतां त्याला जय मिळवण्याची संधी ही मोठी चांगली आलेली होती. कारण त्याच्याजवळ युरोपियन शिपाई **लॉरेन्स**पेक्षां अधिक असून मराठे स्वार मदतीस आलेले होते तेही **महंमद-अल्ली**च्या स्वारांपेक्षां संख्येनें जास्त होते व त्यांची तयारीही त्यांच्याहून अधिक होती. **डुप्लीनें** आटोकाट मेहेनत करून येवढें मोठें सैन्य उभारून तें रणांगणीं पुनः पाठविलें आणि त्याला यश संपादण्याला संधी ही नामी होती असें असून अशा उत्कृष्ट समयीं **ऑस्टुक** फाजील सावधपणा करूं लागला हें त्याचें दुर्दैव म्हणावयाचें. **कावेरी** तीराला आल्यापासून तिसऱ्या दिवशीं **ऑस्टुकनें** इंग्रजी सैन्याला भुलवीत भुलवीत अशा एका ठिकाणीं नेऊन सोडलें कीं, तेथें त्यावर हल्ला करून त्याचा सहज विध्वंस करतां आला असता. अशा या वेळीं ही संधी साधावी असें सांगून, हा सुयोग आलेला फुकट घालवूं नये असें म्हणून, मराठ्यांचा सरदार **मुरारराव** घोरपडे यानें हल्ला करण्याविषयीं **ऑस्टुकची** विनवणी, आर्जवें केलीं; परंतु सर्व निष्फळ झालें. हल्ला करून जय आला तर बरें, नाहींतर ह्या एका लढाईत अपयश आलें म्हणजे सर्वस्वीं नाश होईल अशी भीति वाटून त्यानें हल्ला करावयाचा नाहीं असेंच अखेर सांगितलें. याबद्दल त्याला पुढें लौकरच पश्चात्ताप होऊन हळहळत बसावें लागलें. पंधरा दिवस लोटले नाहींत तों **लॉरेन्स**च्या सैन्यांत आणखी भरती झाली. **क्यापटन**

**कॉलिड** नामक मोठा हुशार, शूर, शिपाईगडी २३७ युरोपियन शिपाई बरोबर घेऊन त्याच्या मदतीस आला. तो येऊन पोहोंचल्यावर चार दिवसांनीं म्हणजे तारीख १ आक्टोबर १७५३ इसवी रोजीं **लॉरेन्स** ती जागा सोडून बाहेर पडला, आणि **ऑस्ट्रुक**बरोबर लढाई करावी म्हणून पुढें चालून गेला. **ऑ-स्ट्रुक** कांहीं लढण्याला सज्ज होऊन येईना. तें पाहून **लॉरेन्स** जेथें येऊन उभा राहिला होता तेथेंच तळ देऊन राहिला, आणि दुसऱ्या दिवशीं **ऑस्ट्रुक**-वर तुटून पडून त्यानें त्याचा अगदीं पराभव केला. त्या लढाईंत स्वतः **ऑस्ट्रुक** हा सेनापति, त्याच्या हाताखालचे नऊ अम्मलदार ( Officers ) आणि ९१ शिपाई कैद झाले. कांहीं मेले व कांहीं जखमी झाले असे आणखी १०० कमी झाले; आणि बाकीची फ्रेंच फौज पळून **श्रीरंगम** बेटांत आश्रयास गेली. फ्रेंचां-च्या ११ तोफाही **लॉरेन्स**नें घेतल्या. खुद्द त्याचा नाश अगदीं थोडा झाला. त्याच्याकडचे २० शिपाई आणि ६ अम्मलदार येवढे काय ते मेले व जखमी मिळून सारे २६.

**ड्युप्ली पाँदीशरीस** बसून **त्रिचनापल्ली**वर सैन्याची वरचेवर भरती कर-ण्याकरितां जिवापाड मेहनत करीत होता, आणि त्यासाठीं जे जे सुचतील ते ते उपाय करीत होता म्हणून तो दुसऱ्या कोणत्या गोष्टीकडे त्यावेळीं पहात नसेल असें मात्र समजूं नये. कर्नाटक प्रांतांत शांतता करण्याकडेही त्याचें लक्ष सारखें गुंतलेलें होतें. कितीएक बारीकसारीख गोष्टींवरून त्याची अशी खात्री होऊन चुकली होती कीं फ्रान्समध्यें बसलेले आपले यजमान मनाचे थोर विचारी आणि दूरदृष्टि नाहींत; फक्त सद्यःफलाकडे पहाणारे आहेत; जोंपर्यंत आपलें इकडे ठीक चाललें आहे, जय मिळतो आहे, तोंपर्यंत ते आपली वाहवा, स्तुति आणि आर्जवें ही करतील, परंतु जर का आपल्या नशिबानें जरा उलट खाल्ली तर ते लागलेच आपल्यावर घसरून आपल्याला ढकलून देण्यास मागेंपुढें पहाणार नाहींत. युद्ध वगैरे न करतां, बिन कटकटीनें मुलूख काबीज केला आणि व्यापार वाढण्याची सोय अधिक केली म्हणजे तो जय असा त्यांचा समज होता. परंतु असा जय कसा, कोणत्या उपायांनीं मिळेल, हा कांहीं ते विचार करीत नसत. **ड्युप्ली त्रिचनापल्ली**पुढें इतकें सैन्य उगाच मरायाला कां पाठवतो या गोष्टीचा ते मुळींच

विचार करीत नव्हते. ते फक्त अखेर परिणामाकडे पहात आणि **त्रिचनापल्ली**-पुरतें पाहिलें तर तेथें पुनः पुनः पराभव झालेला दिसत होता. फ्रेंच कंपनीमध्यें कांहीं थोडे असामी **द्युप्लीचा** नेहेमीं हेवा करणारे ( jealous ) होते. पहिल्या पहिल्यानें त्यांच्या हातून त्याचें कांहीं वांकडें होत नसे, परंतु ते नेहेमीं टपून बसलेले असत आणि जरा संधी बरी दिसतांच डोकें वर करीत. **लॉ** पराजित होऊन शरण गेल्याची बातमी पोहोंचतांच ते हातपाय हालवूं लागले. त्यांनीं आरडाओरडा केला, परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. **द्युप्लीला** मदत करण्याचें मताधिक्यानें ठरून **द ला तूश** याच्या हाताखालीं ७०० शिपाई देऊन त्याची रवानगी झाली. **द्युप्लीच्या** दुर्दैवानें त्यांचे पाय हिंदुस्थानाला लागले नाहींत. त्यांच्यावर वाटेंतच कोणता प्रसंग गुदरला आणि त्यांचा कसा अंत झाला तें मागें सांगितलेंच आहे. **द्युप्ली** मोठ्या आशेनें त्या फौजेच्या वाटेकडे डोळे लावून बसला होता, आणि तिचा संहार झाला असें समजलें तेव्हां डोक्यावर आकाश कोसळल्यासारखें होऊन त्याची कंबरच खचली असेल ! परंतु त्या बहादरानें धीर न सोडतां काय काय केलें तें पाहिलें म्हणजे तेवढी कुमक त्याला मिळती तर तो जयश्री संपादल्यावांचून राहिला असता कीं काय याची बहुधा कोणाला शंका रहाणार नाहीं. तो विजयी झाला असता असें मानण्यास अगदीं हरकत नाहीं. परंतु तो कांहीं विचार न करतां त्याचा पराजय झाला एवढें त्याच्या शत्रूंनां गवगवा करण्याला पुष्कळ झालें. कार्यकारणसंबंध काडीइतका ही मनांत न आणतां त्यांनीं **द्युप्लीच्या** नांवानें हांका मारण्यास आणि खडे फोडण्यास आरंभ केला. त्यांचा यत्न सफळ होऊन त्यांचा पक्ष प्रबळ होत चालला. **त्रिचनापल्लीवर** गेलेल्या फौजेचा नाश झाला तरी **द्युप्ली** अजून यत्न करून ती घेण्याचा ध्यास कांहीं सोडीत नाहीं, लढतोच आहे, अशी जेव्हां फ्रान्सांत बातमी जाऊन पोहोंचली तेव्हां त्याच्या शत्रूंनां चांगलेंच फावलें. ते म्हणूं लागले आमच्या कंपनीच्या राज्याचें जें उत्पन्न येत आहे त्याचा उपयोग व्यापारधंदा वाढविण्याकडे करण्याचें सोडून **द्युप्ली** तो सारा पैसा व्यर्थ लढाया करण्यांत उडवीत आहे हें कांहीं बरोबर नाहीं; याचा बंदोबस्त केला पाहिजे. कंपनीच्या भागीदारांनां हें म्हणणें रुचलें. शत्रुपक्ष चांगलाच प्रबळ झाला आणि डायरेक्टरांच्या कौन्सिलांत त्यांचें मताधिक्य होऊन **द्युप्लीकडे** खलिते रवाना

झाले. त्यांत त्याला अगदीं खरमरीत शब्दांनीं असा हुकूम केलेला होता कीं, लौकर तह करावा, त्यांत कितीही नुकसान झालें तरी हरकत नाहीं.

**डुप्ली**ला तह नको होता, तो करण्याला तो नाखुष होता असें कांहीं नव्हतेंच. इंग्रजांबरोबर तह होऊन आनंदानें सुखासमाधानानें रहातां यावें अशीच त्याची झाली तरी इच्छा होती. त्याचें म्हणणें एवढेंच होतें कीं, आपण दक्षिणेच्या सुभेदारापासून जे हक्क, मानमरातब, पदव्या वगैरे संपादन केलें आहे तें सर्व आपल्याकडे चालावें. त्यानें हळुहळू जो मुलुख मिळवला होता तो थोडा थोडका नव्हता. सन १७५३ मध्यें तर त्याच्या ताब्यांत ज्याला उत्तर सरकार म्हणतात तो सारा प्रदेश गेलेला होता. याच्या पूर्वींच, सन १७५२ च्या फेब्रुआरी महिन्यांतच, त्यानें **मिस्टर सॉंडर्स** याला पत्र पाठवून आपलें म्हणणें कळविलें होतें, परंतु त्याच्याकडून त्यावर जो जबाब आला होता त्यावरून त्याला असें स्पष्ट कळून चुकलें होतें कीं इंग्रज यावेळीं कांहीं आपलें बोलणें मान्य करीत नाहींत. तथापि पुढें जेव्हां त्याला आपले फ्रान्समधले यजमान, फ्रेंच कंपनीचे डायरेक्टर्स, आपल्यावर वक्रदृष्टि करणार असा जरासा संशय आला त्या बरोबर त्यानें सन १७५३ च्या जुलै महिन्यांत पुनः तह व्हावा म्हणून बोलणें सुरू केलें. ही वेळ कशी होती तें वाचकांच्या लक्षांत असेलच. ह्या समयीं **लॉरेन्स** आणि **आस्टुक** त्रिचनापल्लीपुढें एकमेकांवर हात टाकण्याकरितां सिद्ध होऊन बसलेले असून तुल्यबल, समसमान नव्हते असें नाहीं; **डुप्ली** उत्तर आणि दक्षिण अर्काट प्रांत सोडवीत होता; त्या कामावर **ब्यूस्सी**नें ज्याची योजना केली होती तो **मोरासें** ( Moracin ) **चिलका** तलाव आणि **मोतापिली** ह्या प्रांतांची व्यवस्था लावीत होता. **सॉंडर्स**कडून **डुप्ली**ला जो जबाब आला तो सामोपचाराचाच होता आणि त्यावरून तहाविषयीं बोलणें सुरू झालें. परंतु पुढें लौकरच असें दिसून आलें कीं, फ्रेंचांचें मागणें अशा स्वरूपाचें आहे कीं, इंग्रजांचा तो गव्हरनर तें कधींच मान्य करणार नाहीं. तह कसकसा करावयाचा त्या बोलण्यास सुरवात करण्यापूर्वी **डुप्ली**नें म्हटलें कीं, आधीं मी कर्नाटकचा नबाब आहें हें इंग्रजांनीं मान्य करावें. **सॉंडर्स**ला असें वाटलें कीं **डुप्ली**चें हें म्हणणें मान्य केलें म्हणजे पुढें कांहीं बोलायालाच नको. इंग्रज आणि फ्रेंच हे दोघे ज्याकरितां लढण्यास सिद्ध होऊन प्राण देत आहेत तें तंट्याचें मूळच उप-

डून टाकल्यासारखें झालें. म्हणून तो कांहीं तें मान्य करीना. दक्षिणेच्या सुभेदारानें मला कर्नाटकचा नवाब नेमिलें असून दिल्लीच्या बादशहानें माझी नेमणूक कायम केल्याचा फर्मान देखील दिला आहे, तेव्हां मला नवाब म्हणण्याला तुम्हाला कांहींच हरकत नाहीं इत्यादि पुष्कळ प्रतिपादन करून **डुप्ले** आपला अभिप्राय सिद्ध करूं पहात होता. परंतु **सॉंडर्स**नें त्यावर उलट असें प्रतिपादन केलें कीं, **महंमदअल्ली**चा बाप कर्नाटकचा नवाब होता तो मेला, त्याचे बाकीचे सारे मुलगे मेले आणि एकटा **महंमदअल्ली** उरला, तेव्हां आपल्या बापाच्या पदाला तो पूर्ण अधिकारी झाला. तो कांहीं आपली मालकी सोडणार नाहीं. असा एकीकडे हा वादविवाद चालला होता आणि तहाचें बोलणेंही चाललें होतें. परंतु पुढें लौकरच असें स्पष्ट दिसूं लागलें कीं, **त्रिचनापल्ली**पुढें जीं उभयपक्षांचीं दळें उभीं राहिलीं आहेत त्यांचे दोन हात होऊन जातील तेव्हांच या गोष्टीचा निकाल लागेल. **ऑस्टुक**नें **लॉरेन्स**चा पराभव केला तर कांहीं बोलायलाच नको, मग **डुप्ले**च्या मनाप्रमाणें सारें आपोआप होणार. उभयपक्ष हें आपआपल्या मनांत समजून होते आणि म्हणून जरी एकीकडे तहाचें बोलणें चाललें होतें तरी दुसरीकडे दोघेही **त्रिचनापल्ली**पुढें बसलेल्या आपआपल्या फौजेच्या साहाय्यार्थ जिवापाड मेहेनत करीत होते. जो तो आपली अगदीं शर्थ करीत होता.

याप्रमाणें उभयतांच्या मनांतून जो निकाल लागावयास पाहिजे होता तो ता. २ आक्टोबर रोजीं अगदीं पुरा लागून गेला असें **मिस्टर सॉण्डर्स** आणि बहुतेक इतर इंग्रज लोकांसही वाटलें. फ्रेंचांचें २०० गोरे शिपाई मेले, त्यांचा सेनापति कैद झाला आणि बाकी उरलेली फौज पळून **श्रीरंगम** बेटांत गेली, हा जो त्यांचा नाश झाला तो कांहीं सामान्य नव्हे; इतकी दुर्दशा झाल्यावर आतां ते पुनः डोकें वर करतील असें मनांत आणावयास नको: ती गोष्ट अगदीं असंभाव्य आहे असें सर्वांना वाटलें. **लॉरेन्स**ची तर तशी अगदीं पुरी खात्री झाल्यानें जी शिल्लक राहिलेली फौज हताश आणि निस्त्राण होऊन कसेंबसें **श्रीरंगम** बेट गांठण्याला पळत सुटली होती तिच्या तो पाठीस लागत गेला नाहीं. तो **वैकोंडा** घेऊन **त्रिचनापल्ली**च्या पूर्वेस पंधरा मैलांवर, समुद्रकिनाऱ्याकडून येऊन त्या बेटांत जाण्याचा जो मार्ग होता तो रोंखून **कोइल-**

वाडी येथें छावणी करून स्वस्थ राहिला. याप्रमाणें जरी आतां फ्रेंचांनीं त्रिचनापल्लीचें नांव घ्यावयास नको असें झाल्यासारखें होतें तरी ड्युप्लीनें धीर सोडला नाहीं. त्याचा स्वभावच असा होता कीं, आतां अखेरचा उपाय करून पाहिला असतां अजून जय येण्याचा उगाच थोडासा तरी संभव आहे असें मानण्याला, आणि उगाच थोडी तरी आशा धरण्याला जागा दिसत आहे तोंपर्यंत हात टेंकावयाचे नाहींत; प्रयत्न सोडावयाचा नाहीं. आतां याचा अगदीं चेंदा झाला, फडशा पडला, आतां डोकें वर निघण्याचें नांव नको, असें सर्वांनां वाटत असावें, अशा प्रसंगीं तो जें कृत्य करी तें मोठें विलक्षण असे. त्या स्वभावाप्रमाणें त्यानें ह्या प्रसंगीं जो आपल्या बुद्धीचा प्रभाव दाखविला तो फार विलक्षण, तसा त्यानें यापूर्वीं केंव्हांच दाखविला नव्हता म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. साधारण व्यवहाराप्रमाणें पाहिलें असतां एकंदरींत त्याचा पुरा पराभव झाला होता. त्याचें जें अगदीं उत्तम सैन्य होतें त्याचा मोड होऊन दुर्दशा झाली होती; त्याचा जो उत्तम सेनापति होता तो कैद होऊन शत्रूच्या हातांत पडला होता; त्या सैन्यांतले जे शिपाई शिल्लक उरले होते त्यांचा धीर सुटून, निराशा होऊन ते कसे तरी पळून जाऊन **श्रीरंगम** बेटांत—अपेशी जागेंत—पळून राहिले होते; आणि **पाँदीशरी**कडून तिकडे येण्याचा जो मार्ग होता तो **लॉरेन्स** आपल्या विजयी सैन्यासह अडवून धरून बसलेला दिसत होता. अशी अवस्था होती तरी **ड्युप्ली** आणखी एक हात करावयाचा विचार करूं लागला. नुकतेच फ्रान्सांतून आणखी शिपाई येऊन त्याच्या सैन्यांत भर पडली होती. त्यामुळें आणखी एकवार तयारी करून पुनः फौज रवाना करण्याची त्याला उमेद आली. नवीन आलेल्या लोकांपैकीं ३०० गोरे आणि १२०० काळे शिपाई अशी १५०० फौज सज्ज करून तीवर **डी मेव्हिल** * नामक नवीनच सरदाराची योजना करून त्याला कसें वागावें, काय काय करावें, तें नीट पढवून **ड्युप्लीनें** त्याची रवानगी केली. त्यानें **मेव्हिल**ला असा मंत्रोपदेश केला होता

* **लॉरेन्स** आणि त्याचेंच पाहून **आर्मे**, यांनीं असें लिहिलें आहे कीं, या फौजेचें आधिपत्य **मेसें** याजकडे होतें. परंतु फ्रेंच कागदपत्रांवरून असें दिसतें कीं, तें बरोबर नाहीं. या वेळीं **मेव्हिल** हाच सेनापति होता. **ड्युप्ली**च्या जागीं **गॉडेह्यु** आल्यानंतर मग **मेसें** सेनापति झाला; तोंपर्यंत नाहीं.

कीं, अगदीं गुपचुप जाऊन **श्रीरंगम** बेटांत जाऊन बसलेल्या फौजेला मिळावें, आपण अगदीं निर्भय आहों, हे फ्रेंच आपलें नांव काढणार नाहींत असा इंग्रजांनां भ्रम पाडावा आणि मग बेटांतून जें एकाएकीं निघावें तें चढ्या घोड्यानिशीं, पहिल्याच सपाट्याला, **त्रिचनापल्ली** काबीज करून बसावें.

**कोइलवाडी** येथें छावणी करून राहिलेल्या इंग्रजी फौजेंत आजार पसरला आहे आणि त्यानें ती फार हैराण झाली आहे अशी **डुप्लीला** बातमी लागली होती आणि ती अगदीं खरी होती. थोडक्याच दिवसांत **लॉरेन्सच्या** हाताखालचे सहा अम्मलदार ( Officers ) आणि पुष्कळ शिपाई मेले. **तंजावरचें** जें सैन्य त्याच्या मदतीला आलेलें होतें तें त्यानें माघारें लावून दिलें होतें. **महंमदअल्लीचें** भिकार कुचकामाचें सैन्य त्याच्याजवळ होतें तेवढें काय तें त्याला पाठबळ होतें. **मोव्हिल** कूच करून निघाला तेव्हां इंग्रजी फौजेची स्थिति अशी होती. तो त्या बेटांत सुखरूप जाऊन पोहोंचला, आणि इतका गप्प राहिला कीं त्याचा बेत अमूक असावा असा **लॉरेन्सला** संशय देखील आला नाहीं. तो आपल्या फौजेंतल्या आजारी पडलेल्या शिपायांनां औषधोपचार करण्याच्या कामांत गढून गेला होता. **मव्हिल** तेथें गेल्याबरोबर पुढच्या तयारीला लागला. तो तटावर चढण्याला शिड्या करूं लागला, शिपायांनां कवाईत वगैरे शिक्षण देऊं लागला आणि किल्ल्यांत कोठें काय आहे, कोणती जागा कशी आहे वगैरे माहिती मिळवूं लागला. असें करतां करतां अखेर तारीख ८ दिसेंबर रोजीं त्याची सारी तयारी झाली. तेथपर्यंत तो इतका बेतानें आणि सावधगिरीनें जपून वागत होता कीं इंग्रजांनां अथवा त्यांच्या साहाय्यकर्त्या एतद्देशीय मित्रांपैकीं कोणा एकाला त्याचा बेत आपल्यावर उठण्याचा आहे असा यत्किंचितही संशय आला नाहीं. त्यानें जो बेत योजला होता तो असा—६०० फ्रेंच शिपायांची एक टोळी करावयाची, तिच्या मदतीला दुसरे २०० आणि काळे शिपाई ठेवावयाचे आणि **डाल्टनचा** मोर्चा ( Battery ) म्हणून किल्ल्यांत जी जागा आहे ती प्रथम काबीज करावयाची. त्या मोर्चाच्या संरक्षणाला सारे ५० शिपाई आहेत असें त्याला समजलें होतें. तेवढा मोर्चा मारला म्हणजे बंदुकीचा एक देखील बार न काढतां जें धडकून पुढें जावयाचें तें दोन्ही * बंक उलटून मुख्य

---

* बंक म्हणजे किल्ल्याच्या मुख्य दरवाजापर्यंत जाण्याला बांकदार नागमोडी रस्ता असतो तो.

वेश गांठावयाची, ( ती वाट दाखविण्यास शत्रूकडचा एक पळून आलेला मनुष्य मिळाला होता. ) आणि तिच्याखालीं पेटार्ड ( Petard ) म्हणजे दारू भरलेलें एक यंत्र, लावून ती उडवून द्यावयाची. हा डाव नच साधला तर तटाला शिड्या लावून वर चढावयाचें. त्या ठिकाणीं खडकावर बांधलेल्या त्या तटाची भिंत सारी १८ फूट उंच होती.

याप्रमाणें योजलेला आपला बेत पार पाडण्याकरितां तारीख ९ दिसेंबर रोजीं पहाटे तीन वाजतां कावेरी नदी उतरून **मॅव्हिल** आलीकडे आला आणि खडकाच्या पायथ्याशीं जाऊन पोहोंचला. त्याला कोणीं पाहिलें नाहीं. त्यानें बेत केल्याप्रमाणें लागलाच **डाल्टन**चा मोर्चा मारला. त्यांत त्याचें एक देखील मनुष्य जायां झालें नाहीं. पुढें त्याचे शिपाई जर फक्त त्याच्या हुकमाप्रमाणें वागते, फाजीलपणा करून बार न काढते, तर त्यांनीं खरोखर तो किल्ला घेतला असता; कारण त्या वेळीं इंग्लिश लोक अगदीं घोरत पडलेले होते. फ्रेंचांचें दुर्दैव जागें होतें त्यानें आपलें काम केलें. त्या समयीं फ्रेंच शिपायांनां दुर्बुद्धि होऊन त्यांनीं **डाल्टन**च्या मोर्चांतून आणलेल्या तोफांपैकीं बाराबारा पौंडाचे गोळे फेंकणाऱ्या दोन तोफा शहावर रोखून आपण विजयी झालों असें समजून Vive le Roi ( Long live the King ) राजाला दीर्घायुष्य असो. अशा ललकाऱ्या मारीत बार काढण्यास सुरवात केली. त्याचा परिणाम इतकाच झाला कीं, तोफेचा आवाज कानीं पडतांच पहारेकरी जागे होऊन खडबडून उठले, आणि भराभर बंदुका घेऊन घाईघाईनें एका ठिकाणीं जमून शत्रूचा समाचार घेण्यास सिद्ध झाले. फ्रेंच शिपाई आपल्या त्या वाटाड्याला पुढें करून त्याच्यामागून बंकांतून मोठ्या आवेशानें दरवाजावर हल्ला करण्याला चालले होते त्यांच्यावर बंदुकांच्या गोळ्यांचा वर्षाव झाला. त्यांनां वाट दाखवीत घेऊन चाललेला तो त्यांच्याकडे पळून गेलेला इंग्रज शिपाई पुढें होता तोच पहिल्या सपाट्याबरोबर गोळी लागून ठार झाला. वेश कोठेंशी आहे ती पक्की माहिती असलेला ती दाखविणारा मनुष्य पडल्याबरोबर सारें संपलें. मग बाकीचे सारे पुरे आंधळे होऊन काळोखांत चांचपत चांचपत बराच वेळ वेश शोधीत होते. इतक्यांत त्यांच्यावर बंदुकीच्या गोळ्यांचा वर्षाव अधिक होऊन जोरानें भडिमार होऊं लागला. त्यावेळीं काळोख असल्यानें शत्रूचा जमाव केवढा आहे हें कांहीं इंग्र-

जांनां कळेना तसें ते किती आहेत हें फ्रेंचांनां कळेना. परंतु इंग्रज आपल्या रोजच्या जागेवर असल्यानें आपण कोठें उभें रहावें, काय करावें, काय न करावें हें त्यांनां चांगलें समजत होतें. फ्रेंचांचें तसें कांहीं नसल्यानें ते मोठ्या संकटांत पडले. तरी त्यांच्या शिड्यांचा फडशा पडेपर्यंत कांहीं त्यांनीं दम सोडला नाहीं. शिड्यांचा नाश झाला तेव्हां आतां मात्र माघारें फिरलें पाहिजे असें त्यांनां वाटलें. पण उपयोग काय ? आतां तर ते सांपळ्यांत सांपडल्यासारखे झाले होते. आतां मोर्चावरून उड्या टाकून जावें तर सुटका. त्यावांचून दुसरा मार्ग नाहीं असें दिसलें तेव्हां कांहीं थोड्याशा असामींनीं तो स्वीकारला. परंतु इतक्यांत उजाडून चांगलें दिसूं लागलें तेव्हां बहुतेकांनां समजलें कीं आतां येथून आपली सुटका होण्याची आशा धरावयास नको. मग त्यांनीं इंग्रजांना शरण जाऊन जीवदान मागितलें. तें त्यांनीं दिलें. या हल्ल्याची हकीगत **लॉरेन्स**नें लिहिली आहे तांत तो म्हणतो ' या कामांत फ्रेंचांचे ३६४ शिपाई कैद झाले, त्यांपैकीं ६५ जखमी झालेले होते; ८ अम्मलदार ( Officers ) कैद झाले; त्यांतले बहुतेक जखमी झालेले होते; आणि एक अम्मलदार मेला; आणखी पुष्कळ असामी जखमी होऊन किंवा लंगडे होऊन पडले त्यांनां बाकीच्यांनीं **श्रीरंगम** बेटांत नेलें हें तेच कबूल करतात. त्यांनीं डाव चांगला केला होता; रागाच्या लहरींत आरडा ओरडा करून त्यांनीं जर गडबड केली नसती तर आम्हांला ते उमगले नसते आणि त्यांचा हेतु कदाचित् सिद्धीस जाता. तेवढ्यापुरता वेळ होता. " याप्रमाणें झालें असतें म्हणण्याला कांहीं शंका वाटायाला नको.

या वेळेस जो हा फ्रेंचांचा पराजय झाला तो त्यांच्या सर्वस्वाचा नाश करणारा होता आणि खरोखर तो एकाच ठिकाणीं होऊन राहिला नाहीं. **ड्युप्लीनें** कर्नाटकच्या गादीवर बसविलेला नवाब **मूर्तिजाअली** याचा **तिरुवन्नामले** येथें पराभव झाला; तसाच त्यानें हातीं धरलेला फ्रेंचांचा दुसरा मित्र **महंमदकुमार** याचा **तिरुपती**च्या देवालयापुढें पराभव होऊन अगदीं फडशा उडाला. परंतु **त्रिचनापल्लीस** जो पराभव आणि नाश झाला तो सर्वांच्या वरचा, केवळ प्राणघातक होता. त्या शेवटच्या झटक्यानें **ड्युप्ली**च्या सर्व नाड्याच आंखडल्या. आतां झालेलें येवढें थोरलें नुकसान अंशतः तरी भरून निघण्याला संभव म्हटला तर त्याला एकच दिसत होता आणि तो एवढाच कीं, इंग्रजांबरोबर कसा

तरी लौकर तह व्हावा. त्याला असें वाटलें कीं, तह करण्याला कबूल होण्याला **सॉंडर्सचें** मन कसें तरी जर वळवितां येईल तर आपल्याला निदान थोडीशी विश्रांति तरी मिळेल. मग त्या तहाच्या अटी कितीही नुकसानकारक असल्या तरी हरकत नाहीं. दुर्दैवानें अनेक विपरीत गोष्टी घडून भलतें भलतें झालें त्या साऱ्या अपयशाचें खापर आतां आपल्या डोक्यावर फुटण्याचा संभव आहे असें फ्रान्सांतून आलेल्या बातमीवरून **ड्युप्ली**ला दिसूं लागलें होतें, म्हणून कसा तरी एकदां लौकर तह करणें त्याला फार अवश्य वाटूं लागलें होतें. **सॉंडर्स**लाही तह व्हावयाला नको आहे असें नाहीं असें आढळून येतांच त्यानें तो उद्योग आरंभिला. मग उभयतांचा पत्रव्यवहार सुरू झाला तो बराच लांबून अखेर असें ठरलें कीं, उभयपक्षांनीं आपआपल्या तर्फे कमिशनर नेमावे; त्यांनीं **पॉंदीशरी** आणि **मद्रास** यांच्यामध्यें **सद्रस** ( Sadras ) म्हणून डच लोकांचें जें ठाणें आहे तेंथें जमावें आणि तहाची वाटाघाट करावी. त्या ठरावाप्रमाणें इंग्लिशांच्या तर्फेनें **पाक** Palk आणि **व्हान्सिटार्ट**साहेब व फ्रेंचांच्या तर्फे **फादर लाव्हॉर, मस्य द केरझॉ** आणि **मस्य बॉसेट** तिकडे जाण्यास निघाले. तारीख २१ जानेवारी सन १७५४ रोजीं सर्व असामी तेथें जमून दुसऱ्या दिवशीं कामास सुरवात झाली.



# भाग ११ वा.

## ड्युप्लीचा ऱ्हास.

कर्नाटकचा नबाब ही जी पदवी आपल्याला मिळालेली आहे ती सोडावयाची नाहीं असा **ड्युप्लीनें** आपल्या मनाशीं निश्चय केला होता. इंग्रज ती सहसा मान्य करणार नाहींत हेंही तो जाणून होता. म्हणून तेवढी त्यांची कबुली मिळण्याकरितां इतर बाबतींत ते जें म्हणतील तें फारसे आढेवेढे न घेतां मान्य करावें आणि आपला एवढा हेतु साधावा असें त्यानें पाठविलेल्या आपल्या तर्फेच्या कमिशनरांस सांगून ठेविलें होतें. ती गोष्ट पोटांत ठेवून ते आरंभापासून इंग्रजांनां बरें वाटे असें बोलूं लागले. त्या कॉन्ग्रेसच्या पहिल्याच बैठकींत ते असें म्हणाले कीं, मद्रासच्या भाड्याबद्दल इंग्लिश कंपनीकडे जी बाकी येणें निघत आहे तिची सूट घालावी आणि यापुढें भाडें मागूं नये; मद्रास इंग्लिश कंपनीला अगदीं बहाल करावी; इंग्लिशांनां लढाईबद्दल जो खर्च आला तो कर्नाटकच्या वसुलांतून द्यावा आणि फ्रेंच कंपनीनें इंग्लिश कंपनीला व्यापाराच्या मोकळिकीबद्दल जरूर लागणारी हमी द्यावी. **महंमदअल्ली**चें जें नुकसान होणार तें भरून निघण्याकरितां त्याला दक्षिणेंत दुसरीकडे एक राज्य द्यावें आणि तें त्याच्याकडे निर्वेध चालेल अशी फ्रेंच व इंग्लिश या उभयतांनीं हमी द्यावी; तंजावरच्या राजाचा मुलुख त्याच्याकडे चालावा आणि त्याबद्दल त्यालाही उभयतांनीं आश्वासन देऊन हमी भरावी. **मद्रास**पासून १५ मैलांवर **पुनमुलु** म्हणून जें ठाणें आहे तें आणि त्याच्याखालीं असलेला मुलुख इंग्लिशांनीं अगदीं आपला म्हणून आपल्याकडे ठेवावा आणि त्याशिवाय आंतल्या मुलखांत जीं तटबंदी ठाणीं असतील तीं सारीं सोडून द्यावीं; उभयतांनीं एकमेकांचे कैदी सोडून द्यावे.

वरील मजकुरावरून असें दिसून येणार आहे कीं आपण कशाप्रकारें तह करण्यास कबूल आहों तें फ्रेंच कमिशनरांनीं सांगितलें, त्यांत कर्नाटकच्या नबाबीचा जरी स्पष्ट उल्लेख केला नाहीं तरी येथून तेथून साऱ्या बोलण्यांत ते असें धरून

चालले होते कीं, दक्षिणेच्या सुभेदारानें **ड्युप्ली**ला कर्नाटकचा नबाव नेमिलें आणि दिल्लीच्या पादशहानें ती नेमणूक मंजूर केली तेव्हां तें पद त्याच्याकडेच रहावयाचें ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु हें त्यांचें म्हणणें इंग्लिश कमिशनर कांहीं कबूल करीतना. ते असें म्हणूं लागलें कीं, सुभेदारानें दिलेली नेमणुकीची सनद एक वेळ मान्य करतां येईल, परंतु ती कायम केल्याबद्दल बाहशहाचा फरमान म्हणून जें दुमालापत्र आहे त्यावर बादशहाची सही नाहीं आणि दिवाणाचें शिक्कामोर्तबही नाहीं तेव्हां तें कांहीं मान्य करतां येत नाहीं. फ्रेंच कमिशनरांच्या पुष्कळ गोष्टी मान्य करण्यास ते कबूल होते, परंतु **महंमदअल्ली**च्या हक्काला काडीइतका बाध येईल अशी एकही गोष्ट ते मान्य करीतना.

अखेर त्या एका गोष्टीवर उभयतांचें न जमल्यामुळें तह होण्याचा राहिला. **ड्युप्ली** कांहीं केल्या आपला हेका सोडीना. कसातरी तह व्हावा म्हणून **सॉण्डर्स**नें आपल्या कमिशनरांनां पड खाऊन फ्रेंचांच्या पुष्कळ गोष्टी मान्य करण्यास सांगितलें. अखेर तो इतक्याला कबूल झाला कीं, नबाबाची जागा रिकामीच ठेवावी; मात्र करार असा कीं, तीवर **महंमदअल्ली**ला नेमावयाचें झाल्यास त्याचें संरक्षण इंग्लिश व फ्रेंच ह्या उभयतां कंपन्यांनीं करण्याचें पतकरावें. परंतु **ड्युप्ली**ला तेंही मान्य झालें नाहीं. तो संतापून म्हणाला मला सुभेदारानें कर्नाटकचा नाबब रीतीप्रमाणें नेमिलें, बादशहानें माझी नेमणूक मंजूर केली, इतकें सारें झालें असून आतां **महंमदअल्ली**ला बाबा तूंच नबाब खरा, मी कोणी नव्हे, असें म्हणून मी मुकाट्यांनीं हें पद सोडून देऊं काय ? अशी गोष्ट कदापि होणार नाहीं. **ड्युप्ली**प्रमाणेंच ज्याची महत्वाकांक्षा थोर, बुद्धि विशाल, दुसऱ्याला आपलें म्हणणें मान्य करण्यास लावण्याची शक्ति जबर, असा आणखी एक फ्रेंच मनुष्य जगत्प्रसिद्ध झाला; त्याच्यावर पुढें ७० वर्षांनीं असाच प्रसंग आला तेव्हां सन १८१३ मध्यें **ड्रेसडेन** येथें आणि १८१४ मध्यें **शाटेयाँ** ( chatillon ) येथें त्याच्या मनाचा असाच निर्धार झाला. एका इंग्रज इतिहासकारानें त्याच्या तोंडून त्या प्रसंगीं निघालेले शब्द लिहिले आहेत. तो म्हणाला, मी ह्या असल्या भिकार गादीवर बसणार * नाहीं. कर्नाटकांत फ्रेंचांची

* हा दिगंतकीर्ति पुरुष नेपोलियन. **ड्रेसडेन**च्या लढाईत त्याला जय आला. ( ता. २६।२७ आगस्ट १८१३ ) परंतु पुढें लगेच ( ता. १६।१९

आणि इंग्रजांची स्पर्धा लागून फार वर्षें लढाई जुंपली होती, परंतु तितक्या काळांत **ड्युप्ली** एकवार देखील सारासार विचार बाजूस ठेवून क्रोधवश होऊन अडून बसला नव्हता. परंतु ह्या प्रसंगीं त्याला तशी बुद्धि झाली. या वेळेस आपला हट्ट सोडून देऊन त्यानें इंग्रजांचें बोलणें मान्य केलें असतें तर काय जातें ? त्याच्यासारखे जे मोठे हिम्मेबाज पुरुष असतात ते पुढें टाकलेलें पाऊल मागें घेण्याचा प्रसंग आल्यास पुनः जोरानें दुप्पट लांब उडी ठोकण्यास अवसान येईल असें दिसलें तरच पाय मागें घेतात, नाहींतर नाहींच. आतांचा प्रसंग तसाच होता. नबाबपदावर खुद्द माझा हक्क असें जें **ड्युप्ली** गाणें गाऊं लागला होता तें सोडून देऊन **महंमदअल्लीच** नबाबी भोगूं दे असें म्हणता तर त्याचें केवढें हित झालें असतें ! त्याचे जे शूर शिपाई कैद होऊन पडले होते ते सुटून माघारे येते इतकेंच नव्हे, तर एक एक नवीन कारस्थान उभारण्याची जी त्याची लोकोत्तर बुद्धि होती ती चालवून तिच्या बळावर आपल्या पूर्व शत्रूंनां जर्जर करून सोडण्याची त्याला संधी आली असती. त्या कामांत त्याला यश येतें कीं नाहीं ही शंका एशियेंतील लोकांचा स्वभाव जाणणारा कोणी कांहीं घेणार नाहीं. केव्हांना केव्हां—बहुधा अगदीं अल्पकाळांत—उपकारकर्ते इंग्रज आणि त्या उपकारभाराखालीं वांकलेला **महंमदअल्ली** यांचा स्नेहसंबंध सुटून बेबनाव झाल्यावांचून रहाणार नाहीं हें अगदीं निश्चित होतें. तसा योग येण्याची वाट पहात, तोंपर्यंत आपली सांवरासांवर करीत, दम धरून, पुनः अंगांत बळ येईतों धीर धरून तो रहाता तर पुनः संधी येती आणि ती अशी तशी नव्हे, चांगलीच येती. अशा प्रकारचे कांहीं विचार **ड्युप्लीच्या** मनांत आल्यावांचून राहिले नाहींत; आले, परंतु अभिमानाचें प्राबल्य झाल्यानें त्यांचें कांहीं चाललें नाहीं.

---

आक्टोबर १८१३ ) लायप्झिग येथें त्याचा भयंकर पराभव होऊन त्याला मागें हटावें लागलें आणि शत्रूंच्या फौजा हळु हळु फ्रान्सांत शिरल्या. पुढें सन १८१४ च्या फेब्रुआरींत शाटेयाँ येथें परिषद भरली पण ती निष्फळ झाली. कारण तींत दोस्तराष्ट्रांचें म्हणणें असें पडलें कीं, सन १७९१ च्या पूर्वीं जी फ्रान्सची सरहद्द होती ती पुनः कायम करावी ( म्हणजे अर्थातच नवीन जिंकलेला सर्व मुलुख फ्रान्सनें सोडून द्यावा. ) मानधन नेपोलियनाला तें म्हणणें मान्य झालें नाहीं. तो म्हणाला " राज्य गेलें तरी बेहेत्तर, पण असल्या अपमानकारक अटी मी कबूल करणार नाहीं. "

गर्वाचें घर खालीं हें तर ठरलेलेंच आहे; त्याप्रमाणें झालें. **ड्युप्ली**चा गर्व ( pride )—त्याला अभिमान. अहंकार, दर्प, कांहीं म्हणा—जोरावला आणि तो त्याच्या नाशास कारण झाला.

**सद्रस** ( Sadras ) येथें चाललेलें तहाचें बोलणें जेव्हां निष्फळ झालें तेव्हां अर्थातच पुनः **त्रिचनापल्ली**पुढें युद्ध सुरूं झालें. त्यांत पहिल्याच झडपेला असा कांहीं चमत्कार झाला कीं, तहाच्या बोलण्यांत **ड्युप्ली** जो आग्रह धरून बसला होता तो योग्यच होता असें वाटूं लागलें. त्यालाही **ड्रेसडेन**च्या लढाईच्या वेळचा प्रसंग आला. **त्रिचनापल्ली**ला इंग्लिशांची रसद येत होती तिच्या संरक्षणार्थ ४ तोफा ८०० शिपाई आणि १८४ गोरे लोक होते. हे गोरे सामान्य शिपायांतले नव्हते. ते ग्रिनेडियर्स ( Grenadiers ) ( मोठे उंच, धिप्पाड ) **लॉरेन्स**च्या हाताखालचे, त्याच्या सर्व लढायांत पुढें असणारे, सर्व मारा सोसणारे म्हणून प्रसिद्ध असे होते. ह्या फौजेवर छापा घालून रसद मारावी असा **मेन्हिल**नें **मुराररराव** घोरपड्याच्या संमतीनें विचार ठरवून त्याप्रमाणें केलें. तो **त्रिचनापल्ली**पासून ७ मैलांवर **कंटपार** येथें २४० गोरे पायदळ, * ८० गोरे घोडेस्वार आणि ६००० शिपाई, एवढी फौज बरोबर घेऊन रसद येण्याच्या वाटेवर छपून बसला. तसाच **मुराररराव** घोरपडा जवळच आपले ३५०० स्वार घेऊन दाट झाडींत लपून राहिला. तारीख २६ फेब्रुआरी रोजचा हा त्यांचा छाप्याचा डाव उत्तम साधला. इंग्लिश फौज अडचणीच्या वाटेनें एकामागें एक अशी रांग लागून येत असल्यानें तिला एकल जमून आपला नीटसा बचावसुद्धां करतां येईना. जेथच्या तेथें उभें रहावें आणि लढत लढत मरावें याशिवाय त्यांनां दुसरा इलाजच उरला नाहीं. याप्रमाणें त्यांच्यावर जो स्वारांचा हल्ला झाला त्यांत ५० असामी मेले. इतक्यांत मागाहून फ्रेंच पायदळ आलें. त्यांनीं सांगितलें मुकाट्यांनीं शरण या आणि जीव वांचवा, उगाच मरूं नका. इंग्लिश शिपायांनीं तें मान्य केलें आणि लागलेंच १३४

---

* **लॉरेन्स** म्हणतो १२० फ्रेंच पायदळ, आमच्याकडचे पळून गेलेले दोन तुकड्या ( companies ) मिळून सुमारे १२० लोक, सुमारे ८० फ्रेंच घोडेस्वार, म्हैसूरचे आणि मराठ्यांचे सारे स्वार, मिळून एकंदर सुमारे १०००० सैन्य आणि ७ तोफा, एवढा तो जमाव होता.

असामी कैद म्हणून त्यांच्या स्वाधीन झाले; त्यांत १०० जखमी झालेले होते. त्या फौजेवरचे ४ इंग्लिश अम्मलदार मारले गेले, ३ कैद झाले आणि १ पळाला. ४ तोफा, सुमारें ७००० पौंड रोख पैसा आणि किल्ल्यांत कोठीकरितां येत असलेला सारा माल फ्रेंचांच्या हातीं लागला.

परंतु ह्या जयापासून कांहीं मोठासा उपयोग झाला नाहीं. बंदुक रंजुक प्याल्यासारखेंच झालें. तारीख २३ मे रोजीं दुसरा लढाईचा प्रसंग आला, तेव्हां फ्रेंचांची गोरी फौज ७०० असून तिच्या मदतीला काळी फौज पुष्कळ मोठी होती आणि शिवाय मराठे स्वारही होते. इंग्लिशांची फौज पुष्कळ कमी असून ही तिनें फ्रेंचांचा पराभव केला. तो प्रसंग असा होता कीं, त्या वेळेस फ्रेंच सैन्याला पुढें घालून नेणारा चांगला हुशार सेनापति असता तर त्या फार दिवस चाललेल्या युद्धाचा तत्काल शेवटचाच निकाल लागला असता; कारण त्यावेळीं इंग्रज कांहीं काळपर्यंत मोठ्या संकटांत होते. पराजय झाला म्हणून **ड्युप्ली** कांहीं डगमगला नाहीं. आतां त्याचे सारे उपाय थकले असा कांहीं प्रकार नव्हता. त्यानें **मेव्हिल**ला हुकूम केला त्याप्रमाणें वागून त्यानें मोठ्या चातुर्यानें फौज इकडून तिकडे फिरवून **किलकोटा** आणि **कोइलाडी** हीं दोन ठाणीं काबीज केलीं, आणि **मुराराव** घोरपड्यानें तंजावरच्या फौजेचा पराभव केला. याप्रमाणें रणांगणीं प्रयोग चाललेच होते. शिवाय **ड्युप्लीनें** **तंजावरास** जें कारस्थान चालविलें होतें तें बरेंच रंगास आलें होतें. त्यानें तेथच्या राजाला इंग्रजांकडून फोडून आपल्या पक्षाला मिळवून घेण्याची मोठ्या जारीनें खटपट चालविली होती ती बहुतेक सिद्धीस जाऊन ह्या अगदीं आणीबाणीच्या प्रसंगीं तो राजा इंग्रजांना सोडून देऊन फ्रेंचांना लौकरच जाऊन मिळतो असें दिसूं लागलें होतें. आपल्या बुद्धिप्रभावानें जुळवून आणलेलें कारस्थान इतकें रंगारूपाला आलें, आतां अगदीं अल्पकाळांत तें सिद्धीस गेलें म्हणजे आपले हेतु सफळ होतील अशा मनोराज्यांत **ड्युप्ली** अगदीं निमग्न होऊन गेला होता, इतक्यांत अकस्मात् त्याला अशी बातमी येऊन पोहोंचली कीं, उद्यां आपल्या हातचा सर्व अधिकार जाणार, आपल्या जागीं **मस्य गोडेहू** याची नेमणूक झाली असून तो इकडे येण्यास निघाला. **मस्य गोडेहू** पूर्वीं चंद्रनगरास होता. त्यावेळीं **ड्युप्लीनें** त्याच्यावर उपकार केले होते. पुढें तो स्वदेशीं परत जाऊन

फ्रेंच कंपनीच्या डायरेक्टर मंडळींत शिरला आणि आतां **पाँदीशरी**चा गव्हरनर होऊन **ड्युप्ली**ला हांकून लावण्याला आला. तो आणि त्याच्याच बरोबर **ड्युप्लीचें** दुर्दैव ज्या जहाजावर बसलीं तें तारीख १ माहे ऑगस्ट सन १७५४ रोजीं **पाँदीशरी**च्या बंदरांत येऊन दाखल झालें.

**ड्युप्ली** येवढ्या मोठ्या अधिकारपदावरून एकाएकीं भ्रष्ट कां झाला, त्यानें पाप तरी कोणतें केलें आणि त्याबद्दल त्याला काय काय प्रायश्चित्तें भोगावीं लागलीं ती कथा आतां येथून लागली. फ्रान्स देशापासून फार दूर, हिंदुस्थानांत व्यापार करून पैसा मिळवण्याकरितां जाऊन बसलेले आपले नोकर लोक, त्यांनां ज्या साठीं पाठविलें तें आपलें मुख्य काम सोडून इंग्रजांबरोबर वर्षांनुवर्षे सारखे लढत बसले आहेत. बरें त्या लढायांपासून मोठी कीर्ति, नांव, लौकिक किंवा कांहीं नफा तरी असावा, तर तेंही नाहीं; उलट व्यापारधंद्याच्या कामाला ती मोठी अडचण मात्र होऊन बसली आहे असें पाहून फ्रेंच कंपनी ऑफ धि इंडीज आणि फ्रेंच प्रधानमंडळ या उभयतांनां त्या लढाईचा अगदीं कंटाळा येऊन गेला होता. **ड्युप्ली**नें मनांत आणलेले बेत केवढे प्रचंड आहेत तें नीट नजर पुरवून त्यांनीं पाहिलें नाहीं, ते किती अवाढव्य आहेत याचें त्यांच्या बुद्धीला आकलन झालें नाहीं. त्याची दृष्टि फार दूर पोहोंचून भाविफलावर जाऊन बसली होती; त्यांनां पायाखालचें तेवढें दिसत होतें आणि सद्यःफल काय आहे एवढें ते पहात होते. तें कांहीं म्हणण्यासारखें चांगलें नव्हतेंच. आसमंतात् भाग त्यांच्या दृष्टीला भयाण दिसत होता. एक वर्ष गेलें, तसेंच दुसरें, तसेंच तिसरें, प्रत्यक्ष नफा पहावा तर कांहीं नाहीं असें दिसतांना त्यांच्या मनानें असें घेतलें कीं, फ्रान्सचा सारा पैसा आणि मनुष्यबळ फक्त एका मनुष्याची महत्वाकांक्षा पुरविण्याकडे आणि त्याचा बडेजाव, डामडौल, राखण्याखालीं चूर होऊन जात आहे. परंतु तो एक मनुष्य लोकोत्तर बुद्धीचा आहे—त्यानें आपल्या बुद्धिबलानें दक्षिण हिंदुस्थानांतल्या सर्व राजांत श्रेष्ठ, सहा सुभ्यांचा मालक, निजाम नामक जो दक्षिणेचा सुभेदार, त्याच्या दरबारांत आपलें वर्चस्व स्थापून त्याला आपल्या मुठींत ठेविलें आहे, त्याला आपल्या मर्जीप्रमाणें वागायाला लाविलें आहे, त्याच्याकडून **उत्तर सरकार** म्हणजे **गंजाम, विजागापत्तन, गोदावरी** आणि **राजमहेंद्री** व **मच्छलीपट्टणसह कृष्णा** हे प्रांत, त्याच्यावरचे सर्व स्वामित्वावर

उदक सोडवून फ्रान्सच्या नांवानें अगदीं मोफत, इनाम करून घेतले; हा मुलुख **पाँदीशरी**सभोंता, तिला अगदीं लगत असल्यानें फार महत्वाचा आहे.— त्यानें आपला केवढा तरी मोठा नफा आधींच करून ठेविला आहे, हें त्यांनीं कांहीं एक मनांत आणलें नाहीं. ते म्हणूं लागले आम्ही व्यापारी, राज्य मिळविण्याकरितां लढणारे शिपाई नव्हे; इंग्रजांबरोबर गोडीगुलाबीनें, सलुख्यानें राहून युरोप आणि दक्षिण हिंदुस्थान यांच्याशीं व्यापार करावा, स्वस्थपणानें पैसा मिळवावा तें सोडून त्यांच्याशीं स्पर्धा मांडून त्यांचा उच्छेद करण्याला उद्युक्त होण्याचें आमचें कांहीं अडलेलें नाहीं. आतां एवढें खरें आहे कीं, **ड्युप्लीनें** जे डाव मांडले होते ते जर फसले नसते, त्याला तत्काळ सारखा जय येत जाता, तर डायरेक्टरांचीं मनें सुप्रसन्न होतीं आणि त्याच्या कारस्थानांच्या फलाचा उपभोग घेण्याला ते खुष झाले असते. परंतु पहिल्यानें **लॉवर** गुदरलेला प्रसंग, मग **द ला तूश** आणि त्याच्यावरोबर पाठविलेले ७०० शिपाई यांची समुद्रानें घेतलेली आहुती, पुढें **आस्टुक, ब्रान्ये, मेव्हिल**, ह्या वीरांचे एकामागून एक होत गेलेले पराभव अशीं जीं एक एक अरिष्टें कोसळलीं, त्यांची वार्ता जेव्हां त्यांच्या कानीं गेली आणि ह्या युद्धप्रसंगांनीं आपल्या व्यापाराला मोठीच हरकत आली असें नजरेस आलें तेव्हां आपला हिंदुस्थानांत जाऊन रहाण्याचा जो मुख्य उद्देश तो बाजूस राहूं देणें बरें नव्हे असें त्यांस वाटलें आणि अखेर त्यांचा असा निश्चय ठरला कीं हल्लीं आपल्या नोकरांनीं जो मार्ग धरलेला आहे तो बरा नव्हे सबब त्यांनां हा सोडून देण्याला लावलेंच पाहिजे. मग त्यांनीं इंग्लिश ईस्ट इंडिया कंपनीकडे सामोपचाराचें बोलणें सुरू केलें. तुम्हीं आम्हीं स्नेहानें वागावें, व्यापार पाहिजे तितका करावा तें सोडून तंटे, बखेडे, लढाया कां मांडल्या आहेत, असें ते म्हणूं लागले तेव्हां इंग्लिश कंपनीचे डायरेक्टर्स म्हणाले आम्ही तेंच म्हणतों; आम्हाला कांहीं लढण्याची हौस नाहीं; परंतु तुमचा मुनीम **ड्युप्ली** आम्हांला चैन पडूं देत नाहीं तर आम्हीं काय करावें? हे सारे खेळ त्याचे आहेत, त्याचा बंदोबस्त करा म्हणजे आपोआप सारें थंडावतें आहे कीं नाहीं पहा. हें त्या डायरेक्टरांचें म्हणणें त्यांनां खरें वाटलें आणि त्यांच्या मनानें आधींच जो निश्चय केला होता तो अधिक दृढ झाला. युद्धाच्या, तंट्याबखेड्याच्या फंदांत पडावयाचें नाहीं, सरळपणानें, गरीबीनें वागावयाचें म्हटलें तर

आपला हल्लीं कामावर असलेला मुनीम कांहीं उपयोगीं नाहीं, त्याच्या हातून हें होणेंच नाहीं, याजकरितां त्याला एकदम काढून टाकलें पाहिजे असें त्यांनीं ठरविलें. शांतता न रहाण्याला कारण **ड्युप्ली** असें डायरेक्टरांचे मनानें घेतलें; त्यांनीं लागलेंच त्याला काढून टाकण्याचें आणि इंग्रजांबरोबर एकी करण्याचें ठरविलें. **ड्युप्ली**च्या तर्फे कोणी असें बोलला कीं, लढाईला कारण काय तो **ड्युप्ली**, तो तंटेखोर, आणि **सॉण्डर्स** मोठा सात्विक, तो कांहीं करीत नाहीं असें म्हणणें कांहीं बरोबर नाहीं; तो कांहीं **ड्युप्ली**पेक्षां दोषाला अधिकारी कमी नाहीं. परंतु त्याचें बोलणें कोणी जमेस धरीना. त्यावर इंग्रज डायरेक्टरांचें जें उत्तर होतें तेंच खरें, अगदीं वाजवी, असें ठरलें. ते म्हणाले आमच्या **सॉण्डर्स**कडे कांहीं दोष नाहीं; तुमचा **ड्युप्ली** आधीं कांहीं तरी कुरापत काढतो, तेव्हां मग त्याला गप्प बसतां येत नाहीं, प्रतिकार करावा लागतो. असल्या भांडणांत कोणीतरी एक अपेशाला धनी व्हावा लागत असतो; तो **ड्युप्ली**च करून अखेर त्याच्या डोक्यावर खापर फोडण्याचें ठरलें. त्याप्रमाणें होऊन त्याच्या जागेवर **गोडेहूची** लागलीच नेमणूक झाली.

**गोडेहू ड्युक द बुर्गॉज** Duc de Burgogue नामक जहाजावर बसून निघाला. तें जहाज ता. १ माहे ऑगस्ट रोजीं **पाँदीशरी**च्या बंदरांत येऊन नांगरलें हें वर सांगितलेंच आहे. **गोडेहू**वर मागें आपण उपकार केलेले आहेत, त्याचें आपलें काहीं वैमनस्य नाहीं, आपल्याविषयीं त्याचें अंतःकरण शुद्धच असेल असें समजून **ड्युप्ली** त्या आपल्या जुन्या मित्राला भेटण्याकरितां लागलाच त्या गलबतावर गेला; भेट झाली, परंतु **गोडेहू**नें त्याचें स्वागत मोकळ्या मनानें केलें नाहीं. तो अगदीं बांकून होता. **ड्युप्ली**नें त्याला आपल्या घरीं चला म्हटलें तें त्यानें मान्य केलें नाहीं; इतकेंच नव्हे, आपल्याकरितां स्वतंत्र घर तयार होईपर्यंत आपण गलबतावरून खालीं उतरणार नाहीं असें सांगितलें. त्यानें **ड्युप्ली**च्या हातांत तेथेंच तीन कागद दिले. त्यांपैकीं एकांत असें लिहिलें होतें कीं, आपल्या जागेवर मी आलों म्हणून आपल्याला वाईट वाटूं नये; आपल्याला दुःख न होई असें माझ्या हातून जितकें होईल तितकें वागण्याचा मी यत्न करीन. दुसऱ्यांत असें लिहिलें होतें कीं, आपल्या कंपनीच्या व्यापाराची वगैरे स्थिति कशी आहे ती इत्थंभूत हकीगत लिहून द्यावी. तिसरा

कागद **ड्युप्ली**ला स्वदेशीं परत येण्याबद्दल हुकूम होता. दुसऱ्या दिवशीं **गोडेहू** गलबतावरून उतरला तो थेट कौन्सिल बसण्याच्या दिवाणखान्यांत गेला. लागलाच तेथें त्यानें आपल्या नेमणुकीचा हुकूम वाचवला. तें वाचन पुरें झाल्यावर सारे अगदीं स्तब्ध बसले. कोणी कांहीं बोलेना मग **ड्युप्ली**च उठला, परंतु त्यानें कांहीं दुःखोद्गार किंवा रोषोद्गार काढले नाहींत. Vive le Roi हे राजनिष्ठादर्शक शब्द मात्र मोठ्यानें उच्चारले.

**गोडेहू ड्युप्ली**चे हिशेब तपासूं लागला तें काम पुरें होईपर्यंत दहा आठवडे त्याला **पाँदीशरी**स रहावें लागलें. **ड्युप्ली**नें आपला खासगत पुष्कळ पैसा कंपनीला लागला तसतशा रकमांनीं कर्जाऊ दिला होता. त्याचा हिशेब पहातां कंपनीकडे त्याचें येणें २४०००० पौंडावरच निघूं लागलें. हें कळतांच **गोडेहू**नें ते हिशेब तपासणाऱ्या Commassaries असामींस सांगितलें काम बंद करा, पुढें पहाण्याचें कांहीं कारण नाहीं. **ड्युप्ली**नें जे दाखले, दस्त वगैरे (Vouchers) हजर केले आहेत त्यांतील रकमांचा संबंध सरकारी कामगिऱ्यांशीं (public service) होता असा त्यांवर शेरा मारून टाका. झालें, त्याप्रमाणें शेरे मारून त्यानें कंपनीनें **ड्युप्ली**चें इतकें देणें निघतें असा तिच्या दप्तरीं दाखला देखील राहूं दिला नाहीं. त्याचा उद्देश **ड्युप्ली**ला नुसतें तुच्छ करण्याचा नव्हे, तर त्याचा अगदीं नाश करण्याचा असावा असें स्पष्ट दिसून आलें. **ड्युप्ली**चें कंपनीकडे येणें असलेलें कर्ज बुडालें तेवढ्यावरच भागतें तर पुरवतें. परंतु तसें झालें नाहीं. **ड्युप्ली**नें जे राजेरजवाडे फ्रेंच सरकारचे दोस्त केले होते, ज्यांच्याशीं त्याचा स्नेह होता, त्यांनां तो आपल्या खासगी मिळकतींतून कर्जाऊ म्हणून मोठमोठ्या रकमा देत असे, आणि त्यांच्या फेडीला त्यांच्याकडून कांहीं मुलुख लावून घेत असे; त्याच्या उत्पन्नांतून त्याचें रदकर्ज होत असे. त्याप्रमाणें **गोडेहू पाँदीशरी**स आला तेव्हां त्याचें कांहीं कर्ज वसूल झालें होतें परंतु अद्याप पुष्कळ वसूल व्हावयाचें राहिलें होतें. जमिनीच्या उत्पन्नांतून फेड व्हावयाची म्हणजे अर्थातच पीक येईल तेव्हां म्हणजे पुढच्या वर्षीं वसूल व्हावयाचा आणि मग तो **ड्युप्ली**च्या पदरांत पडावयाचा होता. **गोडेहू ड्युप्ली**चा नाश करण्यासच प्रवृत्त झालेला असल्यानें त्याला अनायासें ही संधी उत्तम सांपडली. **ड्युप्ली**चीं अस्सल खतेंपत्रें त्याच्या ज्या एतद्देशीय

गुमस्त्याजवळ होतीं त्याला **गोडेहूनें** धरून कैद केलें आणि ते दस्तैवज त्याजवळून हिसकून घेऊन असें सांगितलें कीं **ड्युप्लीनें** जो या कुळांनां पैसा दिला तो सरकारच्या हिताकरितां नसून आपली तुंबडी भरण्याकरितां दिला होता सबब त्याला त्यापैकीं कांहीं मिळणार नाहीं. **ड्युप्लीची** देणें असलेली कांहीं रक्कम फेडण्याकरितां कंपनीनें त्याच्या नांवानें एक हुंडी ( bill ) दिली होती ती **पाँदीशरीस** लागू होऊन त्याला रोख पैसा मिळावयाचा होता, परंतु त्यानें तोही मिळावयाचा नाहीं असें सांगितलें. ज्यानें फ्रान्स देशाला एक मोठें थोरलें राज्य अगदीं बहुतेक मिळवून दिल्यासारखें झालें होतें त्या मनुष्याला **गोडेहूनें** याप्रमाणें सफाई बुडवून आतां येथून चालता हो असें सांगितलें. त्यानें त्याला भिकस लावलें, पुढची कांहीं आशा उरूं दिली नाहीं, त्यानें आजपर्यंत जे अव्याहत परिश्रम केले त्यांचीं फळें पाडास यावयास झालेलीं तोंडांत पडूं दिलीं नाहींत, असा सर्वस्व नाश झाला परंतु तशानें कांहीं त्याची अपकीर्ति झाली नाहीं.

**एम. झेव्हिअर रेमॉन्ड** यानें हिंदुस्थानावर एक उत्कृष्ट पुस्तक लिहून पारीसमध्यें तें सन १८५३ मध्यें प्रसिद्ध केलें. त्यांत त्यानें असें म्हटलें आहे— इंग्लंडनें हिंदुस्थानांत अफाट राज्य संपादलें आणि एवढ्या मोठ्या विस्तीर्ण प्रदेशावर अम्मल चालविण्याला कांहीं शेंकडे मुलकी कामगार आणि त्याच्या बंदोबस्ताला कांहीं हजार शिपाई ठेवून ४००० लीग म्हणजे १२००० मैल दूर आपण असून तेथून त्याचा राज्यकारभार कसा चालवितां येईल ह्या बिकट प्रश्नाचा उलगडा करून दाखविला याबद्दल त्याजकडे बोट दाखवून त्याची वारंवार मोठी तारीफ होत असते. ती योग्यच आहे, परंतु ही गोष्ट जर कांहीं मोठी आश्चर्य करण्यासारखी असेल, ही मोठ्या धाडसाची आणि साहसाची असेल, हींत जर कांहीं मोठेंसें राजकारणपटुत्व आणि बुद्धिचातुर्य असेल तर ती प्रथम मनांत आणून त्याप्रमाणें हातानें करून दाखविल्याचें सारें श्रेय **ड्युप्लीला** आहे. तो पराक्रम त्याचा आणि त्याजबद्दलचा मान त्यालाच देणें योग्य आहे. हिंदुस्थानांतल्या अफाट राज्यापासून प्राप्त होणारी संपत्ति आणि वैभव यांचा हल्लीं इंग्लंड उपभोग घेत आहे, परंतु त्यासाठीं त्याला फ्रान्सच्या एका बुद्धिमान पुरुषानें जो मार्ग दाखवून दिला तो धरूनच चालावें लागत आहे. होय, खचित असेंच. हें

म्हणणें अगदीं बरोबर आहे. शंभर दीडशें वर्षें होऊन गेलीं, त्या काळची धामधूम आणि त्या वेळची उभय राष्ट्रांच्या लोकांची एकमेकांविषयीं द्वेषबुद्धि आणि तिरस्कारबुद्धि आतां पार नाहींशी होऊन गेली आहे अशा वेळीं—ज्या गोष्टी प्रत्यक्ष घडून आल्या त्या जमेस धरून त्यांवरून, हिंदुस्थान देशांत युरोपियन लोकांचें राज्य स्थापन करण्याच्या कामीं जे पुरुष अग्रेसर होते त्यांच्या मनांत काय काय गोष्टी आल्या असतील, त्यांचे विचार काय होते याचा शांतपणें, स्वस्थ मनानें विचार करतां येईल अशा वेळीं–हिंदुस्थान देश युरोपियन लोकांच्या अमलांत कशा प्रकारें आणतां येईल तें प्रथम **डुप्ली**च्याच ध्यानांत आलें, त्यानेंच ती युक्ति, तो मार्ग दाखविला हें कोणीही खरा निर्मळ अंतःकरणाचा इंग्रज नाकबूल करणार नाहीं. त्यानें जें काम केलें—जें राज्य उभारलें—तें टिकलें नाहीं याचें कारण केवळ त्याचें दुर्दैव. त्याच्या कमनशिबामुळें त्याला यःकश्चित माणसें हाताशीं धरून त्यांच्याकडून कसेंबसें, होईल तसें काम करून घ्यावें लागत होतें आणि त्याच वेळीं त्याच्या प्रतिस्पर्ध्यांच्या सुदैवानें त्यांच्याकडे विलक्षण कर्तृत्ववान पुरुष जमले होते. तें न टिकण्याचें दुसरें कारण त्यानें जे एक एक विलक्षण डाव केले होते ते साधून त्यांचीं फळें परिपक्क होण्याचा समय असा अगदीं जवळ येऊन ठेपतो आहे अशा संधीस फ्रान्सनें आपल्या हाडवैरी शत्रूच्या शब्दावर पूर्ण विश्वास ठेवून त्याच्या ठुमणीनें त्याला पदभ्रष्ट करून हिंदुस्थान सोडून निघून येण्याला सांगितलें. ती संधी आणखी अशी विलक्षण होती कीं, त्यावेळीं युरोपांत त्याच शत्रूबरोबर मोठें घोर युद्ध सुरू होण्याची अगदीं घटका घातलेली होती आणि तें सुरू झाल्यावर पुढें सात वर्षेंपर्यंत फ्रान्साला हात दाखवण्याला त्याला आपलें सर्वस्व खर्चीं घालावें लागणार होतें. अशा समयीं **डुप्ली** आपल्या जागेवर असता तर मोठे चमत्कार झाले असते. परंतु तो गेला तरी त्यानें जे बेत योजले होते त्यांचे परिणाम त्याच्या पश्चात ही व्हावयाचे तसे झाले. हिंदुस्थानांत युरोपियन राज्यवृक्ष लागू होण्याला जमीन हवी तशी सुपीक आहे ही तिची परीक्षा करून, ती नांगरून, कष्ट मशागत करून, बीं पेरून, पाणी पाजून, त्यानें मळा तयार केला; आणि तो जाण्याबरोबर तो आयताच त्याच्या शत्रूंच्या हातीं पडला. त्याला फुलाफळांचा बहार कसा येत गेला तें पाहून सारें जग आश्चर्यचकित होऊन गेलें आणि सांप्रत काळीं ते त्या मधुर फळांचा रसास्वाद आकंठ सेवन करीत आहेत.

**गोडेहू** हिंदुस्थानांत यावयास निघाला आणि त्याच्या मागोमाग २००० फ्रेंच फौज रवाना झाली ती तो **पाँदीशरीस** येऊन गव्हरनर होऊन बसल्यावर थोड्याच दिवसांत तेथें दाखल झाली. **ड्युप्ली**जवळ किती थोडें सैन्य असे आणि हजाराचें नांव नकोच, थोड्याशा शेंकड्यांच्या वळावर तो केवढालीं मोठालीं कामें अंगावर घेत असे आणि तेवढ्यांवरच त्यानें काय काय चमत्कार केले याचा विचार करूं लागले म्हणजे फ्रान्सनें आपलें हित साधण्याकरितां जे लोक हिंदुस्थानांत पाठविले त्यांत एक मनुष्य अगदीं अयोग्य, केवळ नालायक, अतएव पाठविलें नसतें तर फार बरें झालें असतें असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. असा हा अद्वितीय मनुष्य कोण म्हटलें तर खुद्द **गोडेहू**साहेब. या वेळेस ही मूर्ति जर इकडे आली नसती आणि **ड्युप्ली** जर अधिकारावरून निघाला नसता तर आतां आलेले हे दोन हजार शिपाई त्याला फ्रेंचांचें वर्चस्व पुनः स्थापन करण्याला पुरे होते. कारण ही वेळच अशी सोईची होती. या वेळीं **क्लाइव्ह** येथें नव्हता, स्वदेशीं निघून गेला होता, आणि **लॉरेन्स** असून नसल्यासारखा, प्रकृति बिघडली असल्यामुळें कामाच्या उपयोगीं नव्हता. सन १७५६ मध्यें इंग्लंड आणि फ्रान्स यांच्यामध्यें युद्ध सुरू झाल्याचें वर्तमान श्रवण करतांच त्याला खुद्द **मद्रास**वर हल्ला—पुढें **लालीनें** केला तसा—करण्याची देखील बुद्धि झाली असती.

**ड्युप्ली पाँदीशरी**हून निघून न जातां आणखी थोडे आठवडेपर्यंत तेथेंच असता तर आम्ही म्हणतों असें होण्याचा अगदीं संभव होता. तो हिंदुस्थानास शेवटचा सलाम ठोकून चालता होऊन पंधरा दिवस होतात न होतात तों त्याच्या नांवानें फ्रान्सांतून मस्य **द माशोल** M. de Machault तेथचा जमाखर्चनियंता, ( Controller of Finances ) याजकडून **पाँदीशरीस** एक खलिता आला; त्यांत त्याला गव्हरनर आणि **गोडेहू**ला नुसता कंपनीचा कमिसरी Commissary असें म्हटलें होतें. त्याचें काम फक्त तहाबद्दल बोलणें करण्याचें होतें. फ्रान्सच्या लांचखाऊ, भ्रष्ट ( Corrupt ) दरबारांत **मा शोल** हा एक प्रामाणिक, सच्चा मनुष्य होता. त्याला **गोडेहू** निघून गेल्यावर थोड्याच वेळांत अशी भ्रांति वाटूं लागली कीं, **ड्युप्ली**ला अधिकारावरून दूर करणें कांहीं बरें नव्हे. यापासून परिणामीं दक्षिण हिंदुस्थानांत फ्रान्सचें नुकसान

झाल्यावांचून रहाणार नाहीं. म्हणून **गोडेहू**वरची जबाबदारी नियमित करून, म्हणजे त्याला केवढ्या कामापुरता किती अधिकार तें ठरवून **ड्युप्ली**लाच गव्हरनरपदावर ठेवावें म्हणून त्यानें आपली भींड खर्चून अगदीं शिकस्त केली असावी असें मानण्यास आधार आहे. परंतु **मारोल** साहेबाचें हें कृत्य बऱ्याच उशिरानें, खरी वेळ निघून गेल्यावर झालें. त्याचा खलिता आक्टोबर महिन्याच्या अखेरीस **पाँदीशरीस** येऊन पोहोंचला. त्यापूर्वीं बरेच दिवस, तारीख १४ रोजीं **ड्युप्ली पाँदीशरी**हून निघून युरोपास चालता झाला होता. त्यानें आपल्या हाताखालच्या मंडळीच्या साहाय्यानें फ्रान्सदेशाकरितां संपादन केलेल्या स्थळोस्थळीं त्याला अधिकारावरून काढल्याची बातमी जेव्हां पसरली तेव्हां तेथच्या लोकांच्या मनांत भीति, दहशत आणि खिन्नता उत्पन्न झाली. हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत ठिकठिकाणीं जे फ्रेंच कंपनीचे मुनीम ( Agents ) होते त्यांनां हुकूम पाठवून **गोडेहू**नें असें कळविलें कीं या देशाच्या राजेरजवाड्यांच्या कामकाजांत ढवळाढवळ करण्याचा कांहीं माझा उद्देश नाहीं. परंतु त्यांच्या मनांत जें भय उत्पन्न झालें होतें तें कांहीं तशा लिहिण्यानें शमलें नाहीं. **ब्यूस्सी औरंगाबादेस** आणि **मोराकिन** उत्तरसरकार प्रांतांत होता त्यांनां तुम्ही आपले इकडे निघून या असें कांहीं त्यानें लिहिलें नाहीं. तो इतक्या पल्ल्याला गेला नाहीं हें अगदीं खरें; परंतु त्या उभयतां अम्मलदारांनां असें वाटूं लागलें कीं, ह्या नव्या गव्हरनर साहेबांच्या हाताखालीं काम करणें आपल्याला मोठें जड जाईल. म्हणून ते राजीनामे देण्याला सिद्ध झाले; ते आम्ही आतां येथें रहात नाहींच म्हणाले. परंतु **ड्युप्ली**नें त्यांची अगदीं विनवणी करून, मोठ्या आर्जवानें त्यांनां रहातें केलें. **ड्युप्ली**च्या विनंतीपत्राला **ब्यूस्सी**नें जें उत्तर पाठविलें तें वाचलें म्हणजे तो **ड्युप्ली** आपला अधिकार वर्तावितांना किती थोर तत्वानुरोधानें चालत होता आणि त्याचे हुकूम जे लोक अमलांत आणीत असत त्यांची त्याच्यावर किती प्रीति जडलेली होती तें चांगलें दिसून येतें, आणि तें दाखविणाऱ्या तसल्या आणखीही पुष्कळ गोष्टी आहेत. **ब्यूस्सी** म्हणतो आपल्या तारीख ४ च्या कृपापत्राचें मी उत्तर लिहितों. आपण युरोपाला जाण्यास निघालां हें वर्तमान कानाला आकाशांतून अकस्मात् वीज कडकडून पडल्याप्रमाणें भासलें. तें ऐकून मी अगदीं गांगरून गेलों, माझें देहभान उडून जाऊन मला भीतीनें

धडकी भरली. तुम्ही तर जाण्याला निघालां आणि मला म्हणतां स्वराष्ट्राची सेवा करीत रहा. जें कार्य आतां डबघाईस आलें आहे, विलयास जाणार असें दिसूं लागलें आहे तें सांवरून धर असें मला सांगता. तर आतां तुमची जी अप्रतिष्ठा होत आहे तोच प्रसंग माझ्यावर येणार नाहीं असें तुम्हाला खरेंच वाटतें कीं काय ? कदाचित् तो वज्रपात आज नाहीं आणखी कांहीं काळानें होणार असेल, किंवा आघात खूप जोरानें व्हावा म्हणून हात जरा आवरून धरलेला असेल. तें कसेंही असो, जें घडावयाचें असेल तें घडो. परंतु तुमच्या वचनाच्या बाहेर पाऊल टाकूं नये, तुमच्या विचाराला अनुसरून वागावें, हें आपलें कर्तव्य असेंच मी आजपर्यंत समजत आलों आहें. तर कसाही प्रसंग आला तरी आपल्यावर माझी जी निश्चळ प्रीति आणि भक्ति आहे ती कधींही ढळणार नाहीं. तिच्यायोगानें तर माझें आतांपर्यंतचें सुख आणि वैभव मी उपभोगीत आहें. **गोडेहूचें** उत्तर काय येतें तें पहातों आणि मग त्याप्रमाणें पुढें काय करावें तो मी आपल्या मनाशीं निश्चय करीन. हल्लीं मी आहें ह्या जागेवर असून मला जर आपल्या विचाराप्रमाणें वागण्याची मोकळीक रहाणार नाहीं; अज्ञान, गैरमाहीत, अनुभवशून्य, अशा मनुष्यांच्या समजाप्रमाणें मला काम करण्याला लावण्याचा जर प्रयत्न होईल, माझे हात असे जखडतील, तर माझें काम माझ्या हातांत असतांच विलयास जाईल. याप्रमाणें लिहून **ब्यूस्सोनें** पुढें शेवटीं आणखी असें म्हटलें कीं, आतां काम सोडून फ्रान्स देशाला चालतें व्हावें हें बरें असें माझें मन जरी मला सांगत आहे तरी ज्याला आजपर्यंत मी इतर सर्व मनुष्यांपेक्षां श्रेष्ठ मानीत आलों आणि ज्याच्याविषयीं माझी पूज्यबुद्धि आहे, तो जो बुद्धिवाद सांगेल त्याप्रमाणेंच मी अगदीं मुकाट्यानें वागेन. हें उत्तर वाचून **ड्युप्लीनें** त्याला रहाण्याविषयीं पुनः आग्रहपूर्वक लिहिलें आणि तें मान्य करून तो राहिला.

**गोडेहूनें** येऊन आधीं **ड्युप्लीनें** उभारलेली राज्यरूपी टोलेजंग इमारत धुळीस मिळविली आणि मग त्यानें घालून ठेवलेल्या पायावर नवी हवेली उठवण्याचा दोन वेळ प्रयत्न केला ती हकीगत आतां येथून पुढें सांगावयाची. परंतु तत्पूर्वीं जो थोर कीर्तिमान पुरुष एकाएकीं उच्चपदावरून भ्रष्ट होऊन स्वदेशीं निघून गेला त्याची तिकडे अवस्था काय झाली तें सांगून त्याचें चरित्र समाप्त करूं.

**ड्युप्ली** गव्हरनरपदाधिकारास योग्य नाहीं, त्याला काढावा, अशा आग्रहास पडून ज्यांनीं त्याला त्या जागेवरून दूर करण्याचा हुकूम दिला त्यांपैकींच कांहींनां तो **पाँदीशरी** सोडून घरीं येत आहे ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे असें वाटूं लागलें, आणि कांहीं कालपर्यंत त्याला तूं आपल्या जागीं परत जा असा हुकूम होणें असंभवनीय नाहीं असेंही दिसूं लागलें. हें आश्चर्य वाटण्यासारखें दिसतें; परंतु असें घडून आलें खरें, आणि त्यामुळें तो स्वदेशीं पोहोंचला तेव्हां त्याचा योग्य आदरसत्कार झाला आणि तुझें जें काय कंपनीकडे येणें निघत असेल त्याचा लौकर निकाल होईल असें त्याला वचनही मिळालें. परंतु पुढें लौकरच त्याच्या मागोमाग **गोडेहूचीं** पत्रें आलीं आणि त्यानें तेथच्या इंग्लिशांशीं तह केल्याची बातमी आली त्याबरोबर पारडें फिरून लागलीच अधिकारी मंडळीच्या मनाची चलबिचल झाली तसा त्यांचा रोख बदलला. मग तोच **ड्युप्ली** त्यांनां आपल्यापुढें येऊन माझ्या देण्याचा विचार करा अशी नम्रतेनें विनवणी करणारा अर्जदार दिसूं लागला आणि त्याच्या देण्याची मोठी थोरली रकमही आपल्या तिजोरीवर एक जबरदस्त धोंड येऊन पडत आहे असें वाटूं लागलें. तशांत **ड्युप्लीनें** आपलें येणें म्हणून जी रक्कम मागितली· ती खरीच देणें असल्याचा माझ्या मनाला पटे असा पुरावा त्याच्याकडून झाला नाहीं असा **गोडेहूचा** रिपोर्ट आला; तो पाहून त्यांनां चांगलाच जोर आला. मग त्या आधारावर त्यांनीं त्याला सांगितलें कीं, आम्ही तुझें कांहीं देणें लागत नाहीं आणि तुझ्या नुकसानीबद्दल म्हणूनही तुला कांहीं मिळणार नाहीं. हें उत्तर ऐकून त्याला फार वाईट वाटलें. असा अन्याय करूं नका, माझें फार नुकसान होत आहे याचा कांहीं तरी विचार करा, माझी कांहीं तरी दया येऊं द्या, असें अगदीं काकुळतीस येऊन त्यानें पुष्कळ सांगितलें, त्यांचीं पुष्कळ आर्जवें आणि विनवणी केली, परंतु व्यर्थ. त्यांनां कांहीं द्रव आला नाहीं. सावकार मला चैन पडूं देत नाहींत, अगदीं सारखे छळीत आहेत, त्यांच्या जाचांतून मला सोडवा. ते माझे सावकार असें मीं म्हणावयाचें इतकेंच, वास्तविक पहातां ते तुमचेच सावकार आहेत. त्यांनीं माझ्या पतीवर, माझ्या जामिनगतीवर, तो सारा पैसा सरकारलाच कर्ज दिलेला आहे असें सारखें सात वर्षें त्यानें आपलें रडगाणें चालविलें होतें, परंतु तें केवळ अरण्यरोदन झालें. तो आपल्या देण्याबद्दल जो पुरावा दाखवीत होता

तो अगदीं मजबूद होता, त्यांत शंका काढण्यासारखें कांहीं नव्हतें. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. बिचारा फुकट बुडाला.

ड्युप्लीचें अतोनात नुकसान झालें, तें उगाच नांवाला, थोडें तरी भरून मिळण्याचें मनांतसुद्धां आणावयास नको एवढेंच होऊन राहिलें नाहीं. जे लोक त्याचे स्नेही म्हणवीत होते, जे त्याच्या जिवावर मोठे संपत्तिमान होऊन बसले होते, ते त्याला आतां ओळखीनासे झाले. ज्या सरकाराची त्यानें इतक्या इमानें इतबारें, एकनिष्ठपणें सेवा केली, तेंच त्याच्यावर फिरलेलें जेव्हां त्यांनीं पाहिलें तेव्हां ते सारे त्याच्यापासून भराभर दूर झाले, त्याच्याकडे कोणीएक फिरकेना. तो शेवटीं किती निकृष्ठावस्थेला पोहोंचला असावा याचें आम्हाला कांहीं नीटसें वर्णन करतां येणार नाहीं म्हणून इतकेंच सांगतों कीं, त्यानें प्राणोत्क्रमणापूर्वी तीन दिवसांखालीं स्वहस्तें आत्मचरित्रांत जो लेख लिहून ठेविला तो पुढें देतों, तो वाचला म्हणजे त्याच्या विपत्तीचें चित्र सहजच डोळ्यांपुढें उभें राहील. तो लेख असा आहे—एशियाखंडांत आपल्या ( फ्रेंच ) राष्ट्राला कनकमय करावें म्हणून मीं आपलें तारुण्य, धनसम्पत्ति, जीवित, आयुष्य, यावर उदक सोडून तें त्याला अर्पण केलें. मीं जे जे बेत केले ते सिद्धीस जावे म्हणून माझे दुर्दैवी मित्र आणि अत्यंत दुर्बळ आप्तमंडळी यांनीं आपली काय चीजवस्त होती ती सर्व त्या कामीं लावण्याला माझ्या पदरांत टाकली. आतां ते सर्व धुळीस मिळून जाऊन हालअपेष्टेंत आणि दारिद्र्यांत दिवस काढीत आहेत. आमच्या न्याय-दरबारांत दाद लागण्याला जे जे प्रकार आणि उपचार करावे लागतात ते सर्व करून मी भागलों. आतां कंपनीचा सावकार एकच, मी एवढा उरलों आहें, तर माझें देणें आहे तेवढें भागवून टाका अशी विनवणी केली. असें असतां मीं जी नोकरी बजावली, ज्या विलक्षण गोष्टी केल्या त्या सांगितल्या तर त्यांन केवळ मनःकल्पित कादंबरीसारख्या वाटतात आणि मी जें आपलें कर्ज येणें म्हणून मागतों त्याचा उपहास होऊन मला वाटाण्याच्या अक्षता लागतात. मानवजातींतल्या अतिनीचांत माझी गणना होत आहे. माझ्या दारिद्र्यदुःखाची परमावधि झाली आहे. माझ्याजवळ जें थोडें खिडुकमिडुक राहिलें होतें तें जप्त होऊन गेलें आणि आतां मला तुरुंगांत जावें लागणार, तेवढा सोहळा होऊं नये म्हणून जरा दम धरा अशी विनवणी करणें माझ्या कपाळीं आलें आहे.

फ्रान्स देशाला हिंदुस्थानचें साम्राज्य प्राप्त करून देण्याचा संकल्प करून ज्या पुरुषानें आविश्रांत परिश्रम केले त्यानें हा लेख लिहून ठेवल्यावर तीन दिवसांनीं इहलोकची कष्टमय जीवितयात्रा संपविली. त्यानें जो मजबूद पाया घातला होता त्यावर जर तशीच राज्यरूपी टोलेजंग इमारत उठती तर फ्रान्स पूर्वेकडे हवेंतें कर्तुमकर्तुं समर्थ झालें असतें. जशी मनुष्यांनां तशी राष्ट्रांनां आकाबाई ग्रासण्यास उभी राहते तेव्हां त्यांच्या अंगांत वेड संचरत असतें. तसें सन १७५४-५-६ मध्यें फ्रान्स दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडलें होतें. जो शत्रु त्याचें निर्दलन करण्याला संधी केव्हां सांपडेल म्हणून अहोरात्र डोळ्यांत तेल घालून टपून बसलेला होता त्याचाच कानमंत्र खरा मानून त्यानें तो पाया रचणाऱ्या, मोठ्या बुद्धिमान, दीर्घ-दृष्टि, चतुर कारागिराला तेथून उचलून टाकलें, त्यानें वर आणलेलें काम मोकळें टाकलें आणि तेथचा पहारा उठविला. शत्रूला हवें होतें तेवढें याप्रमाणें घडून येतांच आपलें काम झालें म्हणून हर्षभरित होऊन त्यानें लागलेंच त्या कारागिरानें आंखलेले तेच त्याचे बेत कायम करून त्यानें घातलेल्या त्याच पायावर झपाट्यानें मोठी भव्य इमारत बांधण्यास सुरवात केली तेव्हां फ्रान्साचे डोळे उघडले आणि आपण मोठी चूक केली म्हणून हळहळ सुरू झाली. परंतु इतकें होईतों तिकडे तो अद्वितीय कारागीर अवहेलना झाल्यानें हालअपेष्टेंत कांहीं काळ कंठून तळतळत मरून गेला. त्याची अखेरपर्यंत फ्रान्सच्या दरबारांत दाद लागली नाहीं.

तारीख १० नोव्हेंबर सन १७६४ इसवी रोजीं **ड्युप्लीचें** देहावसान झालें. त्यावेळीं त्याच्या समकालीन लोकांनीं जरी त्याची योग्यता ओळखून त्याचा करावा तसा मान केला नाहीं तरी तो फ्रान्स देशांत जे फार थोर पुरुष होऊन गेले त्यांपैकींच एक होय अशी त्याची कीर्ति चिरकाल राहील. तो अधिकारभ्रष्ट होऊन गेला म्हणून ज्यांनां आपला नफा करून घेतां आला ते त्याचे प्रतिस्पर्धी देखील त्याची खरी योग्यता ओळखून त्याला **क्लाइव्ह, वॉरन हेस्टिंग्ज** आणि **वेलेस्ली** यांच्या बरोबरीचा, त्याची पायरी त्यांच्या खालची असें म्हणावयाचेंच असल्यास ती किंचित् सखल मानांवी असें म्हणतात. मोठी भव्य, अचाट कल्पना मनांत आणून राज्यस्थापनेचा प्रचंड व्यूह प्रथम त्यानें रचला. त्याच्या कृति पाहूनच मग त्याच्या शत्रूंनां तशी बुद्धि झाली. तेव्हां त्यांनां प्रेरणा—कदाचित नकळत—करणारा तोच असें म्हणावें लागतें.

# भाग १२ वा.

## अखेर. सर्वस्वनाश.

**ड्युप्ली** निघून गेला. त्याला घालवून लावून त्याच्या उच्चासनावर बसून **गोडेहू** राज्याधिकार चालवूं लागला. त्या उभयतांमध्यें अंतर केवढें होतें म्हणून पाहूं गेलें तर जमीन आणि अस्मान, किंवा पूर्व आणि पश्चिम, अथवा उत्तर आणि दक्षिण ध्रुव, यांच्यामध्यें असतें तितकें, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. **गोडेहू** इकडे येण्यास निघाला तो एक काम पत्करून तें खास करतों म्हणून आला होता. तें काम एवढेंच होतें कीं इंग्रज आणि एतद्देशीय राजेरजवाडे यांजबरोबर कसेंही करून तह करावयाचा, त्यांत कितीही नुकसान झालें तरी हरकत नाहीं. हें अंगीकृत कार्य त्यानें इंग्रजांनां मोठा संतोष वाटावा, हर्ष व्हावा, अशा प्रकारें करून टाकलें. इंग्रजांनीं आपल्याला कर्नाटकचा नवाब म्हणावें ही जी **ड्युप्ली**ची मुख्य शर्त होती तेवढी त्यानें सोडावी, म्हणजे मग त्याचें बाकीचें सारें म्हणणें मान्य करतों असें म्हणून मद्रासचा गव्हरनर **सॉण्डर्स** तह करण्यास कबूल होता. **ड्युप्ली** तेवढें मान्य करीना म्हणून ओढाताण चालली होती. अशाखालीं थोडे महिने गेले इतक्यांत **गोडेहू** आला. त्याला आपल्या नांवापुढें नवाबपद जोडावें ही इच्छा नव्हती; **ड्युप्ली**नें मिळवून ठेवलेल्या त्या पदवीवर आपला हक्क आहे असेंही त्यानें म्हटलें नाहीं. **ड्युप्ली**च्या एकशिवाय करून बाकीच्या ज्या शर्ती **सॉण्डर्स** मान्य करीत होता त्यांतल्या ही कित्येक सोडून देऊन तह करण्यास **गोडेहू** आनंदानें कबूल झाला. त्याचें लक्ष फक्त व्यापाराकडे होतें आणि इंग्रजांचें ही तसेंच तिकडेच असेल असें समजून त्यानें **सॉंडर्स**बरोबर त्या धोरणानें तह केला. त्यांत पहिलें कलम असें घातलें कीं, दोनही कंपन्यांनीं मोगल बादशहांकडून घेतलेल्या पदव्या टाकून द्याव्या, तसले मानमरातब पुनः केव्हांही कोणाकडून घेऊं नयेत आणि एतद्देशीय राजेरजवाड्यांचे जे आपआपसांत तंटे होतील त्यांत पडूं नये. तहनाम्यांतील दुसरें

कलम असें होतें कीं, **मद्रास** आणि **फोर्ट सेंट डेव्हिड**, यांखालीं जितका मुलुख असेल तितकाच **पाँदीशरी**, **कारिकल**, आणि दुसरे कांहीं प्रांत ठरविण्यांत येतील ते मिळून फ्रेंचांकडे असावा. दक्षिणेच्या सुभेदारानें उत्तर सरकार मुलखावर एकट्या फ्रेंचांनां जो सर्वस्व हक्क दिला होता तो इंग्रजांनां मान्य नाहीं. हीं मुख्य कलमें असून बाकीचीं किरकोळ होतीं. त्यांत कांहीं नद्यांच्या पात्रांत कोणाचीं गलबतें कशीं फिरावीं याबद्दल ठराव होता. परंतु तूर्त एक करार असा होता कीं, हा तहनामा युरोपास जाऊन इंग्लंड व फ्रान्स या उभय सरकारांस पसंत होऊन तिकडून पुरा होऊन येईपर्यंत उभयपक्षांनीं वस्तुस्थिति आहे अशी कायम राखावी; कोणींही नवे कोटकिल्ले बांधूं नयेत.

**ड्युप्ली** ज्यासाठीं इतका भांडत होता, ज्यासाठीं त्यानें एवढें युद्ध केलें, तें सर्व **गोडेहूनें** या तहनाम्यानें मुकाट्यानें सोडून दिलें. 'कर्नाटकचा नबाब' ह्या पदावर त्यानें उदक सोडलें, उत्तर सरकार मुलुख जाऊं दे म्हणून त्यावर उदक सोडलें, जे एतद्देशीय राजेरजवाडे स्नेही म्हणून वागत होते त्यांचा स्नेह सोडला आणि फ्रेंच राष्ट्राचें जें वजन, नांव, लौकिक, इभ्रत, (prestige) होती त्या साऱ्यावर पाणी सोडलें. **ड्युप्लीबरोबर** तहाचें बोलणें चाललें होतें तेव्हां तो म्हणेल तें तें **साँडर्स** मान्य करीत होता; फक्त एका गोष्टीला त्याचा ना होता—' **ड्युप्ली** कर्नाटकचा नबाब ' एवढें म्हणण्यास मात्र तो नाकबूल होता—परंतु आतां तें सर्व सोडून उलट **गोडेहूनेंच** त्यानें म्हटलें तें मान्य केलें आणि **पाँदीशरी** व **कारिकल** हीं दोन्हीं ठाणीं केवळ व्यापाराचीं बंदरें करून ठेविलीं. एवढ्या एकाच गोष्टीवरून त्याच्या हातीं राज्यकारभार गेला हें फ्रान्स देशाचें केवढें मोठें दुर्दैव उभें राहिलें तें चांगलें दिसून येतें. तो फक्त एकाच हेतूनें प्रेरित झालेला असावा असें दिसतें; आणि तो हेतु एवढाच कीं, **ड्युप्लीनें** जें जें केलेलें होतें तें तें सर्व नाहींसें करून टाकावयाचें; एतद्देशीय लोकांवर त्याचें जें मोठें वजन बसलेलें होतें तें नाहींसें करावयाचें; फ्रान्सच्या हिताकरितां, नफ्याकरितां, अंतर्भागांतील मोठमोठ्या बलाढ्य राजेरजवाड्यांशीं सख्यसंबंध जोडावयाचा हें जें त्याचें मुख्यतत्व होतें तें सोडून द्यावयाचें; हा जो त्याचा मुख्य हेतु, हें हातीं धरलेलें मुख्य काम, तें त्यानें आपल्या अल्पमतीप्रमाणें उत्कृष्ट तऱ्हेनें पार पाडलें. त्यानें एक गोष्ट मात्र केली नाहीं. ती ही कीं, दक्षिणेच्या सुभेदाराच्या

दरबारीं **ड्युप्लीनें ब्यूस्सीला** सैन्यासह ठेविलें होतें त्याला तें घेऊन माघारा बोलाविलें नाहीं.

**गोडेहू** कांहीं हिंदुस्थानांत फार दिवस राहिला नाहीं. तो थोड्याच महिन्यांनीं, म्हणजे सन १७५५ च्या फेब्रुआरी महिन्यांत **पाँदीशरीहून** निघून गेला. पुढें थोडासा काल गेल्यावर त्याच्या जागीं **मस्य ड्युव्हाल द लेरी** ( M. Duval de Leyrit ) याची नेमणूक झाली. तो फ्रेंच कंपनीच्या नोकरांपैकींच एक वखारदार होता. तो राजकारणांत हुशार किंवा थोर दृष्टीचा असाही मनुष्य नव्हता. आपलें व्यापाराचें काम बरें कीं आपण बरे, दुसऱ्याच्या कसल्या उसाफरींत पडूं नये अशा मताच्या मंडळीपैकींच तोही होता. त्याला कामावर रुजू होऊन फार दिवस झाले नाहींत तों इंग्लंड आणि फ्रान्स यांच्यामध्यें सन १७५६ च्या मे महिन्यांत लढाई सुरू झाली. **ड्युप्लीला** आपण चांगलें पाठबळ द्यावयास पाहिजे होतें तें दिलें नाहीं ही फारच मोठी चूक केली अशी या वेळेला फ्रेंच प्रधानमंडळाची खात्री होऊन चुकली होती. ती चूक सुधारावी आणि हिंदुस्थानांत फ्रेंचांचें हित पुनः साधावें म्हणून तिकडे पाठविण्याकरितां ते एक मोठें सैन्य तयार करूं लागले होते आणि आतां त्याची रवानगी होत आहे असें त्यांनीं **द लेरी** यास कळविलें. त्यांचा मूळ उद्देश फ्रेंचांचें हित साधावें म्हणजे त्या हिताला जपावें एवढाच नव्हता. त्यांची त्याहून फार मोठी हांव होती. दक्षिण हिंदुस्थानांतून इंग्रजांनां हांकून लावावें, कामावरून काढून धुळीस मिळविलेल्या **ड्युप्लीचें** जें राजकारणाचें धोरण असे तें पुनः चालू करावें हा त्यांचा उद्देश होता आणि तो आतां सैन्याच्या जोरावर पार पाडावयाचा होता, म्हणून त्या कामास पुरेल एवढें मोठें सैन्य ते तयार करीत होते.

या प्रचंड सैन्याचें आधिपत्य फ्रेंच सरकारच्या लष्करी खात्यांतल्या एका मोठ्या नामांकित सेनापतीकडे दिलेलें होतें. त्याचें नांव **टॉमस आर्थर कौंट लाली** आणि **ब्यारन टोलेंडॉल** असें होतें. त्याच्या बापाचें नांव **सर जेरर्ड ओ लाली**. तो सन १६९१ मध्यें **लिमेरिक** किल्ला शत्रूच्या हातीं गेला तेव्हां स्वदेश सोडून फ्रान्समध्यें गेला आणि चौदाव्या **लुईराजाच्या** पदरीं नोकरीस राहिला. त्यानंतर नऊ वर्षांनीं **सर जेरर्ड** ह्याला हा पुत्र झाला. तो

अगदीं बाळपणापासून फ्रेंच लष्करांत असून शस्त्रास्त्रविद्या शिकून इतका प्रवीण झाला होता कीं, **फाँटेनाय** * समरांगणीं **मार्शल** § **सेक्स** यानें त्याची प्रशंसा केली. हा **मार्शल**, ४५ + च्या युद्धांत असून Laffelt † **लाफेल** समरभूमीवरही लढला होता. तरुण **लालीनें** मोठा लौकिक मिळविला होता. त्याचे समकालीन लोक तर त्याच्याविषयीं बोलतांना असें म्हणत कीं, जय मिळणें शक्य असलें पुरे, मग तो त्यानें मिळविलाच असें समजण्यास कांहीं हरकत नाहीं. मोठा प्रसिद्ध पुरुष **व्हॉल्टेअर** ह्याला मुख्य प्रधानानें एक महिनाभर त्याच्याबरोबर काम करण्यास पाठविलें होतें तेव्हां त्यानें त्याच्याविषयीं आपलें मत असें दिलें कीं, त्याचें अंतःकरण दगडासारखें घट्ट ( stubborn fierceness of soul ) असून रीतिभाति फारच सभ्यपणाच्या आहेत असें मला दिसून आलें. सारांश, साऱ्या फ्रान्स देशांत त्याच्याविषयीं सर्वत्र असा समज दिसत होता कीं, **ड्युप्लेनें** जें राजसूत्र हातचें खालीं ठेविलें आहे तें उचलून घेऊन त्यानें आरंभिलेलें कार्य चांगल्या प्रकारें शेवटास लावण्यास योग्य मनुष्य म्हटला तर हा एक आहे.

---

* Fontenoy **फाँटेनायची** लढाई ता. ११ मे १७४५ रोजीं झाली. फ्रेंचांचा सेनापति **मार्शल सेक्स** ह्यानें ड्यूक ऑफ कंबर्लंडच्या हाताखालील ब्रिटिश, डच्च, आणि आस्ट्रियन या संयुक्त सैन्यांचा पराभव केला.

§ **मार्शल सेक्स** हा फ्रान्सचा प्रख्यात सेनापति. फ्रान्सचा राजा पंधरावा लुई याची त्याच्यावर फार मर्जी असे. शरीरानें धिप्पाड आणि शक्ति अचाट, भीम पराक्रमी, अशी त्याची ख्याति होती. लष्करी विषयांसंबंधीं त्याच्या लेखांना सर्व युरोपभर मान असे. त्यानें अनेक जय मिळविले असल्यामुळें त्याला सर्व फ्रेंच सैन्याचा ' मार्शल ' नेमण्यांत आलें होतें.

+, ४५ म्हणजे इंग्लंडचा राजा दुसरा जेम्स ह्याचा नातू ज्याला young pretender यंग प्रिटेंडर म्हणत त्यानें सन १७४५ त इंग्लंडवर केलेली स्वारी; किंवा जेकोबाईट लोकांचें दुसरें बंड.

† Leffelt लाफेल ( युनायटेट नेदरलंडमध्यें ) येथें तारीख २ जुलै १७४७ रोजीं मार्शल सेक्स यानें प्रिन्स ऑफ ऑरेंज आणि ड्यूक ऑफ कंबरलंड या उभयतांशीं लढून त्यांचा पराभव केला.

पहिल्यानें असें ठरलें होतें कीं, **लालीनें** ३००० सैन्य बरोबर घेऊन हिंदुस्थानांत जाण्यास ताबडतोब निघावें. परंतु अखेर निघतांना तितक्या सैन्याची कांहीं भरती झाली नाहीं, थोडें कमी पडलें. दुसरें असें झालें कीं, त्याच्या साहाय्याला जें आरमार त्याच्याचबरोबर निघावयाचें होतें त्याला तेथून हालण्याला बराच उशीर लागला. त्याला कारण पाहूं गेलें तर बहुतांशीं त्यावर जो मुख्य सरदार होता त्याचा नालायकपणा हें होतें. असो. परंतु अशाखालीं **लाली** निघतां निघून **पाँदीशरीच्या** बाऱ्यावर दाखल होईतों सन १७५८ च्या एप्रिल महिन्याची २८ वी तारीख आली.

इकडे इतकें होईपर्यंत मध्यंतरीं फ्रेंच आणि इंग्रज यांच्या दरम्यान **गोडेहू** आणि **साँडर्स** यांच्या मार्फत जो तह ठरला होता तो कागदांतला कागदांतच राहिला. बरेच दिवस असेंच चाललें होतें. आपले प्रतिस्पर्धी इंग्रज लोक एकसारखे त्या तहाच्या अगदीं उलट वागत आहेत असें **द लेरी** याच्या नजरेस येत होतें, तेव्हां त्याच्या मनांत नव्हतें तरी त्याला **ड्युप्लीच्या** राजनीतीचा पुनः अंगिकार करावा लागला. संधिवातानें ( gout ) आंखडलेल्या म्हाताऱ्या **दोतयला** त्यानें हालवून जागें केलें आणि आतां सुस्ती टाकून हुशार हो म्हणून सांगून त्याच्याबरोबर मोठें सैन्य देऊन **त्रिचनापल्ली** येथें इंग्रजांवर अकस्मात जाऊन पड असें सांगितलें. तो डाव कांहीं वाईट नव्हता; परंतु **दोतयच्या** हातून तें काम कसें व्हावें ? वातग्रस्त आजारी मनुष्यांच्या नेहेमींच्या रीतीप्रमाणें झालें. त्याला त्या वेळीं संधी अगदीं उत्तम होती; परंतु त्याच्या अंगांत हिम्मत, अवसान, धमक आणि तडफ नव्हतीं आणि जें काम करावयाचें तें तेव्हांच, वेळेवर केलें तर त्याची किम्मत केवढी असते हें त्याला समजत नव्हतें, त्यामुळें ती सोन्यासारखी संधी गमाऊन त्यानें आपल्या शत्रूंनां उलट डाव करण्यास सवड दिली आणि पराभव पाऊन **पाँदीशरीस** रडत माघारा आला. मग **द लेरीनें** त्याच्या जागीं **सॉबिनेट** याची नेमणूक केली. त्यानें **दोतयपेक्षां** काम चांगलें करून इंग्रजांनां थोडासा हात दाखविला आणि स्वसंरक्षण करून रहाण्यास लाविलें. रणांगणीं **सॉबिनेट** वर्चष्मा करून उभा होता अशा समयीं **लालीच्या** सैन्याची पहिली तुकडी ता. ९ सप्टेंबर १७५७ रोजीं येऊन दाखल झाली. तिच्यावर **शिव्हॉलियर द सुपायर** ( Chevalier de Soupire )

हा मुख्य अम्मलदार होता. **द लेरी**नें त्याला **लाली** येईपर्यंत स्वस्थ बसूं दिलें नाहीं. त्याची तुकडी बरीच मोठी होती ती आणि **सॉबिनेट**ची फौज एकत्र करून उभयतांस मिळून काम करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्यांनीं जाऊन **तिरुवन्नामलै** आणि **चितपेट** व **जिंजी** यांच्या लगतचीं दुसरीं कांहीं ठाणीं काबीज केलीं. त्यांनां आणखी पुष्कळ ठाणीं घेतां आलीं असतीं. ती संधीच मोठी उत्तम होती. कारण त्या वेळीं तेथें इंग्रजांचें सैन्य फारसें नव्हतें. बंगाल्यांत **क्लाइव्ह**च्या मदतीला जितकें पाठवितां आलें तितकें सारें त्यांनीं पाठविलें होतें. परंतु **लाली** आज येईल, उद्यां येईल, केव्हां येईल याचा नेम नाहीं असें वाटत होतें आणि तो म्हणजे काय, मोठा अभिमानी, फार करडा असून हिंदुस्थानांतल्या फ्रेंच लोकांविषयीं त्याचें मन फार कलुषित झालेलें, अशी त्याची ख्याति असल्यामुळें तो येईपर्यंत आपल्याच अंगावर घेऊन जबाबदारीनें काम करण्याची **द सुपायर** याला छाती होईना. त्या वेळीं जी उत्तम संधी होती ती त्यानें फुकट घालविली.

अखेर **लाली** येऊन दाखल झाला. त्याला सर्व कांहीं अनुकूल होतें. तो स्वतः उत्तम शिपाई होता. परंतु त्याच्यांत एक गोम होती. ती कोणती म्हटलें तर त्याचा स्वभाव. ज्या ज्या एतद्देशीय राजेरजवाड्यांशीं **ड्युप्ली**चा संबंध आला त्या सर्वांवर त्यानें आपली छाप बसविली होती. तो हें काम त्यांच्याशीं गोड बोलून त्यांचें मन वळवून करीत असे. **लाली**च्या अंगांत हा गुण नव्हता. त्याला फक्त हुकूम करतां येई. **ड्युप्ली** त्यांच्या मनाचा कल पाहून, त्याप्रमाणें बोलून, त्यांनां चढवून फुलजी करून आपलें कार्य साधून घेत असे. **लाली** त्यांच्या दोषांकडे आणि गुणांकडे कशाकडेच पहात नव्हता. तो सरसकट साऱ्यांनांच तुच्छ करीत होता. **ड्युप्ली**जवळ युरोपियन ( गोरी ) फौज थोडी होती तरी तेवढीच्याच बळावर त्यानें दक्षिण हिंदुस्थानांत फ्रेंचांचें वर्चस्व स्थापून दाखविलें. कारण एतद्देशीय लोकांच्या मोठमोठ्या समूहांवर आपलें वजन पाडण्याची त्याच्या अंगांत स्वतःसिद्ध शक्ति होती. लालीजवळ त्याच्यापेक्षां पुष्कळ जास्त फौज असल्यानें फ्रेंचांचें वर्चस्व सहज स्थापन करतां आलें असतें; परंतु **ड्युप्ली**च्या अंगांत फौजेची योजना करण्याचें जें चातुर्य आणि ज्ञान होतें तें त्याच्या अंगीं नसल्यानें त्याला तिची योग्य व्यवस्था आणि उपयोग करतां आला नाहीं;

आणि त्यामुळें त्याच्या हातून व्हावें तें कार्य झालें नाहीं. त्याला अगदींच अपयश आलें. एतद्देशीय लोकांशीं सामोपचारानें मिळून वागून त्यांनां खुष ठेवावयाचें तें त्यानें केलें नाहीं इतकेंच नव्हे, त्यांच्या ज्या वेड्यावांकड्या, खुळ्या, समजुती होत्या त्यांबद्दल त्यांचा उपहास चालविला. त्यांचा जातिभेद त्याला खपेना आणि त्यांचीं अनेक प्रकारचीं धर्ममतें पाहून तो उघड उघड, त्यांच्या देखत, त्यांनां हंसे. **पाँदीशरी**च्या फ्रेंच अम्मलदार लोकांचीही त्यानें कांहीं शोभा करावयाची ठेविली नाहीं. तो त्यांच्याशीं गर्वानें आणि मगरुरीनें वागूं लागला. त्यामुळें थोडक्याच काळांत तेही त्याला विटले.

आतां त्या फ्रेंच अम्मलदारांविषयीं बोलावयाचें तर इतकें कबूल केलेंच पाहिजे कीं ते अगदीं अकर्ते आणि नालायक होते. **लाली**नें येण्याबरोबर त्यांनां पहिला प्रश्न केला तो हा—**फोर्ट सेंट डेव्हिड, गुडलूर** आणि **मद्रास**, हीं ठाणीं कशीं काय मजबूद आहेत, कोठें किती फौज आहे वगैरे, आणि दक्षिण हिंदुस्थानांत इंग्लिशांची एकंदर संख्या किती आहे? परंतु त्यांतील एकाही प्रश्नाला तो **द लेरी** गव्हरनर किंवा त्याचे कौन्सिलर यांतून एकाच्यानेंही बिनचूक उत्तर देववलें नाहीं. त्याला हवी होती ती पक्की माहिती तत्काळ मिळाली नाहीं. **पाँदीशरी**पासून **गुडलूर** सारें सोळा मैल, परंतु तें अमूक मैल आहे असें त्यांच्यापैकीं एकालाही खात्रीनें सांगतां येईना. ते फक्त वाट दाखविणारे मनुष्य देऊं म्हणाले. त्यांनां काय तें तेवढें करतां येत होतें. हिंदुस्थानांतल्या फ्रेंच मंडळीबद्दल **लाली**ला जो आधींच तिरस्कार वाटत होता तो त्यांचें हें अगाध अज्ञान आणि निःकाळजीपणा पाहून अधिकच दुणावला, यांत कांहीं आश्चर्य मानायाला नको. तेव्हांपासून मग तो त्यांनां अधिकच तुच्छ समजूं लागला.

**लाली** स्वतः चांगला कर्तृत्ववान् मनुष्य असून त्याच्या हाताखालीं त्या किनाऱ्यावर फौज पुष्कळ होती; त्या योगानें त्याला पहिल्या पहिल्यानें कांहीं ठिकाणीं अगदीं आश्चर्य करण्यासारखे जय मिळाले. **गुडलूर** आणि **फोर्ट सेंट डेव्हिड** हीं दोनही ठाणीं त्यानें कांहीं आयास न पडतां घेतलीं. मग **मद्रास**वर चालून जावें अशी त्याला इच्छा उत्पन्न झाली. परंतु त्याला पैसा मिळेना. जामदारखाना आणि दारूखाना पहातो तर रिकामे पडलेले. तिजोरीची भर करणारा आणि दारूगोळा सांठवणारा **ड्युप्ली** जाऊन त्याच्या जागीं **द लेरी** बसला होता

त्याच्याकडे त्यानें कांहीं मागणें केलें तरी तुम्ही मागतां हें पुरवणें अशक्य आहे, मी काय करूं असा तो जबाब देई. कसें आश्चर्य करण्यासारखें पारडें फिरलें पहा! सन १७५२ पासून १७५६ पर्यंत **ड्यूप्ले**नें लष्करच्या खर्चाला केव्हांही तूट पडूं नये म्हणून पैशाची हवी तितकी, मुबलक भरती करून ठेविली होती. त्याला फक्त सैन्य आणि सेनानी पाहिजे होता; परंतु ते कांहीं मिळाले नाहींत. तो गेल्यावर मागून सन १७५८ त हवा होता तसा सेनापति आला आणि सैन्याचीही गर्दी उडाली; परंतु **ड्यूप्ली**च्या मागून अकर्ते अधिकारी आल्यामुळें सैन्याला एक मुक्काम कूच करून जाणें झालें तर तेवढ्याला लागणारें सामान-सुमान, एक जिन्नस किंवा जरूर ती थोडी तरी माहिती देण्याचेंसुद्धां काम त्यांच्या हातून होईना. याप्रमाणें **द लेरी**च्या निःकाळजीपणानें असो किंवा बेपर्वाईमुळें असो, **लाली**ला हवी ती मदत कांहीं मिळेना तेव्हां त्याचा अगदीं नाइलाज झाला. मग त्यानें **तंजावर**च्या राजापासून पैसा काढण्याचें मनांत आणून तो त्या उद्योगास लागला. त्या राजानें त्याला बरें आहे, देतों, असें म्हणत म्हणत नादीं लावून कांहीं दिवस वचनावर झुलविलें. त्याचें आंतून मदतीकरितां इंग्रजांकडे बोलणें चाललें होतें तें मान्य होऊन **त्रिचनापल्लीहून** कांहीं कवाइती शिपाई **क्याप्टन क्यालिऑड** यानें त्याच्याकडे रवाना केले. ते येऊन दाखल झाले तसा त्याला धीर येऊन त्यानें पांघरूण टाकलें आणि धिटाईचें भाषण सुरू केलें. पैसा कांहीं मिळणार नाहीं असा त्यानें जबाब दिला. **लाली**ला जी त्याची आशा वाटत होती ती जेव्हां याप्रमाणें फुकट झाली तेव्हां त्यानें **तंजावरा**वर हल्ला करण्याचें ठरविलें. त्याची अगदीं तयारी झाली इतक्यांत फ्रेंच आरमाराचा पराभव होऊन त्याला त्या किनाऱ्यावरून हांकून लाऊन इंग्रज आतां आपल्या मूलाधारस्थानावर हल्ला करण्याच्या विचारांत आहेत असा निरोप त्याला येऊन पोहोंचला. त्याबरोबर गडबडून **तंजावरा**वर हल्ला करण्याच्या भरीस पडण्याचें रहित करून तो **पॉंदीशरीस** माघारा गेला. तेथें त्याला एकदम तीन लाख रुपये मिळाले. फ्रेंच आरमाराच्या मुख्य सरदारानें एक **डच** गलबत येत असलेलें पाहून गांठलें आणि लुटलें त्यांत त्याला ही रोकड सांपडलेली त्यानें हजर केली होती. **लालीनें** ती घेऊन **अर्काट**वर चाल केली आणि **ब्यूस्सी**ला हुकूम पाठविला कीं, लौकर येऊन मला मिळावें. **अर्काट** कांहीं गडबड न होतां

त्याच्या हातीं आलें. **ब्यूस्सी औरंगाबादे**हून निघून त्याला येऊन मिळाला. तसाच उत्तर सरकारांतून **मोरकिन** २५० शिपाई आणि एक लाख रुपये रोख घेऊन येऊन मिळाला. **लालीनें** स्वतः **पाँदीशरी**स माघारें येऊन तेथच्या कौन्सिलाच्या राशीस लागून त्यांच्याकडून थोडाबहुत पैसा काढला; आणि मग पुढें चाल करून अर्काटच्या आणि मद्रासच्या दरम्यान असलेलीं मजबूद ठाणीं घेऊन ता. १२ दिसेंबर रोजीं मद्रासपुढें जाऊन तळ दिला. त्या वेळीं त्याच्या हुकमांत २००० युरोपियन पायदळ ३०० स्वार आणि ५००० कवाईत शिकलेले शिपाई, इतकें सैन्य होतें.

**लालीनें** मद्रासला वेढा घातला आणि पुढें काय काय केलें ती सविस्तर हकीगत येथें देण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. इतकें सांगितलें म्हणजे पुरे आहे कीं, Black town ब्ल्याक टौन ' काळें शहर ' म्हणून जो मद्रासचा भाग आहे तो त्याला सहज घेतां आला. परंतु किल्ल्यावर कांहीं त्याचा कटाव चालला नाहीं; तो निकरानें लढत राहिला. **लाली**ला उघड्या मैदानावर कांहीं प्रसंगीं जयही आला. त्यांत एक वेळ अशी होती कीं, तो जर तसाच नेटानें लगट करता तर त्याचें कार्य झालें असतें; परंतु तशा समयीं तो कां थंड राहिला तें कळत नाहीं. ती संधी त्यानें गमावली आणि शेवटीं त्याला वेढा उठवणेंच भाग पडलें. त्याच्या थोरल्या जड तोफा लागू होऊन तटाला भगदाडही पडलें आणि मग त्यांतून जाऊन हल्ला करावा असें त्यानें योजलें होतें. जरा थांबून त्या कामाला योग्य अशी रात्र येण्याची तो वाट पहात होता, इतक्यांत ता. १६ फेब्रूआरी रोजीं इंग्रजी आरमार त्या किनाऱ्यावर दाखल झालें. तें पहातांच **लाली**ची सारी आशा खुंटली. आतां येथें आपला कांहीं उपाय चालणार नाहीं असें वाटून रागानें संतप्त आणि निराश होऊन दुसऱ्या दिवशीं वेढा उठवून तो तेथून चालता झाला.

**लालीनें** हा वेळपर्यंत ज्या कांहीं चुका केल्या त्या सर्वांत फार मोठी आणि अत्यंत घातक कोणती असें म्हणून पाहूं गेलें तर त्यानें सुभेदाराच्या दरबारांतून **ब्यूस्सी**ला सैन्यासुद्धां बोलाऊन आणलें आणि **मोरकिन** यास उत्तर सरकार प्रांतांतून काढून आणलें ही होय. **ब्यूस्सी**च्या जागेवर त्यानें **मार्क्वीस दी कॉनफ्लस** ( Marquis de Conflaus ) नांवाचा अम्मलदार पाठविला तो अगदीं

नवा होता. त्याला हिंदुस्थानांतल्या कामाची कांहीं माहिती नव्हती आणि अनुभव मुळींच कांहीं नव्हता. त्यामुळें परिणाम असा झाला कीं, फ्रेंचांचें जें वर्चस्व होतें त्याला जबर धक्का बसून तें लयास गेलें. तो प्रकार असा—उत्तर सरकार मुलखाच्या उत्तर भागांत एक राजा होता तो ही संधी बरी आली आहे असें पाहून आपलें स्वात्रंत्र्य प्रस्थापित करण्याच्या विचारास लागला. त्या कामीं आपल्याला इंग्रजांचें साहाय्य मिळावें म्हणून त्याणें कलकत्त्यास फार अगत्याचें बोलणें लाऊन अगदीं जरूर मदत व्हावी अशी विनवणी केली. अशा कामांत पडलें असतां कशा प्रकारचें फळ प्राप्त होण्याचा संभव आहे हें **क्लाइव्हला** पुरें माहीत असल्यानें त्यानें त्या राजाची विनंती मान्य करून लागलाच आपल्या हाताखालचा जो उत्तम अम्मलदार **कर्नल फोर्ड** त्याच्यावरोबर थोडीशी फौज देऊन त्याची त्याच्याकडे रवानगी केली. **क्लाइव्हच्या** ह्या कृत्याला त्याच्या कौन्सिलापैकीं कोणा एकाचीही संमती नव्हती. ते सारे नको नको म्हणत असतां त्यानें तें आपल्या मर्जीप्रमाणें केलें, आणि त्याला जेव्हां फळ चांगलें आलें तेव्हां त्या थोर मनुष्याचें करणें योग्यच होतें असें सारे म्हणूं लागले. तें फळ असें होतें कीं, त्यापासून इंग्लंडला सर्व बाजूंनीं नफाच झाला. **फोर्ड** हा मोठा शिपाई असून त्याला हिंदुस्थानची माहिती होती. **काफ्ला** त्याच्यापेक्षां कमी योग्यतेचा असून युरोपांतून नुकता आलेला होता. त्याची **फोर्ड**साख्याशीं गांठ पडली असतां निभाव कसा लागणार ? त्याचा पराजय होणार हें उघड उघड दिसत होतें त्याप्रमाणें झालें. **फोर्ड**नें उत्तर सरकार मुलुख सहज जिंकून घेतला इतकेंच नव्हे. दक्षिणेचा सुमेदार फ्रेंचांनां मदत करावी म्हणून फौज घेऊन आला होता त्यालाही त्यानें चांगलें जेरीस आणलें आणि नमो नमो करावयास लाऊन फ्रेंचांचा पक्ष सोडणें भाग पाडलें. निजामाचा आणि इंग्रजांचा संबंध जडला तो उत्तरसरकारांतून फ्रेंचांचें याप्रमाणें उच्चाटण झालें त्या दिवसापासून. मग उभयतांमध्यें करारनामे झाले त्यांत वेळोवेळीं फेरबदल होत आले, परंतु तो जो एकदा संबंध जडला तो आजपर्यंत चालत आला आहे.

**लाली** जो तेथून निघाला तो आपल्या बरोबरचें सैन्य **दी सूपायर** याच्या हाताखालीं अर्काट येथें ठेऊन आपण युद्ध पुढें चालवण्यास आणखी सामग्री सिद्ध करण्याकरितां **पाँदीशरी** येथें माघारा गेला. त्याला तेथें पुष्कळ उशीर लागला

आणि पुष्कळ चांगले योग आलेले फुकट गेले. नंतर तो **वांडिवॉश** येथें जाऊन सैन्यांत दाखल झाला आणि **अर्काट**वर चालून गेला. **लाली** गेल्यावर इंग्रजी फौजेनें **वांडिवॉश** काबीज केलें. त्या फौजेंत अलीकडे नवीन भरती होऊन ती वाढली होती आणि तिचें आधिपत्य **क्लाइव्ह**च्या हाताखालीं तयार झालेला असून पुढें जो मोठी कीर्ति पावला त्या **आयरकूट** नामक वीराकडे गेलें होतें. **लाली**ला **वांडिवॉश** ठाणें गेल्याचें वर्तमान समजतांच तो माघारा फिरला आणि तें सोडवण्याचा संकल्प करून त्याच्यापुढें एका मजबूद जागीं तळ देऊन बसला. त्या स्थळीं तारीख २१ जानेवारी सन १७६० रोजीं **आयरकूटनें** त्याच्यावर हल्ला करून त्याचा अगदीं पुरा पराजय केला. इंग्लिशांनां निर्विवाद उत्कृष्ट जय मिळाला. * त्या पराभवानें फ्रेंचांच्या हिंदुस्थानांतील राज्याला चांगलाच धक्का बसून तें मृत्युपंथास लागलें. **मार्टिन ड्युमा** आणि **ड्युप्ली** यांच्या परिश्रमानें जी राज्यरूपी इमारत उभी झाली होती ती या पराजयानें ढांसळून जमीन दोस्त झाली; **लाली**ला जी काय आशा होती ती सर्व विलयास गेली आणि **पाँदीशरी**चा आतां विध्वंस होणार हें पक्कें ठरलें. त्या पराजयाचा तात्कालिक परिणाम असा झाला कीं, **अर्काट**, **देवीकोटा** आणि **कारिकल**, हीं ठाणीं इंग्लिशांच्या स्वाधीन झालीं. सप्टंबर महिन्यांत **पाँदीशरी**ला वेढा पडला आणि तारीख १५ जानेवारी रोजीं ती इंग्रजांच्या हस्तगत झाली. **लाली** कैद झाला आणि त्याची इंग्लंडला रवानगी झाली. हिंदुस्थानांत असलेल्या ज्या फ्रेंच मनुष्यांनीं आपलें कांहीं चालूं दिलें नाहीं त्यांनीं आतां आपल्यावर अत्यंत लज्जास्पद असे भलभलते आरोप केले आहेत असें त्याला तेथें असतांना समजलें; तेव्हां आपल्या नांवाला लागणारे ते डाग धुऊन टाकण्याला त्यानें स्वदेशीं जाण्यास परवानगी मागितली आणि ती त्याला मिळाली. तेथें जाऊन पहातो तर तेथें जी थोडीशी सत्ताधीश मंडळी नेहमीं जोरावर असे तिचें प्राबल्य विशेष झालेलें होतें. त्यांनीं अगदीं क्षुल्लक पुराव्यावरून त्याला दोषी ठरविलें आणि तीन वर्षेपर्यंत हाल अपेष्टेंत, दुःखांत दिवस काढायाला लावून अखेर त्याचा शिरश्छेद करण्याचा हुकूम केला. ता. ८ माहे मे सन १७६६ रोजीं त्याला तुरुंगांतून काढून एका खताच्या गाडीवर बसविलें आणि तोंडांत बोळा घालून **पारीस** शहरच्या

* हिंदुस्थानांतील फ्रेंचांचा इतिहास. पृष्ठ ५६० पहावें.

रस्त्यांतून धिंड काढीत **वधस्थळीं** नेलें. इंडीजच्या कंपनीचे डायरेक्टर जसे **ड्युप्ले**-वर उठले होते तसे त्याच्यावर उठून त्यांनीं आपलेसें केलें. प्रख्यात **लाली टोलेंडाल**, Lally Tollendal ) **लाली**चा पुत्र, यानें बापाच्या नांवाचा दुर्लौकिक झालेला नाहींसा होऊन पुनः लोकांनीं त्याला पूर्ववत मानावें म्हणून सतत परिश्रम चालविले होते ते पुढें कांहीं वर्षांनीं सफळ झाले.

दक्षिण हिंदुस्थानांत **ड्युप्लीनें** जें कारस्थान मांडलें, जी राजनीति ( Policy ) प्रथम सुरू केली, तोच प्रकार आणखी एकवार करून पहावा म्हणून पुनः एकदां यत्न झाला, आणि तो शेवटचा होता. इंग्लिशांची आणि फ्रेंचांची लढाई संपून **पारीस** येथें तह झाला; ( Treatry of Paris ) त्यावर तारीख १० फेब्रुआरी सन १७६३ रोजीं सह्या होऊन **पाँदीशरी** फ्रेंचांना परत मिळाली. परंतु त्या वेळीं तिचें स्वरूप पालटून ती किती विद्रूप झाली होती ! तिचे तट पडून जमीनदोस्त झालेले, आंतली सर्व संपत्ति जाऊन कंगालदशा आलेली आणि तिचें वजन कांहीं उरलेलें नाहीं. तो लाजिरवाणा तह झाल्यादिवसापासून पुढें सतत १५ वर्षेंपर्यंत **पाँदीशरी**ला आपल्या शत्रूंची उत्तरोत्तर भरभराट होत चाललेली मुकाट्यांनीं बसून पहावी लागत होती. त्यांना थोडेंबहुत विघ्न आणण्याचा देखील तिला यत्न करतां येत नव्हता. पुढें सन १७७८ मध्यें इंग्लंड आणि फ्रान्स ह्या उभय राष्ट्रांत पुनः युरोपांत लढाई जुंपली त्या वेळीं आपलें हिंदुस्थानांतलें राज्य स्वतंत्र, त्याचा ह्या लढाईशीं कांहीं संबंध नाहीं, असें म्हणण्याचीसुद्धां फ्रान्सच्या राज्याची नीटशी कांहीं तयारी नव्हती; मग त्याचें स्वातंत्र्य किंवा स्वामित्व त्याच्यानें कसें राखवणार होतें !

त्या स्थितीचा जो परिणाम होणें साहजिकसें दिसत होतें तो घडून आला. स्वसंरक्षणाविषयीं कांहीं एक धडपड न करतां **चंद्रनगर** ता. १० जुलै सन १७७८ रोजीं मुकाट्यांनीं इंग्लिशांच्या स्वाधीन झालें. **पाँदीशरी**ला प्रचंड सैन्याचा वेढा पडला, तरी त्याच्याशीं ४० दिवस पर्यंत मोठ्या निकरानें लढून स्वसंरक्षणार्थ तिनें आपली शर्थ केली आणि शेवटीं सप्टेंबर महिन्यांत ती शत्रूंनीं घेतली. फ्रेंचांचें आरमार इकडे होतें त्यावरचा सेनापति **मस्य द त्रॉंझॉली** ( M. de Tronjoly ) हा कशाचीही काळजी न करतां गलबतें घेऊन फ्रान्सला निघून गेला. त्यानें **माही**चें रक्षण करण्याचा यत्न देखील केला नाहीं.

आतां कांहीं उरलें नाहीं, सर्व बुडाल्यासारखें दिसूं लागलें, अशा समयीं नशीबानें अकस्मात् उलट खाल्ली आणि फ्रेंचांचा मित्र **हैदरअल्ली**, म्हैसूरचा सर्वसत्ताधीश, त्या संकटसमयीं त्यांनां हात देण्याला पुढें सरला. इंग्लिशांनीं मोठ्या विचारानें ज्या काय अटकळी केल्या होत्या आणि तर्क बांधले होते ते सारे त्याच्यापुढें लटपटले आणि फ्रेंचांनां पुनः चांगले दिवस येण्याची मोठी आशा उत्पन्न झाली.

इंग्रजांचें आणि हैदराचें वैमनस्य येऊन युद्ध सुरू झालें होतें त्यांत त्याला जय येत गेला आणि अखेर आतां हें रण पुरे असें वाटून ते तहास कबूल झाले, तेव्हां **मद्रास**च्या तटाखालीं बसून त्यानें ज्या अटी सांगितल्या त्या मान्य करून त्यांनीं लढाई बंद केली. त्या वेळीं जो तहनामा झाला त्यांत एक कलम असें होतें कीं, उभयतांतून कोणावर ही परचक्र आलें तर त्याच्या संरक्षणार्थ त्याला दुसऱ्यानें साहाय्य करावें. याप्रमाणें उभयतांचा करार होऊन फार दिवस लोटले नाहींत तों तहाप्रमाणें कोण कसा वागतो हें पहाण्याची, कसोटीची, वेळ आली. पुढच्याच वर्षीं म्हणजे सन १७७० मध्यें **हैदरावर** मराठ्यांनीं स्वारी केली तेव्हां त्यानें आतां ठरावाप्रमाणें मला मदत करा असें इंग्रजांनां म्हटलें असतां त्यांनीं करीत नाहीं असें साफ सांगितलें.

इंग्रजांनीं हा जो विश्वासघात, किंवा वचनभंग, केला त्याचें हैदराला विस्मरण होईल आणि तो क्षमाकरील असें मनांत आणायालाच नको होतें; तें कधींच घडलें नसतें. तो मनांत संतप्त होऊन सूड घेण्याची संधी येण्याची वाट पहात स्वस्थ बसला होता. अशीं नऊ वर्षें लोटलीं. नंतर युरोपांत इंग्लंडाचें आणि फ्रान्साचें युद्ध जुंपलें आहे असें वर्तमान त्याच्या कानीं पडलें तेव्हां त्यानें आपला डाव साधून सूड उगवण्याचें मनांत आणलें. इंग्रजांकडे नीट नजर फेंकून पहातांना त्याला असें दिसलें कीं सध्या त्यांचें आणि मराठ्यांचें पश्चिम हिंदुस्थानांत युद्ध सुरू आहे ही वेळ बरी आहे. परंतु त्याला त्यांच्यावर उठण्याला कांहीं थोडें तरी निमित्त पाहिजे होतें तें त्यानें शोधून काढलें. इंग्रजांनीं **माही** घेतली होती तिकडे बोट दाखवून तो त्यांनां म्हणाला हें तुमचें कृत्य खोटेपणाचें आहे. तुम्ही माझ्याशीं केलेला करार मोडलात, तहनाम्याच्या विरुद्ध वागलेत, तर आतां युद्धाला उभे रहा. तो नुसतें बोलून राहिला नाहीं; त्यानें लागलीच त्यांच्यावर

स्वारी केली आणि **सर हेक्टर** मनरोसारख्या वीराला चांगला हात दाखविला. त्यानें जे जे डाव पेंच केले ते सारे लटपटविले. **बेली** मोठी थोरली फौज घेऊन त्याच्यावर गेला. परंतु त्या साऱ्या ३७२० शिपायांचा ता. ९।१० सप्टंबर सन १७८० ह्या दोन दिवसांत फडशा पाडून त्यानें **बेली**ला कैद केलें, **अर्काट** शहर घेतलें आणि **मद्रास**कडे मोर्चा फिरवला तेव्हां आतां तो हें घेतो अशी इंग्रजांनां धास्ती पडली.

या वेळीं फ्रान्साशीं सख्य होईल तर त्यापासून आपल्याला केवढा उपयोग होईल, तें किती हितावह होईल, तें **हैदरा**च्या ध्यानांत आल्यावांचून कांहीं राहिलें नाहीं. इंग्रजांनां दक्षिण हिंदुस्थानांतून अगदीं हांकून लावावें असा माझा हेतु आहे असें त्या वर्षाच्या आरंभींच त्यानें **पारीस**मध्यें वर्तमान पोहोचण्याची तजवीज केली होती. ह्या समयीं जर फ्रान्स मला फक्त मदत करील तर मी मनांत आणल्याप्रमाणें घडल्याशिवाय खचित रहात नाहीं असें ही तो म्हणाला. परंतु सोळाव्या **लुईच्या** प्रधानमंडळानें त्याच्या विनवणीकडे कांहीं लक्ष दिलें नाहीं. आजपर्यंत हिंदुस्थानांत आपल्या लोकांनीं इतके परिश्रम केले परंतु अखेर फळ कांहींच नाहीं हें पाहून हे हताश झालेले होते आणि **हैदरा**चा पराक्रम केवढा आहे हें त्यांनां नीट कळलें नसावें आणि त्याच्या बोलण्यावर त्यांचा भरंवसा बसला नसावा असें होण्याचा ही संभव आहे. तें कांहीं असो, त्याचें बोलणें त्यांनीं मनावर घेतलें नाहीं एवढें खरें आहे. त्यांनीं जें काय केलें तें एवढेंच कीं, **आईल ऑफ फ्रान्स** आणि **बूर्बों** ह्या बेटांच्या संरक्षणार्थ एक काफला ( Squadron ) पाठवून दिला. परंतु पुढें लौकरच त्यांनां असें दिसून आलें कीं, त्या काफल्यावर जो मुख्य अम्मलदार नेमलेला होता तो जर चांगला हुशार, हिम्मतदार सेनापति असता तर अजून देखील त्याला इकडलें पारडें तिकडे फिरवतां आलं असतें.

त्या काफल्यावरचा अम्मलदार **मस्य दूश्मैं** ( M. Du chemin ) निघून **पोर्ट लुई** येथें गेला आणि तेथें हिंदुस्थानांतल्या ठाण्यांवरला मुख्य सेनापति **श्व्हाश्वाल्ये दार्व्हा** ( Chevalier di Orves ) यास भेटला. त्याबरोबर त्यानें मुख्य अधिकार आपल्याकडे घेतला. तो काफला कांहीं अगदीं एवढासा नव्हता, बराच मोठा होता. त्यांत सहा मोठीं लढाऊ गलबतें ( Men of war )

एक फ्रिग्रेट ( Frigate ) आणि दोन कार्व्हेट ( Corvettes ) अशीं नऊ जहाजें असून त्यांवर फ्रेंच फौजेंत उत्कृष्ट मानलेल्या पलटणांतलें एक पलटण चढवलेलें होतें. **दॉर्व्हेनें** तीं एकदम हिंदुस्थानांत जाण्यास हकारलीं. तो येत येत जानेवारी महिन्याच्या अखेर अखेर **कारोमांडेल** किनाऱ्याजवळ येऊन पोहोंचला. आतां आपण त्याला तेथें सोडूं आणि त्याच्या अंगांत अकलेचा किंवा हिंमतीचा यत्किंचित तरी लवलेश असता, आरमारावर आधिपत्य करणारांत आजपर्यंत दुसरा कोणी असा दिसलाच नाहीं इतका वाईट, नालायक मनुष्य तो नसता, तर दक्षिण हिंदुस्थानांत इंग्लिशांचें कामास येण्यासारखें जें सैन्य होतें त्या साऱ्याला त्यानें आपल्याला हात जोडून शरण येण्याला कसें भाग पाडलें असतें तें दाखवूं. ती संधीच अशी उत्कृष्ट होती कीं, तशी सुदैवानें क्वचित् एकादे वेळीं येत असते आणि एकादा मूर्ख किंवा नामर्द मनुष्यमात्र तशा सुसमयीं आपलें कार्य करून घ्यावयाचें तें न घेतां ती घालवितो.

**हैदरानें मनरोला** चकवून त्याच्यावर मात करून **बेलीचा** पराभव करून आणि **अर्काट** घेऊन **वांडिवॉश, वेलूर, अंबूर, परमकोल** आणि **चिंगलपट**, ह्या ठाण्यांनां वेढे घातले होते. **अंबूरला** जेरीस आणून त्यानें आपल्यास्वाधीन होणें भाग पाडलें इतक्यांत त्याला असें वर्तमान येऊन पोहोंचलें कीं, आपल्यावर हल्ला करण्याच्या बेतानें काल मद्रासेहून **सर आयर कूट** यानें कूच केलें आहे. दक्षिण हिंदुस्थानांत इंग्लिशांनां सध्या प्रतिकूल काळ आला आहे, असें वर्तमान कलकत्यास पोहोंचतांच **वॉरन हेस्टिंग्ज**साहेबानें आपल्या नेहेमीच्या दक्षतेस अनुसरून दूरवर नजर पोहोंचवून त्यांनां संकट पडलें तर त्याचें निवारण केलें पाहिजे म्हणून **कूट**साहेबाची तेथून रवानगी केली होती. खरें सेनापतित्व करतां येण्यास जें चातुर्य हवें लागत असतें तें **हैदराच्या** अंगीं नैसर्गिक वसत असल्यानें **कूट** आपल्याकडे येण्यास निघाला आहे असें कांनीं पडतांच त्यानें आपलें सारें सैन्य एक ठिकाणीं जमविलें आणि तें इकडून तिकडे फिरवीत फिरवीत मद्रासच्या आणि **कूट**च्या मध्यें जाऊन तळ दिला. त्याबद्दल **कूट**ला कांहीं वाटलें नाहीं, कारण त्यानें जो डाव योजला होता त्याला कांहीं यानें विघ्न येत नव्हतें. त्याचा हेतु कसेंही करून **पाँदीशरी** लौकर गांठावी हा होता. कारण तेथें जे थोडेसे इंग्लिश लोक तेथच्या संरक्षणाकरितां ठेविलेले होते

त्यांनां फ्रेंचांनीं हर प्रयत्नानें हांकून लावलें होतें. **कूट** पुढें निघाला तसा **हैदर** त्याच्या मागोमाग चालला आणि जातां जातां वाटेनें जितकीं मजबूद ठाणीं लागलीं तितकीं घेऊन त्या साऱ्यांचा त्यानें चांगला बंदोबस्त केला. **कूट**साहेब जात जात ता. ८ फेब्रुआरी रोजीं **गुडलूर**जवळ जाऊन पोहोंचला. तेथें इंग्रजांची फौज होती आणि तें ठाणें समुद्रकिनाऱ्याला लगतचें होतें. **हैदर** आंतल्या बाजूला त्याच्याशीं बहुतेक समांतर चालला होता आणि पलीकडला मुलुख त्याच्या टापेंत होता. खरें पाहूं गेलें असतां आतां असें झालें होतें कीं, **कूट**साहेबाच्या एका बाजूला समुद्र आणि दुसऱ्या बाजूला **हैदर** असून त्याच्यापुढें आणि मागें जितकीं मजबूत टाणीं होतीं तितकीं सारीं शत्रूंनीं आटोपलेलीं होतीं. त्याच्या जवळची शिधासामुग्री सारी संपून खलास होत आली होती, परंतु त्याला ती काळजी नव्हती; कारण तो पुढचा विचार मनांत आणून मद्रासेहून सामानसुमान भरून **गुडलूर**ला गलबतें रवाना झालीं होतीं. आपण तेथें जाईपर्यंत तीं ही जाऊन पोहोंचतील असा **कूट**साहेबाचा अदमास होता म्हणून त्या आशेवर त्या तारीख ८ फेब्रुआरीच्या ध्यानांत ठेवण्यासारख्या दिवशीं सकाळीं तो मोठ्या आशेनें समुद्राकडे तोंड करून गलबतें आलीं कीं नाहीं तें पहावें म्हणून नजर फेंकून पाहूं लागला तों गलबतावर बावटा फडकत असलेला त्याच्या दृष्टीस पडला. पण काय ! तो कोणाचा ? **कूट** ज्यांची वाट पहात होता त्या इंग्रजी गलबतांचा पत्ता नाहीं. **स्व्हा ल्ये दार्व्हचें** फ्रेंच निशाण फडकत आहे आणि त्याचा काफला समुद्रकिनारा धरून पसरला आहे. इंग्रजी फौजेला आतां तिकडून सामानसुमान येऊन पोहोंचेल ही आशा धरावयास नको; तो संभवच नाहीं. **कूट** मोठा हुशार शिपाई, तो तें पहातांच समजला कीं, आतां आपली धडगत नाहीं. आतां कसेंही करून **हैदर** लढाईला उभा राहील असें केलें पाहिजे. या संकटांतून मुक्त होण्याला त्याच्याशीं हात करून जय मिळवावा एवढा एकच उपाय. दुसरा कांहीं मार्ग नाहीं. मग हैदराला मैदानांत आणावें, रणांगणीं उभें रहायाला लावावें म्हणून **कूट**साहेबानें अनेक युक्तिप्रयुक्ति केल्या. आपली अगदीं शर्थ करून सोडली, परंतु सर्व फुकट. **हैदर** मोठा धूर्त, तो तें सारें ओळखून होता. आतां गति काय होणार हें **कूट**च्या डोळ्यांनां जसें स्पष्ट दिसूं लागलें होतें तसें त्याच्याही दृष्टीपुढें तें उभें राहिलें होतें, म्हणून तो कांहीं गडबड करीना, स्वस्थ पडून राहिला होता.

**हैदरा**ला खरोखर असें दिसून चुकलें होतें कीं, **कूट**साहेबाला आतां गत्यंतर नाहीं; त्यानें मला शरण आलेंच पाहिजे. कदाचित कांहीं विलक्षण प्रकार अकस्मात् घडून येऊन त्याची सुटका होईल तर मात्र सांगवत नाहीं. म्हणून त्यानें **दार्ह** याजकडे सांगून पाठविलें कीं, दक्षिण हिंदुस्थानांत इंग्रजांचें जें काय सैन्य आहे तें सारें माझ्यापुढें आहे एवढेंच आणि आतां हें माझ्या दाढेंत पुरें सांपडलेलें आहे. मद्रासेस फौज नाहीं, फक्त किल्ल्याच्या रक्षणाला ५०० शिबंदीचे लोक आहेत, पण ते सारे आजारी आहेत. तर शत्रूचा निःपात करण्याची ही जी उत्तम संधी आलेली आहे ही तूं साध; फुकट घालवूं नको. तुजजवळ जें रेमिमेंट आहे तें कृपा करून खालीं, जमिनीवर उतर म्हणजे झालें.

फ्रान्साला अशी उत्तम संधी आजपर्यंत कधीं आली नव्हती. यावेळीं जय काय, अगदीं खचित ठेवल्यासारखा होता. तो मिळवण्याला कांहीं संकट नव्हतें, किंवा नशीब आहे, आला तर येईल असेंहि म्हणायाला नको होतें. **सर एडवर्ड ह्यूस** ( Hughes ) ह्याच्या हाताखालीं जें इंग्लिश आरमार होतें ते दूर, पश्चिम किनाऱ्यावर होतें. तें येऊन गांठील हें भय धरायाला नको होतें. **दार्हे** यानें करायाचें काय तर कांहीं नाहीं; थोडे दिवस आपल्या जागीं स्वस्थ बसावयाचें आणि इंग्रजांची फौज उपाशीं मरूं लागून शरण आलेली पहावयाचें. आतां असा प्रसंग येणार हें **सर आर्थर** कूट याला दिसलें, **हैदराला** दिसलें, लष्करांतल्या एकून एक मनुष्याला दिसलें आणि त्या फ्रेंच काफ़ल्यांतल्या ( Squadron ) साऱ्या लोकांनां दिसलें. पण त्यांत एक आंधळा होता त्याला मात्र दिसेना. असा तो इतका आंधळा कोण म्हणाल तर खुद्द **दार्हे**. त्यानें कांहीं करायाला तरी हवें होतें, छेः कांहीं नको होतें. हिंदुस्थानाकडल्या फ्रेंच आरमाराचा तो अधिपति, ते दिवस समुद्रावरच्या साऱ्या बारा महिन्यांतल्या उत्तम ऋतूचे, **कारोमांडेल**च्या पूर्वसमुद्रांत त्या दिवसांत कधीं वादळ होत नाहीं असे, अशा उत्तम समयीं जागच्या जागीं गलबतें नांगरून टाकून स्वस्थ बसावयाचें आणि आपल्या देशाचे, फ्रेंच राष्ट्राचे, शत्रु हात जोडून शरण जात आहेत किंवा अन्न अन्न म्हणत तडफडून मरत आहेत हें पहावयाचें; एवढें काय तें करावयाचें होतें. परंतु तें त्याच्या हातून होईना. अरे असें करूं नको, हें चांगलें नव्हे, म्हणून **हैदर** ओरडून सांगत असतां, त्याच्या गलबतांवरचे सारे शिपाई, खलाशी

वगैरे लोक कुरकुरत असतां, कोणाचें कांहीं न ऐकतां, बरोबर आणलेल्या मनुष्यांतलें एकही खालीं न उतरतां तारीख १५ फेब्रुआरी रोजीं **दार्क्ह** शीड चढवून गलबतें हंकारून बेटांकडे निघून चालता झाला. तो गेला हें **कूट** साहेबाचें नशीब, तो संकटांतून पार पडला. पुढें थोड्याच दिवसांत मद्रासेहून सामानसुमान घेऊन निघालेलीं गलबतें येऊन दाखल झालीं.

याप्रमाणें फ्रेंचांच्या मदतीची वाट लागली तेव्हां निराश होऊन **हैदराला** आपला आपण विचार पहाणें सहजच प्राप्त झालें. त्यानें तारीख १ जुलै रोजीं **चिलंबरम्** येथें **कूट**साहेबाशीं रणांगणीं गांठ घातली. त्या वेळीं उभयतांचें मोठ्या निकरानें तुंबळ युद्ध झालें आणि त्यांत हैदराचा पराभव झाला. पुढें तारीख २७ ऑगस्ट रोजीं तो पुनः **परंबाकम्** येथें युद्धास उभा राहिला. तेव्हां ही लढाई निकराची झाली परंतु मागच्याप्रमाणें त्याचा पराजय आणि शत्रु विजई असें झालें नाहीं; उभयतांची बरावरी झाली. तरीपण त्यानें **कूट**साहेबाची सरशी असें म्हणून त्याला थोरपणा दिला. पुढच्या वर्षाच्या म्हणजे सन १७८२ च्या फेब्रुआरी महिन्यांत **हैदरा**चा ज्येष्ठ पुत्र टिप्पूसाहेब यानें कर्नल **ब्रेथवेट** याच्याशीं गांठ घालून, तीन दिवसपर्यंत निकरानें लढून आपल्या सर्व सैन्यासह शरण आलों असें त्याला म्हणायाला लावलें. **डुप्ली**ची जी राजनीति (policy) होती ती अयोग्य म्हणून फ्रेंचांनीं टाकून दिली होती, परंतु तिचा पुनः एकवार स्वीकार करावा असें ठरून त्यांनीं आतां तिसऱ्यानें यत्न केला तो ह्या **ब्रेथवेट**च्या पराभवाच्या सुमारास; आणि हा त्यांचा शेवटचा प्रयत्न; फ्रान्सच्या आरमारावरच्या सरदारांत श्रेष्ठ, प्रख्यात कीर्तिमान् **स्यूफ्रे** (Suffren) याजबरोबर पुष्कळ गलबतांचा एक मोठा मजबूद काफला हिंदुस्थानांत पाठविण्याचें ठरून त्याप्रमाणें त्याची रवानगी झाली. त्याच्या बरोबर सुमारें ३००० सैन्यही आलें. तें **ब्यूस्सी**च्या हाताखालीं रहावयाचें होतें, परंतु तो येऊन तें आपल्याकडे घेईपर्यंत पूर्वीं सांगितलेल्या **दूश्मे**च्या हुकमतींत तें रहावें असा हुकूम झाला होता.

तो फ्रेंच आडमिरल **स्यूफ्रे** आणि इंग्लिश आडमिरल **सर एडवर्ड ह्यूग्स** त्या दोघांची गांठ पडून झटापटी सुरू झाल्या, त्यांत कारोमांडेल किनाऱ्यावर त्यांच्या चारपांच लढाया झाल्या; परंतु त्यांत अमक्यानें जय मिळवला खरा असें म्हणण्यासारखी निकाल लागणारी एकही झाली नाहीं. तेव्हां त्यांनां

आणखी लढूं देत असें म्हणून आपण **दूश्मे**कडे वळूं आणि त्याच्या हाताखालीं चार दिवस जें अफाट सैन्य आलें होतें तें घेऊन त्यानें काय केलें, त्याला दैव कितपत अनुकूल झालें होतें तें थोडेंसें पाहूं. फ्रेंच फौजेचा मुख्य सेनापति **ब्यूस्सी** असें ठरलें; परंतु तो दूर पडला, तेथून येऊन आपल्या हातांत अधिकार घेईपर्यंत, अशा अगदीं आणीबाणीच्या प्रसंगीं तिचें आधिपत्य **दूश्मे**सारख्या—ज्याला अंगावर जबाबदारी घेण्यासारखें दुसऱ्या कशाचें भय वाटत नसे अशा—मनुष्याच्या हातीं पडावें असा योग आला. ह्याला केवळ फ्रेंचांचें दुर्दैव, असें नव्हे तर दुसरें काय म्हणावयाचें ! त्या एवढ्या थोरल्या प्रचंड फौजेवर हुकूम फर्मावायाला, सेनापतिपदावर शोभण्यासारखा, खरा शिपाई असता—आणि त्या सैन्यांत तसा कोणी नव्हता असें नाहीं. पुढें कांहीं काळानें जो फ्रान्सचा मार्शल ( Marshal of France ) हें पद पावला आणि स्वीडनचा राजा झाला तो **बेर्नादोत्** ( Bernabotte ) त्यांत होता—तर दक्षिण हिंदुस्थानांत कांहीं काळपर्यंत तरी निराळाच प्रकार घडून येता.

**दूश्मे** आणि त्याचें सैन्य ता. २० एप्रिल रोजीं **पोर्टोनोव्हो** बंदरांत गलबतावरून खालीं उतरलें. **सुफ्रेन** आणि **हैदर** या उभयतांच्या विचारानें असा बेत ठरला होता कीं म्हैसूरच्या सैन्यापैकीं ६००० पायदळ आणि ४००० स्वार यांनीं जाऊन फ्रेंच फौजेला मिळावें, मग साऱ्या फौजेचें आधिपत्य **दूश्मेनें** स्वीकारावें आणि ती घेऊन **हैदरा**च्या मुख्य सैन्यांत जाऊन मिळावें. खर्चाला लागणारा पैसा आणि सामानसुमान वगैरे सर्व **हैदरानें** पुरवावें. ह्या ठरावाप्रमाणें गोष्टी घडून आल्या आणि **दूश्मे गुडलूर** शत्रूपासून माघारें घेऊन **पेरमकोल** येथें जाऊन हैदराला मिळाला. आतां येथून उठून जाऊन **वांडिवाश**पुढें तळ द्यावयाचा असा संकेत ठरून उभयतांनीं तेथून कूच केलें.

इंग्लिशांची फौज १२००० होती, तींत फक्त २००० गोरे होते आणि तिचें आधिपत्य अद्याप **कूट**साहेबाकडेच होतें. त्याची शक्ति क्षीण झालेली होती परंतु त्याचा स्वभाव नेहमीं धाडशी असे. त्याची हिम्मत ( spirit ) पूर्वीप्रमाणें कायम, **प्लासी** येथें लढण्याबद्दल त्यानें **क्लाइव्हच्या** उलट आपलें मत दिलें त्या दिवशीं होती त्याप्रमाणें अढळ होती.

कूटवर आलेला हा प्रसंग कांहीं सामान्य नव्हे मोठा कठीण होता. त्याच्या अंगावर चालून येणारें सैन्य थोडें थोडकें नव्हे, ६०००० असून त्याच्या अग्रभागीं असणारा सेनापतिही यःकचित मनुष्य नव्हता. हिंदुस्थानांत एतद्देशीय लोकांत आजपर्यंत कधीं पहाण्यांत आला नाहीं असा तो उत्तम योद्धा असून त्याच्या पाठीशीं साहाय्य करण्याला २००० हून अधिक फ्रेंच शिपायांची फौज उभी होती. एवढ्या ह्या प्रचंड सेनेपुढें **वांडिवाश**चा निभाव कसचा लागतो, त्याचा हां हां म्हणतां पाडाव होईल असें दिसत होतें; त्यांत कांहीं संदेह वाटत नव्हता. **कूट**ला तर तें ठाणें जाऊं देतां उपयोगीं नव्हतें. त्याला कसेंही करून त्याचें संरक्षण करणें भाग होतें. म्हणून त्याची फौज जरी थोडी होती तरी ती घेऊन तो निघाला आणि **हैदर** व **दूश्मे** या दोघांशीं सामन्याला उभा राहिला. तें त्याचें कृत्य अगदीं साहसाचें, अविचाराचें होतें म्हटलें तरी हरकत नाहीं असें होतें. तोफ, बंदुक, तलवार ह्या सर्व शस्त्रास्त्रांची त्याच्याजवळ शत्रूपेक्षां कमतरता असून त्यांच्याजवळ घोडा तर त्याच्यापेक्षां बेसुमार अधिक होता. असल्या ह्या प्रचंड सेनेपुढें त्याचा निभाव लागावयाचा नाहीं, अगदीं धुळीस मिळून जावें लागेल असें उघड उघड दिसत होतें. आतां जय मिळवण्याची संधी उत्तम आहे असें **हैदरा**ला तर तेव्हांच दिसलें आणि त्यानें **दूश्मे**ला आपली फौज लौकर सिद्ध करण्यास सांगितलें. उभय दळांच्या अशा असमान स्थितींत लढाईला उभें रहाणें म्हणजे अविचार आहे असें **कूट**ला म्हणण्याला जीं कारणें होतीं त्याच कारणांमुळें **हैदरा**ला स्फुरण येऊन युद्ध लौकर होऊन जाऊंदे असें वाटूं लागलें होतें आणि **दूश्मे**ला तसेंच वाटून त्याचे बाहू स्फुरण पावावयास लागले पाहिजे होते. परंतु एवढी मोठी जबाबदारी मी आपल्या शिरावर कशी घेऊं असें वाटूं लागून त्याचे हातपाय लटपट कांपूं लागले आणि त्या भारानें त्याची मान मोडली. तो म्हणूं लागला मी कांहीं खरा सेनापति नव्हे, खरा **ब्यूस्सी**, तो अजून आला नाहीं; मी आपला तूर्ता-तूर्त कामचलाऊ सेनापति ( acting commander ) लढाईचें साहस कसें करूं ? सारांश काय, त्याच्यावर दैवानें सुप्रसन्न होऊन जयप्राप्ति करून घेऊन कीर्ति मिळवण्याची अशी उत्तमोत्तम संधी आणून दिली असतां ती साधणें त्याच्या हातून झालें नाहीं. त्याला रणांगणीं येण्याचें धैर्य होईना. तें पाहून

**हैदराला** त्याचा अगदीं वीट आला आणि त्याचें नांव नको, त्याच्या जवळपास राहणें नको, असें वाटून त्यानें लागलेंच आपलें सैन्य तेथून हालवलें आणि मागें सरून **पाँदीशरी**जवळ **कलिनूर** येथें तळ दिला. **कूट** पुढें काय करतो हें पहात तो तेथें बसला असतां त्याला असें वर्तमान लागलें कीं, तो इंग्रज सेनापति **आर्णीवर** जाऊन पडण्याच्या बेतांत आहे. **हैदरानें** आपला दारूगोळा, सामानसुमान **आर्णीत** ठेविलेलें असल्यानें तिला तर तो फार जपत असे. ती गेली म्हणजे झालें; केवढें नुकसान ! म्हणून त्याला हरप्रयत्नानें ती संभाळणें भाग होतें. याकरितां **दूश्मे** आणि त्याचें सैन्य यांचें आतां काय पाहिजे तें होऊं दे असें म्हणून तो **कूट**ला गांठण्यासाठीं ताबडतोब निघाला. मोठमोठ्या मजला मारून त्यानें त्याला गांठलें आणि त्याच्याशीं संग्रामही केला. त्या लढाईत **हैदरा**च्या हातून त्याचा कांहीं पराभव झाला नाहीं परंतु **आर्णी** बचावली. तिच्यावर घाला घालण्याचा जो **कूट**चा बेत होता तो फसला. पुढें चार दिवसांनीं **हैदरानें कूट**च्या फौजेंतल्या एका भागाला (detachment) फसवून झुलवीत झुलवीत एका विकट स्थळीं नेलें आणि तेथें अडचणींत गांठून साऱ्याची कत्तल उडवली. मग **कूट** तेथून माघारा फिरून मद्रासेस गेला आणि **हैदर वेल्लूर**ला जाऊन वेढा घालून बसला.

**ब्यूस्सी** हिंदुस्थानांत येण्यास निघाला होता तो येऊन पोहोंचण्यापूर्वींच **हैदर** मेला होता. तारीख १९ मार्च रोजीं **ब्यूस्सी** येऊन दाखल झाला. पुढें थोडक्याच दिवसांत असें दिसून आलें कीं, दक्षिणेच्या सुभेदाराच्या दरबारांत प्रतिष्ठा मिळवून ज्यानें कितीएक वर्षेंपर्यंत तेथें आपलें श्रेष्ठत्व आणि दरारा कायम राखला होता तो **ब्यूस्सी** हा नव्हे. सन १७८३ च्या मार्च महिन्यांत **गुडलूर**च्या बंदरांत येऊन उतरलेला आतांचा **ब्यूस्सी** संधिवातानें हातपाय आंखडलेला गोड घांस खाऊन पडणारा होता. तो कोणतेंही काम आंगावर घेईना आणि कशालाच मंजुरी देईना. तो कोणाला भेटेना आणि आपल्या तंबूच्या बाहेर फिरकेना; आंत स्वस्थ पडून राहिला. त्याची ती अवस्था पाहून इंग्रजी फौजेनें ही संधी बरी आहे म्हणून **गुडलूर**ला वेढा घालून त्याला आंत कोंडून टाकलें. त्या फौजेंत गोरे इंग्लिश शिपाई त्याच्याजवळच्या गोऱ्या फ्रेंच शिपायांपेक्षां थोडे होते. अशा स्थितींत तो पडला आहे इतक्यांत अशी बातमी आली कीं, युरोपांत

फ्रेंचांचें आणि इंग्लिशांचें युद्ध चाललेलें बंद होऊन तह ठरला; तहनाम्यावर सह्या
झाल्या. इंग्लिश सेनापतीच्या सुदैवानें तो योग आला. इंग्लिश आरमार मद्रास-
किनाऱ्यावर होतें त्याचा पराभव करून **स्यूफ्रेनें** तें नुकतेंच तेथून हांकून लाविलें
होतें, इंग्लिश सैन्याची अन्नसामुग्री संपून गेलेली असल्यानें ते थोडावेळ लढाई
तहकूब करा असें म्हणूं लागले होते. तें जर **ब्यूस्सीनें** मान्य केलें नसतें तर
त्या सैन्याला हात जोडून फ्रेंचांनां शरण जाण्यावांचून दुसरा तरणोपाय नव्हता.*
परंतु तसें घडावें असा ईश्वरी संकेत नव्हता. **ब्यूस्सी** लढाई बंद ठेवण्यास
आनंदानें मान्य झाला आणि पुढें लौकरच **व्हरस्यालीस**च्या तहानें उभय-
पक्षांचें युद्ध अगदीं बंद झालें.

हिंदुस्थानांत राज्य स्थापण्याचे फ्रेंचांचे जे काय प्रयत्न चालले होते ते येथपर्यं-
तच. तो तह झाल्या दिवसापासून मग उघडपणें यत्न करण्याचें त्यांनीं सोडून
दिलें. पुढें सुमारें वीस वर्षेंपर्यंत आडपडद्यानें काम चाललें होतें; एतद्देशीय राजे-
रजवाड्यांच्या पदरीं नोकरीस राहून त्यांच्या सैन्यांनां कवाइत शिकवावी,
माऱ्याच्या, नाक्याच्या जागा कशा वळकावाव्या आणि त्यांचें रक्षण कसें करावें
तें दाखवावें, इत्यादि प्रकारांनीं फ्रेंच लोकांनीं वैराग्नि धुमसत ठेविला होता, परंतु
**ड्युप्लीनें** तो पेटवून जशा ज्वाला काढल्या तशा कांहीं कोणाला निघाल्या नाहींत,
तो हळु हळु विझतच गेला. त्या अवधींत त्यांनीं म्हैसूरच्या **टिपूसुलतानाला**
वश करून घेऊन त्याच्याकडून इंग्लिशांशीं उघड उघड रण माजविलें; परंतु
**मार्किस आफ् वेलेस्ली** यानें आपला बुद्धिप्रभाव गाजवून त्याचा नाश
केला. हिंदुस्थानांत राज्य स्थापण्याची कल्पना प्रथम **ड्युप्लीच्या** मनांत आली,
त्याप्रमाणें तो करून पाहूं लागला परंतु त्याचा हेतु पूर्ण झाला नाहीं. **क्लाइव्ह,**
**वॉरन हेस्टिंग्ज** आणि **वेलेस्ली** यांनीं त्यानें दाखविलेला मार्ग स्वीकारून

---

* ह्या विषयावर प्रोफेसर एच. एच. उइल्सन यानें असें लिहिलें आहे—
ह्या जो अगदीं समयास फ्रान्सावरोबर तह झाला तो जर झाला नसता तर इंग्रज
दक्षिण हिंस्थानास मुकले असते. पुष्कळ अंशीं असें घडलें असतेंसें दिसतें. ह्या वेळीं
ज्या लढाया झाल्या त्यांची सविस्तर हकीगत **म्यालेसनकृत** Final
French struggles in India and on the Indian seas
नामक पुस्तकांत दिलेली आहे ती पहावी.

इंग्लंडाला राज्य संपादून दिलें. तें या वेळेला एवढें मोठें आणि इतकें बलाढ्य झालें होतें कीं इंग्लंड एका बाजूला एकटें असून **नेपोलियन** आणि त्याचे साहाय्यकर्ते राजे दुसऱ्या बाजूला होऊन सर्वांचीं सैन्यें एकत्र करून त्याच्यावर उठले होते अशा प्रसंगीं देखील त्या फ्रान्सच्या अधिपतीला इंग्रजांच्या हिंदुस्थानांतल्या राज्यावर उघडपणें हल्ला करण्याची छाती झाली नाहीं. हिंदुस्थानांत राज्य स्थापन करण्याची कल्पना प्रथम **ड्युप्लीनें** मनांत आणली हें कोणालाही नाहीं म्हणतां येणार नाहीं. बरें, ती कल्पना उगाच कांहीं तरी का होती ? तसें नाहीं. त्यानें नीट विचार करून त्या कामाचा चांगला अंदाज बांधला होता, तें कसें करावें याची चांगली व्यवस्था लाविली होती आणि हळु हळु सतत परिश्रमानें तें शेवटास न्यावयाचें असें ठरविलें होतें. इंग्रजांची नजर कांहीं त्याच्यासारखी नव्हती. जो त्याचा हेतु होता तो पुष्कळ दिवस, बहुत काळपर्यंत, त्यांच्या ध्यानींमनीं नव्हता, लक्षांतही आला नाहीं. त्यानें जे डाव योजले होतें ते आपण चालूं दिले नाहींत, सारे लटपटवले, एवढ्यांतच समाधान मानून ते आपले पूर्ववत शेटजी बनून खुशाल व्यापारधंदा करीत बसण्यास राजी होते. जेव्हां **सुराजउद्दौल्या**शीं प्रसंग आला तेव्हां याचा नीट समाचार घेतला तर बरें नाहीं तर हा इंग्लिशांचा फडशा पाडतो; त्यांचें पाऊल टिकूं देत नाहीं असें जेव्हां **क्लाइव्ह**ला दिसलें तेव्हां इंग्रजांनां थोडेबहुत अधिकार असावे असें प्रथम फक्त त्याच्या मनांत आलें. तरी लढाई होऊन त्याला जय आल्यावर, पुढें बंगाल आणि बहार खालसा झाल्यावर देखील पुढें पुष्कळ दिवसपर्यंत त्याच्यासुद्धां मनांत **ड्युप्लीचे** जे बेत होते ते सारे कांहीं आले नाहींत. त्याची आकांक्षा **ड्युप्ली**पेक्षां किती कमी होती तें त्यानें आपल्यामागून आपल्या जागेवर येणाराला आपल्या मनोरथाचा वेग कोठें आवरून धरून तो उभा करण्यास सांगितलें तें पाहिलें म्हणजे उघड दिसतें. * त्यानें त्याला अगदीं मनापासून

---

* **क्लाइव्ह**चा लेख असा आहे—आपलें राज्य **बंगाल** आणि **बहार** ह्या दोन प्रांतांच्या सीमेंतच असावें. अगदीं जपून शांतता राखा; ती असेल तर आमची भरभराट, मूलाधार ती आहे. कोणत्याही राजाशीं कुरापत काढून आपण होऊन लढण्यास कबूल होऊं नका. तहनाम्यांत ठराव असल्याप्रमाणें राजाच्या ( दिल्लीच्या बादशहाच्या ) किंवा नबाब वजिराच्या मुलखाच्या किंवा आमच्या

असें निक्षून सांगून ठेविलें होतें कीं, मीं आतां जी राज्यमर्यादा केली आहे हिच्याबाहेर तूं जाऊं नको. ह्या क्षेत्रसीमेचें उल्लंघन करूं नको. परंतु ज्या गोष्टी घडून आल्यामुळें **क्लाइव्ह**ला शस्त्र धरावें लागलें होतें तशाच प्रकारच्या गोष्टीं-मुळें **वॉरन हेस्टिंग्ज**ला आणि त्याच्या नंतर बऱ्याच काळानें **वेलेस्ली**ला युद्धाला उभें रहावें लागलें. **कॉर्नवालीस, टेन्माउथ, आडयाम** आणि **मिंटो** यांनीं आपल्या मतें आपल्या हद्दींतच रहावें, पुढें पाऊल टाकूं नये म्हणून प्रयत्न केला, परंतु त्यांचा उपाय चालेना; त्यांनां राज्य वाढवावें लागलें. जात्या शूर अशा प्रतापी लोकांची **हुगळी**तीरीं एकदां एक वखार पडली तेवढें त्यांनां पुरलें; मग हळु हळु पाऊल पुढें टाकीत टाकीत पाय पसरून मुलुख पादाक्रांत होत जावयाचा हा परिणाम अपरिहार्य होता. शत्रूंनां जिंकावें किंवा त्यांच्याकडून तुडवून घ्यावें ह्याशिवाय अन्य कांहीं मध्यवर्ती मार्ग नव्हता. या दोहोंपैकीं पहिला साध्य होण्यासारखा आहे हें ' मद्रास सोडीत नाहीं ' असें कर्ना-टकच्या नबावाला जेव्हां **ड्युप्ली**नें सांगितलें तेव्हां त्यानेंच प्रथम निदर्शनास आणून दिलें. त्याच्या सेनापतीनें **अड्यार** नदीवर त्या नबाबाच्या फौजेचा जो पराजय केला त्याच्या योगानें इकडचे, हिंदुस्थानांतले, लोक आणि युरोपीयन लोक यांच्यामध्यें स्वभावतःच अंतर आहे, ते वरचढ आहेत एवढेंच सिद्ध होऊन राहिलें नाहीं; तर **ड्युप्ली**ची तीव्र दृष्टि दूर पोहोंचून, महत्वाकांक्षा जागृत होऊन, मनाची अशी खात्री झाली कीं, सारा दक्षिण हिंदुस्थान देश पादाक्रांत करून त्यावर फ्रेंचांचा अम्मल बसवून येथें त्यांचें राज्य स्थापन करतां येईल. जर फ्रान्स देशानें त्याला पाठबळ देऊन वेळेवर साहाय्य केलें असतें तर त्याला जें स्वप्न पडत होतें, जें त्याच्या मनांत आलें होतें, त्याप्रमाणेंच प्रत्यक्ष घडून आलें असतें असें कोण म्हणणार नाहीं ? आपला हेतु सिद्धीस नेण्याकरितां त्यानें किती महत्प्रयास

---

स्वतःच्या मुलखाच्या संरक्षणार्थ लढावें लागेल तर मात्र लढा; आणि सर्वांवरची ही गोष्ट ध्यानांत ठेवा कीं **दिल्ली**वर चालून जाण्याचा बेत कराल तर फशीं पडाल; तो यत्न व्यर्थ आणि निष्फळ होईल एवढेंच नव्हे, त्यांत खुद्द तुमच्या सैन्याचा संहार उडेल आणि कदाचित् बंगाल्यांतून कंपनीला आपला गाशा गुंडाळावा लागेल, तिचा अंतकाळच येऊन ठेपेल. ' **क्लाइव्ह**चें मिनिट. Early records of British India by Mr. Tallboy's Wheeler पुस्तकांत साग्र आहे तें पहावें.

केले, कशीं विलक्षण कारस्थानें केलीं, तें सर्व यथास्थळीं सांगितलेंच आहे. त्याला यश येणें अगदीं उचित होतें, परंतु नाहीं आलें म्हणून त्याची जी खरी योग्यता होती ती कांहीं जगजाहीर झाल्यावांचून राहिली नाहीं. अशा त्याच्या उज्वल चरित्रकथनाची परिसमाप्ति करतांना **एम झेव्हियर रेमाँड** यानें त्याच्याविषयीं जें लिहिलें आहे तें मागें सांगितलेंच आहे तें अगदीं योग्य आहे, एवढें सांगितलें आणि त्याची पुनरावृत्ति केली म्हणजे पुरे आहे. **रेमाँड** म्हणतो— सहा हजार कोसांवरून ( 4000 leagues ) कांहीं शेंकडे ( some hundreds ) मुलकी कामगार आणि कांहीं हजार शिपाई पाठवून आपलें हिंदुस्थानांतलें अफाट राज्य कसें चालवावें ह्या बिकट प्रश्नाचा इंग्लंडानें उलगडा करून दाखविला आहे असें वारंवार म्हणण्यांत येतें आणि त्याची मोठी वाहवा होत असते. यांत जर कांहीं पुष्कळ आश्चर्य करण्यासारखें असेल, हें कृत्य मोठ्या धैर्याचें, साहसाचें, फार राजकारणी चातुर्याचें आहे, असें वाटत असेल तर एवढें कबूल केलें पाहिजे कीं याचा आद्यप्रवर्तक **ड्युप्ली**, तें सर्व श्रेय त्याचें आहे. आतां इंग्लंड तेथची संपत्ति आणि वैभव यांचा जरी उपभोग घेत आहे तरी प्रथम **फ्रान्सनें** आपल्या बुद्धिचातुर्यानें जो मार्ग दाखवून दिला त्यानेंच त्याला चालावें लागत आहे.



श्रीगजानन.

# आमचे यापूर्वीं प्रसिद्ध झालेले ग्रंथ

# अनाथ पाडुरंग



## अत्यंत मनोहर, उत्कृष्ट, ऐतिहासिक कादंबरी.

आवृत्ति दुसरी.

यास दक्षिणा प्राईझ कमिटीनें ३०० रुपये बक्षीस दिलें असून मे. डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन यांनीं शाळांस व लायब्रऱ्यांस बक्षीस देण्यास पसंत केला.

**किंमत अडीच रुपये.** ट. ख. चार आणे.

## रा० ब० महादेव गोविंद रानडे यांचा अभिप्राय.

हें पुस्तक रा. रा. कृष्णाजी बल्लाळ गोडबोले यांनीं केलेलं समग्र वाचून पाहिलें. मूळ इंग्रजी पुस्तकही फार वर्षांपूर्वीं वाचून पाहिलें होतें. तें भाषांतर कसें उतरलें आहे, हें पाहण्याकरितां आणून तपासून पाहिलें. भाषांतर चांगलें साधलें आहे. भाषा सरळ, सुबोध, व अस्सल मराठी आहे. भाषांतर केल्याप्रमाणें वाटत नाहीं.

मूळ इंग्रजी ग्रंथांतील गोष्ट पेशवे यांचे कारकीर्दींतील पडत्या काळाबद्दल लिहिलेली आहे, व ती इंग्रजानें लिहिलेली आहे. यासंबंधानें आपल्या महाराष्ट्र देशांतील लोकांच्या गुणावगुणांविषयीं कित्येक स्थळीं फार पक्षपातानें विवेचन झालें आहे. महाराष्ट्र देशांतील सर्व लोक केवळ स्वार्थबुद्धि, कपटकुशल, व उपकार न स्मरणारे असे असतात, असें दाखविण्याचा जो प्रयत्न झाला आहे, तो पेशवाई-

च्या अखेरीच्या धामधुमींत कांहीं अंशानें खरा असेल. परंतु बहुतेक अगर सर्वच लोक अशा स्वभावाचे होते, असें म्हणण्यास त्या वेळच्या इतिहासावरूनही कारण होत नाहीं, हा मुख्य दोष या ग्रंथांत आहे. केवळ गोष्टीचे संबंधानें पाहिलें, तर गोष्ट चांगली जुळलेली आहे. अद्भुत व चमत्कारिक प्रसंग सर्वच ठिकाणीं दाखविण्यांत आले आहेत. त्यामुळें गोष्टीचे खरेपणाविषयीं शंका उत्पन्न होते. तथापि त्या योगानें रस अधिक घडला आहे. सातारचे गादीबद्दल पेशवाईच्या अखेर तंटा पडला असून त्या तंट्याचे संबंधानें सातारचे वंशांतील भाऊबंदानें बखेडा केला होता, व सर्व देशभर त्या संबंधानें खलबत चालविलें होतें, असें मानण्यास इतिहासामध्यें कितपत आधार आहे हें समजत नाहीं, व विशेष आधार असेल, असें वाटत नाहीं.

मराठे लोकांचें चरित्र दाखविण्याचा जो मूळग्रंथकर्त्याचा हेतु तो सिद्धीस गेला, असें वाटत नाहीं. परंतु पेंढारी लोकांची चाल, रीत, अनुभव, वगैरे प्रकार या ग्रंथांत चांगले उतरले आहेत. असा पेंढारी सातारच्या कुलांत उत्पन्न होऊन पुढें सातारचे गादीवर बसला असें घडलें असेलसें वाटत नाहीं. एकंदरींत पुस्तक फार मोठें झालें आहे. तथापि अलीकडे जीं आपल्या भाषेंत लहान मोठीं नॉव्हेल्स ( कादंबऱ्या ) झालीं आहेत, त्यांपेक्षां ह्या ग्रंथाची रचना, भाषा व रस, हे गुण अधिक साधले आहेत.

---

## श्री० रा० गणपतराव बापूसाहेब कुरुंदवाडकर यांचा अभिप्राय.

ही " अनाथ पांडुरंग " नांवाची कांदंबरी आम्हीं दोन वेळ समग्र वाचली. मूळ ग्रंथ " पांडुरंग हरी " या नांवानें कोणा विद्वान् इंग्रजानें केलेला इंग्रजींत आहे. त्याची पुनरावृत्ति काढण्याविषयीं मुंबईचे माजी गव्हरनर मरहूम आलिशान सर बार्टल फ्रीयर साहेब बहादूर, यांनीं शिफारस करून तीस आपण प्रस्तावनाही लिहिली आहे. हे साहेब या इलाख्यांत पुष्कळ वर्षें होते, व आम्हां लोकांशीं चांगला परिचय ठेवीत असत, त्यामुळें त्यांना माहितीही पुष्कळ होती. त्यांचा आम्हां दाक्षिणात्यांविषयीं विपरीत ग्रह झालेला नव्हता, व ते खरे मार्मिक व

गुणज्ञ असल्यामुळें त्यांनीं त्या प्रस्तावनेंत जो अभिप्राय नमूद केला आहे, तो इंग्रज लोकांनीं ध्यानांत धरण्यासारखा आहे.

इंग्रजी चांगलें येत नसल्यामुळें मूळ कादंबरींतील गुणदोष व रा० कृष्णाजी बल्लाळ गोडबोले यांनीं केलेलें हें तिचें भाषांतर यांत मुळाच्या संबंधानें काय चुका झाल्या आहेत, हें लिहिण्यास आम्ही असमर्थ आहों. याकरितां हें भाषांतर केवळ मूळच आहे, असें समजून त्याजवरूनच या कादंबरीविषयीं अभिप्राय दिला पाहिजे.

ही कादंबरी पेशवाईचा जो अखेरचा धांदलीचा काळ तो दाखविण्यांच्या उद्देशानें कवीनें लिहिली असावी, असें खास दिसतें. या कादंबरीवर सर्वमान्य विद्वान् व मोठे चौकस असे रावबहादूर आनरेबल माधवराव गोविंद रानडे यांनीं अभिप्राय दिला आहे. त्यांत ते म्हणतात कीं, " पेशवाईच्या पडत्या काळांत कां होईना, परंतु सर्व लोक आपलपोट्ये, स्वार्थपरायण, व कपटपटु होते, असा जो या कादंबरीकारानें दोष दाखविण्याचा यत्न या पुस्तकांत केला आहे, तो केवळ पक्षपातीपणाचा आहे. " तसेंच अगदीं बरोबर आमचेंही मत आहे. सातारच्या गादीविषयीं तंटा पडला असून त्यामुळें देशभर धामधुम चालली होती, व ज्याचा तिच्याशीं कांहीं संबंध नाहीं, असा एक पेंढारी अखेर तीवर बसला, ही गोष्ट अगदीं खोटी असल्यानें आनंददायिनी होत नाहीं, असें माधवरावजी म्हणतात, तें अगदीं खरें आहे. तथापि त्यांत हें एक बरें आहे कीं, कोणतीही खोटी गोष्ट वाचतांना संभवनीय वाटण्यापेक्षां अगदीं खोटी असें उघड कळेल, तर मन गोंधळांत पडत नाहीं. तसें, या गोष्टीचे खोटेपणाविषयीं शंकाच येत नाहीं हें बरें आहे.

मुख्यत्वेंकरून या कादंबरींतील संविधानकें जागोजाग चमत्कारिक रीतीनें जुळविलीं असल्यामुळें वाचतांना आनंद होतो. पेंढारी वगैरे हलक्या लोकांचें वर्तन तर हुबेहुब मजेदार लिहिलें आहे. अलीकडे " श्रीप्रतापसिंगजी छत्रपति महाराणा, संस्थान उदेपूर. " या नांवाची एक कादंबरी प्रसिद्धीस आली असून तिजविषयीं मासिकपुस्तकांतून वगैरे चांगुलपणाचे अभिप्राय आले आहेत, त्याप्रमाणें ती कादंबरी बरीही आहे. परंतु या " अनाथ पांडुरंगा " बरोबरीची जागा ती घेईल, असें आम्हांस अगदीं वाटत नाहीं. ज्या वस्तूंत दोष थोडे आणि गुण

फार ती संग्राह्य होते, त्याप्रमाणें या कादंबरींत दोषांस जागा थोडी असून गुणांस फार आहे, यांत संशय नाहीं; म्हणून ही कादंबरी सर्वांनां संग्राह्य आहे.

( न निर्दोषं न निर्गुणम्. )

---

**दक्षिणा प्राईझ कमिटीचे सेक्रेटरींनीं आपल्या रिपोर्टांत असें लिहिलें आहेः**—" ह्या पुस्तकाची भाषा शुद्ध, अस्सल मराठी आहे. अलीकडे छापखान्यांतून जीं वरचेवर नवीन पुस्तकें बाहेर पडत असतात, त्यांच्यासारखी नाहीं. सोन्याच्या समया, अत्तराचे दिवे, रत्नांची रेलचेल असल्या अतिशयोक्ति-वर्णनपूरित निवळ कल्पित गोष्टींपेक्षां ऐतिहासिक कादंबरी वाचणें पुष्कळ अधिक उपयोगी आहे. या पुस्तकाची भाषा पाहून मला अतिशय आनंद झाला. हिला मी खरी मराठी म्हणतों. मराठींत जीं पुस्तकें प्रसिद्ध होत आहेत, त्यांत अशी क्वचित्च दृष्टीस पडते. ह्या पुस्तकास २५० पासून ३०० पर्यंत बक्षीस द्यावें. "

---

रा. ब. गोपाळराव हरी देशमुख, नारायण भाई दांडेकर, डा० रा० गो० भांडारकर व रा० रा० गो० ग० आगरकर या सर्वांनीं चांगले अभिप्राय दिलेले आहेत.

---



# विद्यमान एतद्देशीय राज्यें, संस्थानें व जहागिरी यांचा इतिहास.

ह्यास दक्षिणाप्राईज कमिटीनें ३५० रुपये बक्षिस दिलें आहे.

मुंबई व वऱ्हाड येथील मे० डायरेक्टर आफ पब्लिक इन्स्ट्रक्शन यांनीं शाळांस व लायब्रऱ्यांस बक्षीस देण्यास पसंत केलें आहे.

सर्व लोकांस विनयपूर्वक कळविण्यांत येतें कीं, आम्ही हा ग्रंथ मोठ्या मेहेनतीनें तयार करून छापला आहे. मनुष्यास स्वदेशाचा इतिहास माहीत असणें किती अवश्य आहे, हें सांगावयास नकोच. हिंदुस्थानास आतां जरी पारतंत्र्य आलें आहे, तरी थोड्या काळापूर्वी बऱ्याच भागास स्वातंत्र्य होतें; तें प्राप्त झालें कसें आणि पुढें गेलें कसें; इंग्रज लोक येथें राज्य कमावूं लागल्यापासून आजपर्यंत जीं राज्यें बुडालीं, व आज जीं कायम आहेत, तीं स्थापणाऱ्या पुरुषांनीं व त्यांच्या वंशजांनीं काय पराक्रम केले; शौर्य, धैर्य, युक्ति, राजकारण, राजनीति, न्यायबुद्धि, देशाभिमान, कुलाभिमान, धर्माभिमान, इत्यादि गुण त्यांच्या ठायीं कसे वसत होते; हें जाणण्याची ज्यास बुद्धि होणार नाहीं, असा पुरुष विरळा. त्यांतही निजाम, गायकवाड, शिंदे, होळकर, इत्यादि जीं लहान थोर राज्यें चालू आहेत, त्यांची इंग्रजांशीं गांठ पडल्यापासून कशी स्थिति होत आली आहे, व अशीं एकंदर राज्यें आहेत तरी किती, हें पहाण्याची ज्यास एकदां देखील इच्छा होणार नाहीं, असा मनुष्य मिळणारच नाहीं, अशी कल्पना करून आम्ही हा ग्रंथ तयार केला. तो द. प्रा. कमिटीस फार पसंत पडला. कमिटीचे सेक्रेटरी म्हणतात, " असा ग्रंथ मराठींत नाहीं, ही मोठी अडचण वाटत होती. ती आतां दूर झालेली पाहून लोकांना खरोखर मोठा संतोष होईल. मराठी ग्रंथसमूहांत ही

मोठी भर पडेल. ग्रंथाची भाषा शुद्ध आणि साधी आहे. " कमिटीचे मेंबर रा. ब. महादेव गोविंद रानडे, नारायण भाई दांडेकर, डॉ० रामकृष्ण गोपाळ भांडारकर, रा० रा० गोपाळ गणेश आगरकर, यांनींहीं पुष्कळ प्रशंसा करून श्रमाच्या मानानें बक्षिस मोठें नाहीं, असें म्हटलें. ज्ञानप्रकाश, ज्ञानचक्षु, सुधारक, महाराष्ट्रकोकिळ, व मराठी शालापत्रक यांनीं फार प्रशंसा केली आहे. तर आतां मराठी वाचकांनीं ही सेवा मान्य करून घ्यावी. शाळामास्तरांनीं तर हें पुस्तक वाचल्याशिवाय राहूंच नये, अशी विनंति आहे. लायब्ररयांनीं याचा संग्रह अवश्य करावा.

पुस्तक डेमी अष्टपत्री सांच्याचें असून पृष्ठें ४३२ आहेत. कागद सफेत, जाड, व चिवट; अक्षर उत्तम; बांधणी सुरेख; किंमत २ रुपये; बंगीखर्च ३ आणे. पांच प्रती घेतल्यास टपालखर्च पडणार नाहीं. रोख पैसे पाठविल्यास अगर व्हाल्युपेएबल मागविल्यास पुस्तक रवाना होईल.

कृ. ब. गोडबोले,
कुरुंदवाड.

---

# राबिनहुडचरित्र.



इंग्लंड देशांत फार दिवसांमागें राबिनहुड नामक विलक्षण मनुष्य होऊन गेला. त्याचें नांव माहीत नाहीं असा मनुष्य विलायतेंत मिळणारच नाहीं. त्याचे पवाडे लहानथोर सर्व मनुष्यांचे तोंडीं आहेत. त्याचें चरित्र वाचून लहान मुलें आणि मोठीं मनुष्येंही आनंद पावतात. अशा गाजलेल्या व्यक्तीचें नांव, गुण, व कर्म आमच्या देशबांधवांस माहीत असणें अगदीं अवश्य असल्यानें आम्ही एका इंग्रजी ग्रंथावरून हें पुस्तक तयार केलें. तें डे. व्ह. ट्रा. सोसायटीस पसंत पडून तिनें ७५ रुपये बक्षीस दिलें आहे. पुस्तकाची किंमत ८ आणे. टपालखर्च १ आणा.

कृ. ब गोडबोले,
कुरुंदवाड.

# एल्फिन्स्टनचरित्र.

ईस्ट इंडिया कंपनीच्या राज्यांत जे अधिकारी होऊन गेले, त्यांत पेशवाईची परिसमाप्ति होऊन काबीज झालेल्या मुलखाची व्यवस्था लावण्यास नेमलेले कमिशनर व पुढें तो मुलूख मुंबई इलाख्यांत सामिल करून विस्तीर्ण झालेल्या प्रदेशावर राज्याधिकार चालविण्यास नेमलेले गव्हरनर, धि ऑनरेबल मौंट स्टयूअर्ट एल्फिन्स्टन, यांची कीर्ति ह्या देशांत अजरामर होऊन राहिलेली आहे. त्यांच्यासारखा दुसरा गव्हरनर आजपर्यंत झालाच नाहीं, असा त्यांचा लौकिक सर्वत्र पसरलेला आहे. श्रीमंत दुसरे बाजीरावसाहेब पेशवे यांच्या दरबारीं ते प्रथम इंग्रजांचे वकील म्हणून आले. तेव्हांपासून इकडेच राहून अखेर नऊ वर्षें मुंबईचे गव्हरनरीचें काम करून राजीनामा देऊन ते स्वदेशीं परत गेले. हिंदुस्थानच्या गव्हरनर जनरलच्या जागेवर त्यांची नेमणूक विलायतसरकार करीत होतें, परंतु त्यांनीं ती स्वीकारली नाहीं. सन १८५७ च्या बंडानंतर दोन वर्षांनीं ते वारले. तेव्हां त्यांचें वय ८० वर्षांचें होतें. नोकरी सोडून विलायतेस गेल्यावर ते कांहीं चैनींत किंवा आनंदांत पडून काळ घालवीत नव्हते. त्यांचा विद्याव्यासंग आमरण सतत चालू होता. त्यांचें अध्ययन जबर होतें. हिंदुस्थानसंबंधीं हर एक महत्त्वाच्या गोष्टींत प्रधानमंडळी त्यांचा अभिप्राय विचारीत असत. इतकें सांगितलें, म्हणजे त्यांचें चरित्र किती महत्त्वाचें व उपयोगी आहे, हें सांगण्याचें कारणच उरत नाहीं. श्रीमंत सवाई माधवरावांच्या पश्चात् मराठ्यांच्या सत्तेस उतरती कळा लागली, आणि अल्पकाळांत तिचा लय झाला, तो कसा, हें समजण्यास एल्फिन्स्टनच्या चरित्रासारखें दुसरें साधन नाहीं, असें पाहून आम्ही हा ग्रंथ अनेक पुस्तकांच्या व कागदपत्रांच्या आधारानें लिहिला. तो डे. व्ह. ट्रा. सोसायटीस पसंत पडून, तिनें त्यास पहिल्या प्रतीचें बक्षीस दिलें. ग्रंथ मोठा झाल्यानें त्याचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग केले आहेत मे. डायरेक्टर ऑफ् पब्लिक इन्स्ट्रक्शन यांनीं पूर्वार्ध शाळांत बक्षीस देण्यास पसंत केला आहे. दर एक भागाची किंमत एक रुपया व टपाल खर्च चार आणे आहे. व्ही. पी. नें मागवावें. **कृ. ब. गोडबोले.** कुरुंदवाड.

# संस्कृत गद्य रामायण.



आपला हा हिंदुस्थान देश म्हणजे सकल विद्यांचें माहेरघर, अशी याची पूर्वापार ख्याति असून आमच्या पूर्वजांची जी प्रौढ संस्कृत भाषा तिचें रमणीयत्व तर अवर्णनीय आहे. आमच्या देशी पंडितांचें पालनकर्ते राजेरजवाडे कालवशेंकरून लोपत चालले, तेव्हां गीर्वाणभाषाध्ययनही कमी कमी होऊं लागलें, आणि तसाच क्रम गेल्या पन्नास वर्षांत चालू असता, तर आजला स्थिति काय झाली असती, तिचें अनुमान करणेंही कठीण आहे. परंतु तिचा मंजुल ध्वनि पाश्चात्य पंडितांच्या श्रवणीं पडतांच तल्लीन होऊन ते तिचे जसे निस्सीम भक्त बनत चालले, तसें तिचें नष्टचर्य संपून पुनः गौरव होऊं लागले. हल्लीं सरकारी मोठमोठ्या शाळांतून तर संस्कृत शिकविणारे गुरु स्वतंत्र असून शिकणारांची संख्याही फार मोठी आहे. पूर्वापार चालत आलेल्या शिकविण्याच्या रीतींतही फार अंतर पडलें आहे. व विद्यार्थ्यांस अल्पायासानें ज्ञान व्हावें, म्हणून सुलभ ग्रंथ होत आहेत. परंतु एकंदरींत पहातां अद्याप गद्यग्रंथाची कमतरता फार आहे, व त्यांची तर अवश्यकता मोठी आहे. हें मनांत आणून आम्ही अध्यात्मरामायणावरून श्रीरामकथा गद्यरूपानें लिहून तयार केली; ती कांहीं विद्वान् गृहस्थांनीं पाहून विद्यार्थ्यांस फार उपयोगी पडण्यासारखें पुस्तक होईल, असें म्हटल्यावरून छापविली आहे. मूलग्रंथाची भाषा सुलभ व मनोहर आहे, तीच होतां होईल तेथपर्यंत कायम ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. रचना मात्र बदलली आहे. त्या योगानें तिचें प्राचीन स्वरूप विकृत न होतां जसेंच्या तसें स्पष्ट दिसत आहे.

अध्यात्म हा विषय स्वभावतःच गहन म्हणून तो अजी गाळला आहे. तसेंच पौराणिकी कथा म्हटली, म्हणजे तींत कोठें पाल्हाळ, कोठें द्विरुक्ति, इत्यादि असावयाचें. तें सर्व गाळून व कथाभागही संक्षेप देऊन लिहिला आहे. त्या योगानें वीर, करुण, अद्‌भुत, इत्यादि रसभरित, अरण्य, पर्वत, समुद्र इत्यादि स्थलवर्णनयुक्त व पुत्रप्रेम, बंधुप्रीति, भक्तवात्सल्य इत्यादि अनेक मनोधर्मवर्णनयुक्त

हें लहानसें पुस्तक प्रेक्षणीय झालें आहे. पुस्तकाची किंमत १२ आणे व टपालखर्च १ आणा पाठविला असतां पुस्तक रवाना होईल. १० किंवा त्याहून जास्त प्रती घेणारास टपाल हांशील पडणार नाहीं.

हें पुस्तक संस्कृत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांस फार उपयोगाचें आहे. खालीं लिहिलेले गृहस्थांकडून अभिप्राय आले आहेत, त्यांत ते हें विद्यार्थ्यांस फार उपयोगीं आहे असें लिहितात.

रा० रा० डॉक्टर रामकृष्ण गोपाळ भांडारकर.

वे० शा० सं० रा० राजारामशास्त्री बोडस } महामहोपाध्यय.
,, ,, भीमाचार्य झळकीकर } एल्फिन्स्टन कॉलेज.
,, ,, गोविंद शंकर शास्त्री बापट, एल्फिन्स्टन हायस्कूल.
,, ,, गणेशशास्त्री रुकडीकर, राजाराम कॉलेज.
,, ,, गोविंद वामन पाध्ये, सोलापूर हायस्कूल.

रा० रा० शिवराम बापूजी परांजपे, संस्कृत प्रोफेसर, राजाराम कॉलेज.
,, ,, नारायण बाळकृष्ण गोडबोले, दक्षिणा प्राईज कमिटीचे सेक्रेटरी.
,, ,, गणेश व्यंकटेश जोशी, बी. ए., संस्कृत टीचर, ए. हायस्कूल.
,, ,, अण्णाजी रामचंद्र अत्रे, हेडमास्तर, मिरज हायस्कूल.

---

# समासचूडामणि ( प्राचीन ).



संस्कृत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांस हें पुस्तक अत्युपयोगी असल्यानें अगदीं अवश्य लागणारें आहे. किंमत अर्धा आणा. दहा प्रती घेतल्यास टपालखर्च पडणार नाहीं.

---

